# चांदोबा


संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी


जीवन जगण्यासाठी मनुष्याला कोणता ना कोणतातरी व्यवसाय कामधंदा करण्याची आवश्यकता असते परंतु सर्वांनाच तसा उद्योगधंदा करणे लागू पडतो असे नाही. जो ज्या काही कामकाजात निपुणता प्राप्त करीत नाही. त्याला त्या काही कामात सफलता प्राप्त होत नाही. "स्वार्थ" हि गोष्ट वाचून आपल्याला त्याचा बोध होईल.

## अमर वाणी

करावित्र शरीरस्य नेत्रयोरिव पक्ष्मणी ।
अविचार्य प्रियं कुर्यात्, तन्मित्रं मित्रमुच्यते ।।

[शरिराचे रक्षण करण्यास जशी हातांची मदत होते. तसेच डोळ्याचे रक्षण पापण्या करतात. त्याच प्रमाणे संकटकाळी आपण सांगितल्या शिवायच मित्रमंडळी आपल्या मदतीला धावून येतात.]


वर्ष : ३६ जानेवारी १९८७ अंक : ७

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००








## चांदोबातील नवल



### खरा मित्र

नेपिल्स मधे एका घराला अचानक आग लागली. त्या घरातील पाळीव रॉकी नावाच्या कुत्र्याने आपल्या मालकिणीला व तीन वर्षाच्या मुलीला आगीतून वाचविण्यासाठी आगीत उडी मारली. व त्या दोघींचे कपडे तोंडांत धरून त्यांना बाहेर ओढत आणले. आणखी आगीत सांपडलेल्या लोकांना वाचविण्याच्या प्रयत्नात असतांनाच तो कुत्रा स्वतः जळून मरून गेला.

### नेपोलियनचे जहाज

नीलयुद्धाच्या पूर्वी एक महिना सन् १७९८ जुलै पहिली तारीख ह्या दिवशी नेपोलियन बोनापार्ट चे ऐपेट्रियट नावाचे जहाज इजिप्तच्या समुद्र किनाऱ्यावर बुडून गेले. १८८ वर्षांनि त्यांना बुडालेल्या जहाजाचा शोध फ्रान्सच्या काही संशोधकांनी लावला.





### फोटो काढणारा फोन

क्षणभरातच फोटो काढून तो फोटो दुसऱ्या ठिकाणी पाठवून देणारा एक फोन तयार करण्यात आला आहे.

# चोलराजा - विष्णुदास

कांचीपुरचा चोलराजा विष्णुचा परमभक्त होता. एका पर्वणीच्या दिवशी पुजेला निघाला. त्याच्या येण्यापूर्वीच एका विष्णुदास नावाच्या निर्धन भक्ताने विष्णुच्या अंगाखांद्यांवर तुळशीच्या माळा घालून विष्णुला अलंकृत केले. ते पाहून राजाला अतिशय संताप आला की, आजच्या शुभ दिवशी विष्णु भगवान अशा तऱ्हेने सजविला जावा. ह्यानंतर त्याने सर्व रत्न अलंकार विष्णुला घातले व दानधर्म करून थाटामाटात विष्णुची पुजा केली.

त्या गरिब विष्णुदासाने वेगळी विष्णुची प्रतिष्ठापना केली. आणि माधुकरी मागून जे काही मिळेल त्याचा नैवेद्य दाखवून त्याची मनोभावे पुजाअर्चा केली. तो एकदा अशीच पुजा संपवून ध्यान करीत असतांना कोणीतरी व्यक्ति तेथे येऊन देवाचा प्रसाद चोरून नेत होती. त्याने किलकिले करून पाहिले. तेव्हां तेथे एक गरिब माणुस प्रसाद घेत होता. त्याने पहाताच पकडले जाऊ ह्या भितीने तो माणुस प्रसाद न घेता पळून जाऊ लागला. परंतु विष्णुदासनी तो प्रसाद हातात घेतला व पाठोपाठ जाऊ लागले. तो गरीब माणूस धावून थकला व बेशुद्ध झाला विष्णुदासनां त्या माणसाची किंवा आली त्यांनी त्याच्या तोंडावर पाणी शिंपडले व थोडे पाणी पाजले. दुसऱ्या क्षणी तेथे विष्णु भगवान प्रत्यक्ष झाले आणि अत्यंत प्रेमान आलिंगन करून त्याला स्वत: मधे सामावून घेतले.

हि गोष्ट समजताच चोलराज चिंतामग्न झाला. विष्णुदासासारखा गरीब माणुस सुद्धा देवामधे लिन झाला. नंतर तो वैरागी झाला. तेव्हां विष्णु स्वत: प्रत्यक्ष होऊन म्हणाले–"राजा, तू आणि हा विष्णुदास दोघे माझे परमभक्त आहात. तुम्ही दोघांनी यथाशक्ति माझी आराधना केली आहात. परंतु तुझ्या मनांत थोडासा अहंकार भरलेला तो दूर करण्यासाठी मी हे केले." असे म्हणून विष्णुने राजाला आशिर्वाद दिला.





# विवाहाची अट

वसंतागिरी राज्याच राजा चंद्रकांत अविवाहित तरुण होता. एकदां तो सकाळीच वनविहारासाठी बाहेर पडला. तेथे एका सरोवरांत यथेच्च स्नान करून बाहेर पडला. तो त्याला भिल्लांच्या वस्तीकडे जात असलेली सुंदर मोहक एक तरुणी दिसली. तिच्या चेहऱ्यावरील निरागस भाव आणि तिचे रूप लावण्या-वर तो मोहित झाला.

त्यावेळी तो तसाच आपल्या राजवाड्यांत परत आला. परंतु ती भिल्लकन्या त्याच्या मनांतून जाईना. त्याला सतत तिचे रूप लावण्य दिसू लागले. त्याला तिच्याशी लग्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली. पण त्याच्या मनांत वारंवार एक विचार ग्रस्त करू लागला कि मी एका देशाचा राजा मग त्या भिल्लाच्या मुलीशी कसा लग्न करूं शकेन? हे कसे शक्य होईल?

राजाला बैचेन झालेला पाहून मंत्री देववर्माने त्याला विचारले–"आपण कोणत्या विषयावर एवढा गहन विचार करीत आहांत? आपल्या चिंतेचे कारण सांगू शकाल काय?"

राजाने मनांत काहीही न ठेवतां सरळ त्या भिल्लाच्या मुलीची गोष्ट त्याला सांगून टाकली. म्हणाला–"तिच्याशी लग्न करण्याची तीव्र इच्छा मला सतावीत आहे. पण एका राजाचें एका भिल्लाच्या मुलीशी लग्न कसे शक्य होईल, याचा मी विचार करीत आहे." आपल्याला ह्यावर काही तोडगा काढता येईला कां?

क्षणभर विचार करून मंत्री म्हणाला–"तो तुमच्या मुगुटांतील हिरा. अगोदर हा मातीतच पडलेला होता ना? तो ह्या मुगुटावर आल्याने त्याचे महत्व किती वाढलें आहे. तसेच तुमच्या मनांत त्या

भिल्लकन्ये विषयीचा न्याय अन्याय उचित अनुचित वगैरे वाटल्याचे कांहीं कारण नाही. एक वर्षभर तुम्हीं तिला राजकुळातील तथा राजवाड्यांतील रीति रिवाज संस्कार शिकवून तयार करा, आणि मग तिच्याशी लग्न करा. ह्यामुळें जनतेपुढें एक आदर्श ही ठेवला जाईल. उद्याच मीं भिल्ल वस्तींत जाऊन त्या मुलीचा शोध घेतो." व ती कोण ह्याची चौकशी करतो.

"नको! नको! मीच जातो. मी त्या मुलीला पाहिले आहे. मग तिने नको कां मला पहायला?" राजा उत्साहित होऊन म्हणाला.

दुसऱ्या दिवशी राजा स्वत: गेला. तेव्हां त्याला समजले कि, ती मुलगी भिल्ल सरदाराची एकुलती एक कन्या आहे. तिचे नांव चंपकवल्ली आहे. ती त्याची अत्यंत लाडकी आहे.

राजाला आपल्या वस्तीत आलेला पाहून त्या भिल्ल सरदाराने त्याचे सत्कार केला आणि मोठ्या आदरानें त्याचा आतिथ्य सत्कार करून म्हणाला—"आज आमचा भाग्याचा दिवस. आपली पायधूळ आमच्या वस्तीत पडली. महाराज मी आपली काय सेवा करूं?"

दाराआड उभ्या असलेल्या चंपकवल्ली-कडे इशारा करून राजा म्हणाला—"जर त्या मुलीला पसंत असेल तर मी तिच्याशी लग्न करूं इच्छितो." राजाचे बोलणे ऐकताच चंपकवल्ली घरांत गेली. तिच्या पाठोपाठ भिल्ल सरदारही आंत गेला. घरांतील बाकी लोकांचा विचार घेऊन बाहेर येऊन तो म्हणाला—"महाराज, क्षमा असावी. हे लग्न होऊ शकत नाही आणि यदाकदाचित झालेच तर चंपकवल्ली आपल्याबरोबर राजवाड्यांत येऊ राहू शकणार नाही. ती इथेंच राहील. कारण अशीच आमच्या भिल्ल जातीत अट आहे. महाराजांनी आमच्यावर कृपा करावी."

"लग्न झाल्यावर सुद्धा जर माझी बायको माझ्या बरोबर राजवाड्यांत येणार नसेल तर त्या लग्न करून घेण्यात तरी काय अर्थ आहे?" असे सांगून राजा परतला.

राजा परतल्यावर मंत्री देववर्माने विचारले—"असे असून देखील आपण तिच्याशी लग्न करू इच्छिता कां?" चंद्र-कान्ताने होकारार्थी मान हलवली आणि म्हणाला—"पण त्या अटीचे काय?" आम्ही ह्यावर काय उपाय काढावा.

मंत्री थोडावेळ विचार करीत उभा राहिला आणि "मला आज्ञा असावी" असे म्हणून झटक्यांत निघून गेला.

दुसरे दिवशी मंत्री राजाला घेऊन उद्यानांत फिरावयास गेला. तेथे एका लता मंडपांत राजकुमारीची वेषभूषा करीत बसलेली चंपकवल्ली त्यांच्या दृष्टीस पडली. चंद्रकांतने विस्मयाने मंत्र्याकडे पाहिले. तो म्हणाला—"काल चारसशस्त्र शिपायांना





पाठवून हिला बोलावून घेतले. पण हिच्या पित्यानी किंवा कोणीही गांवकऱ्यांनी त्यांना आडविले नाही. राजाच्या इच्छेविरुद्ध जाणे बरे नाही असे समजून कदाचित ते सर्व गप्प असतील."

मंत्र्याचे हे काम राजाला मुळीच आवडले नाही. त्याला फार दुःख झाले. तो म्हणाला– "इच्छेविरुद्ध जबरदस्तीने असली कामे करता कामा नयेत. आज संध्याकाळीच मी स्वतः जाऊन चंपकवल्लीला तिच्या घरी नेऊन पोहोंचवतो. तिच्या पित्याची क्षमा मागतो." आपले असे करणे न्यायाला अनुसरून नाही.

म्हटल्याप्रमाणे राजा स्वतः चंपकवल्लीला घेऊन भील्ल वस्तीत गेला. राजाला पाहून चंपकवल्लीचा बाप आपल्या सर्व गोतावळ्यासह राजाला सामोरा गेला. मोठ्या आदराने त्याचे स्वागत केले आणि म्हणाला– "मी आपल्या प्रेमाची परीक्षा पाहण्यासाठीच अट घातली होती. कारण लग्न झाल्यावर ही मुलगी राजाची पट्टराणी होण्याच्या लायकीची नाही. म्हणून तिला परत पाठवून दिलीत तर संकटच नाही कां? तस पाहिलं तर मुलाची आणि माझी इच्छा असेल तरच मी हिच्याशी लग्न करू इच्छतो. ह्या अटीनीच आपल्या मनाचा मोठेपणा व सात्विक भाव दिसून आला होता."

भिल्ल सरदाराने मोठ्या आनंदाने दोघांच्या लग्नाला संमती दिल्याचे पाहून राजाला परमानंद झाला. त्याने प्रेमाने आलिंगन देऊन आपला हर्ष व्यक्त केला. मोठ्या जोरात त्यांच्या लग्नाची तयारी करण्यात मग्न झाला.

यथा समयी राजोचित वैभवाने दोघांचे लग्न झाले आणि चंपकवल्लीने राजप्रासादांत प्रवेश केला. तेथे योग्य गुरूच्या जवळ तिने राजकुटुंबाला आवश्यक असे शिक्षण मिळविले आणि महाराज चंद्रकांत राजाला शोभेल अशी त्याची पट्टराणी झाली व दोघे सुखाने राज्य करू लागले. वैवाहिक जिवन आनंदाने उपभोगू लागले.





# जिवंत भूत

सिद्धपुर गांवाचा जमिनदार रंगराज आपल्या गावांतील मध्य वस्तीत स्वतःच्या दुमजली वाड्यांत राहात होता. त्याच्या शेजारीच एक जुने पडके घर होते त्यांत शिवनाथ नावाचे एक गरीब कुटूंब राहात असे. त्याच्या घरात बरीच माणसे रहात होती व नेहमी वर्दळ असे.

आपल्या घराशेजारीच एका गरीब कुटुंबाचे बिऱ्हाड असणे व त्याच्या घरात माणसांचा सतत वावर असल्याचे रंगराजला पसंत नव्हते. म्हणून तो काहींना काही तरी खुसपट काढून त्याला चिथावून लावण्याचा प्रयत्न करीत असे.

कधी रंगराज शिवनाथला बोलावून सांगे कि त्याच्या कोंबड्या येऊन आमच्या झाडाची नासधूस करतात तर कधी तुमच्या घरांतील सांडपाण्याची घाण आमच्या दारांत येते, तर मुलांच्या गडबडीने आम्हांला त्रास होतो. एक ना दोन. नेहमी अशा तक्रारी करीत असे. धमक्या देत असे.

रंगराजचा हेतू शिवनाथच्या लक्षात आला. पण तो काय करणार? तो मोलमजूरी करून आपल्या पिढिजात असलेल्या घरांतच राहात होता व त्यात सुख मानत होता.

एक दिवस असेच रंगराजाने शिवनाथाला बोलावून सांगितले कि, त्याची कोंबड्या बदके आमची बाग उध्वस्त करतात व शिवाय तुमची मुले इतका आरडाओरडा आणि गोंगाट करतात कि कोणाला काहीही करायला सुचत नाही. नां झोप नां पूजा शांतता पाठ. शेवटी बोटे मोडत म्हणाला– "तुझे खोपटे जळून खाक झाल्याशिवाय तू काही येथून हालणार नाहीस." आता मीच त्याची काहोतरी युक्ती करतो.



घर जाळण्याचे शब्द ऐकल्याबरोबर शिवनाथला वाईट वाटले. तो घाबरला कारण तो गावाचा जमिनदार ठरला मनांत आल्याबरोबर घर जाळायला तो कमी करणार नाही आणि त्याला अडवणार तरी कोण? त्यापेक्षा आपण गांव सोडून गेलेले बरे.

असा विचार करून त्याने आपले घर विकायचे ठरवले व त्यासंबंधी विचारले रंगराजलाच शिवनाथने विचारून आपले घर अगदी थोडया किंमतीत विकून टाकले आणि तो गाव सोडून मुलाबाळांसह व थोडया सामानसुमानासह दुसऱ्या गांवी निघून गेला.

काही वर्षांनी रंगराजला त्या खेडयांत राहण्याचा कंटाळा आला. त्याची मुलेही मोठी झाली होती. त्यांच्या शिक्षणासाठी सुद्धा त्याला शहरांत जाऊन रहावे असे वाटू लागले. त्याप्रमाणे त्याने एका शहरात एक घर विकत घेतले व तेथे सर्वांना घेऊन सामानसुमाना सकट राहण्यासाठी गेला.

त्या दिवशी तो आपल्या घरांत गेला त्याच दिवशी त्याच्या शेजारच्या घरांतून एकाएकी गडबड गोंगाट ऐकू येऊ लागला. कशाचा आरडाओरडा आहे हे पाहण्यासाठी रंगराज तेथे गेला. तोपर्यंत तेथे खूप गर्दी जमली होती. रंगराजाने एकाला जवळ बोलावून कसला गोंधळ आहे म्हणून त्याला विचारले.

तो म्हणाला–"आहो! काही दिवसापूर्वीच ह्या मालकाने बऱ्याच किंमतीला हे घर विकत घेतले. परंतु एक दिवस सुद्धा तो घरांत सुखाने राहूं शकला नाही. ह्या घरांत एक भूत घुसून बसले आहे. ते ह्यांना फार त्रास देताय.

त्याला घालविण्यासाठी त्या मालकानी पुष्कळ प्रयत्न करून पाहिले. मंत्रतंत्र केले, जादू टोणे केले. गंडेदोरे झाले पण काही उपयोग झालां नाही. शेवटी त्याने केरळातून एक मांत्रिक आणला आहे, त्याच्या उपचाराचा हा सारा गोंगाट चालू आहे.



काय मंत्रतंत्र चालले आहेत? हे पाहण्यासाठी रंगराज त्या घरांत शिरला. मंत्रतंत्राची मांडणी करतां करतां मांत्रिक मालकाला म्हणाला–"काय सांगू, तुम्हांला विध्याचलराव, तुमच्या घरांत जबरदस्त भुतांनी वस्ती केली आहे.

तुम्ही वेळेवरच मला बोलावलेत. आतां मुळीच काळजी करू नका माझी मंत्र पूजा संपतां संपताच ते भूत ह्या गावाची वेस ओलांडून पळून जाईल."

विध्याचलराव जणू आपल्याशीच पण लोकांना संबोधून म्हणाला–"माझे दुर्दैवच म्हणायचे. मी ते शेजारचे घर घ्यायला पाहिजे होते. पण आता काय उपयोग. ते घर रंगराज नावाच्या एका मोठ्या श्रीमंत जमीनदाराने भरपूर किंमत देऊन ते विकत घेतले आहे. पाहूं या. आता हा शेवटचाच प्रयत्न.

एवढयाने ते भूत हे घर सोडून गेले नाही तर नशीबावर हवाला ठेऊन मी हे घर सोडून दुसरीकडे कोठे तरी निघून जाईन."

विंध्याचलरावाच्या तोंडून रंगराजाचे नांव ऐकतांच घरांतील भुताने एक मोठा हुंकार भरला. जमलेले सर्व लोक एक दुसऱ्याकडे थरथरत घाबरून पाहूं लागले. तेवढयांत भूत बोलू लागले. त्याने विचारले–



"रंगराज म्हणजे तो सिद्धपुर गांवचा जमीनदार तर नाही? त्यानेच घेतले आहे का शेजारचे घर?"

सर्व लोक घाबरलेले पाहून मांत्रिकाने विध्याचलरावाकडे आश्चर्याने प्रश्नार्थ मुद्रेने पाहिले.

विध्याचलराव मांत्रिकाला म्हणाला–"होय. ते शेजारचे घर सिद्धपुरच्या जमीनदाराने–रंगराजनेच–विकत घेतले आहे."

"तर मग मी हे घरच काय पण हा गांवच सोडून जातो." भूत हतबुद्ध होऊन म्हणाले.

मांत्रिक मोठ्या गर्वाने आपली मिशी पिळून म्हणाला–"पाहिलंत! मी अजून

मंत्र म्हणायला सुरवात सुद्धा केली नाही. तोच भुताने पळून जाण्याचा विचारही करून टाकला."

भूत अट्टाहास करून म्हणाले–"तुझ्या मंत्रतंत्राच्या भितीने नाही मी येथुन निघून जात. खरी गोष्ट अशी आहे. ऐक. माझे नांव शिवनाथ. मी रंगराजच्या सिद्धपुरातच त्याच्या शेजाराला राहात होतो. तेव्हा त्याने मला इतका त्रास दिला कि, त्याला कंटाळून वैतागून मी माझे पडके खोपटे सुद्धां विकून टाकून ते गांव सोडून निघून गेलो, पण माझ्या सर्व कुटुंबाची वाताहात झाली. शेवटी अखेर नरक यातना भोगून मरण पावलो." "अरे! शेजाऱ्यांना नाहक त्रास देणारी माणसेच भुतापेक्षा जास्त खतरनाक असतात. रंगराजच्या शेजाराने तुम्हाला लवकरच तो अनुभव येईल."

क्षणार्धात त्या घरांत एक मोठे चक्री-वादळ उठले आणि मांत्रिकाची सर्व पूजा सामुग्री उधळून गेली. मांत्रिक मोठमोठयाने मंत्र म्हणू लागला. तेवढ्यात वरच्या खिडकीतून भूत सटकन् निघून गेले.

जमलेले लोक रंगराजकडे पाहून आप-सात कुजबुजू लागले. त्यावर रंगराज म्हणाला–"भुताच्या बोलण्यांतला रंगराज बहुतेक मीच असावा असे वाटते. पण हे भूतही दुष्ट असले पाहिजे. अहो आजकाल माणसांतली तरी सत्यता कुठे शिल्लक राहिली आहे? तीच गोष्ट भुताची म्हणून मला वाटते ह्या भुताच्या बोलण्याकडे लक्ष देण्यांत काही अर्थ नाहीं."

ह्यावर एकजण म्हणाला–"काय माहीत हे भूत शिवनाथचे आहे का भूतनाथचे? मला वाटते मांत्रिकाची अवहेलना करण्या-साठीच त्याने असे काही म्हटले असणार."

काही लोकांनी हसून डोकी हलवली. परंतु रंगराज अपमान झाल्याप्रमाणे मान खाली करून निघून गेला.

तेव्हांपासून त्याने शेजाऱ्यांशीच नव्हे तर सर्वांशीच सद्व्यवहार करून चांगले नांव मिळविले.




# अग्नि द्वीप

[७]

[उग्राक्षाच्या हाती कैदेत असलेल्या अमरपालने चित्रसेनाला अग्नीद्वीपच्या रहिवाश्यांसंबधी राजद्रोही नागवर्मा संबधी सुद्धा काही गोष्टी सांगितल्या. अमरपालने चित्रसेनला आश्वासन दिले की, राजद्रोही असलेल्या नागवर्माला मदत करणाऱ्या त्या व्याघ्रचर्मधारी व पक्षांच्या झोपडयांना आगी लावून मी त्यांचा नायनाट करून टाकेन. पुढे वाचा–]

अमरपालचे बोलणें ऐकून चित्रसेनाने उग्राक्षाकडे आपली नजर टाकली. अमरपालच्या बोलण्यावर त्याचाही विश्वास बसल्यासारखा वाटला. तो मोठ्या उत्साहाने उठून उभा राहिला आणि म्हणाला–"मी माझ्या राक्षसा पंकी तिघांना अमरपालाच्या मदती करीता पाठवतो. जर कां हे कार्य सफल झाले तर अमरपालचा मी मोठा सन्मान करीन."

चित्रसेनाने क्षणभर विचार केला व म्हटले–"परंतु ह्या कार्या सोबतच कपिल-पुरवर अधिकार गाजविणे उत्तम होईल ना! आमच्या राजाला कैद करून तो सेनापति नागवर्मा माझ्या पित्याच्या धवलगिरी राज्यावर हल्ला करावयास गेला आहे. बहुतेक करून ह्यावेळी कपिलपुरचे रक्षण करण्यासाठी तेथे मोठे सैन्य असणार नाही. त्यामुळे आपण अचानक कपिलपुरच्या



किल्ल्यावर हल्ला करून ते हस्तगत करू."

चित्रसेनाचे बोलणे ऐकताच उग्राक्षाचा आनंद गगनात मावेनासा झाला. तो जोर-जोरात उड्या मारू लागला व म्हणाला–"चित्रसेन, हा तर फारच उत्तम उपाय आहे. परंतु आपण फक्त कपिलपुर राज्य हस्तगत करावयाचे नाही तर त्याच बरोबर महाराजा वीरसिंहची मुलगी कांतीमती हिला सुद्धा त्यांच्या तावडीतून सोडवले पाहिजे. तू तर एक तरुण व अविवाहीत आहेस. तुझे राज्यच वाढणार नाही तर राजकुमारी तुझी पत्नी बनू शकले.

उग्राक्षाच्या बोलण्याने चित्रसेन दुःखी झाला. कपिलपुरच्या राजाचे जिवंत रहाणे व त्याचे राज्य आपल्या राज्याशी जोडले जाणे व कपिलपुरच्या राजाच्या मुलीशी विवाह होणे हे सर्व पाहिले तर अन्याय कारक आहे! त्यातून जर कां राजकुमारी कांतीमतीने दुसऱ्याच कोणा राजकुमारला मनापासून वरले असले तर काय जाणो? तो राक्षस जातीचा उग्राक्ष मानवाप्रती व त्याच्या सामाजिक चालीरीती विषयी एकदम अजाण आहे.

"उग्राक्षा, सध्या आपल्याला फक्त नाग-वर्माला जिंकून घ्यावयाचे आहे. अशा प्रकारे एका बाजुला टपून बसलेल्या शत्रूचा आपण नायनाट करून टाकू शकतो. त्यानंतर कपिलपुरचा राजा म्हणून पुन्हां आपण त्या राज्यावर वीरसिंहचा राज्याभिषेक करू. परंतु ही सारी कामे सफल करावयाची झाली तर प्रथम आपल्याला त्या भयंकर पक्षाचा नायनाट केला पाहिजे. नंतर त्या व्याघ्रचर्मधारींना ठार केले पाहिजे. जो पर्यंत ते लोक त्यांच्या राज्याच्या सीमेपर्यंत आहेत तोपर्यंत आपल्याला कपिलपुर राज्या-वर हल्ला करून ते राज्य हस्तगत करता येत नाही. त्याच्या हाती मारले मात्र जाऊ शकतो." चित्रसेन समजावणीच्या सुरात म्हणाला.



"महाराज, हि सारी जबाबदारी तुम्ही माझ्यावर टाका. मी पहा चुटकी सरशी त्यांचा नायनाट करून टाकतो. तुम्ही फक्त आपल्या सैन्याला घेऊन जंगलात लपून बसा आणि जशा झोपडया जळू लागतील व ते पक्षी तडफडून मरू लागतील तसा आपण त्याचा फायदा घेऊन कपिलपुरवर हल्ला करू." अमरपालने आपली युक्ति सांगितली.

अमरपालचे बोलणे उग्राक्ष व चित्रसेनला सुद्धा पटले. त्यानंतर अमरपालच्या मदती साठी दोन राक्षस व चित्रसेनाचे चार सैनिक त्याच्या बरोबर निघाले. बाकीचे सारेजण जंगलात एकदम नाहिसे झाले. चित्रसेनने व उग्राक्षाने आपापल्या लोकांना सावध रहाण्याचा इशारा केला. व त्या-करीता चौफेर आपले सैनिक पाठविले.

तेवढ्या वेळात अमरपाल आपल्या साथीदारांसह जंगलाच्या वाटेने मध्यान्हां-पर्यंत कपिलपुरच्या नजीक येऊन पोहोचला. त्याच जंगलात जवळपास शंभर एक पक्षी तरी आपले वास्तव्य करून होते. ते सर्व त्या झोपडयामध्ये निवांत बसलेले दिसत होते.

अमरपालने आपल्या साऱ्या साथीदारांना एकत्र जमा केले. व त्यांना पहारा देणारी ती माणसे दाखवित म्हटले–"मला ह्या ठिकाणाची सारी माहीती आहे. त्यामुळे मी पुढे होऊन त्या सर्वांना गोड बोलून



एकत्र करतो. ती संधी साधून तुम्ही त्यांच्यावर एकदम हल्ला करा व त्यांना ठार मारा. त्यानंतर आपण त्या पक्षाच्या झोपडयांना आगी लावून त्या सर्वांचा नाश करू."

अमरपालाचे म्हणणे सर्वांनी मान्य केले. त्यानंतर तो अमरपाल सर्व पाहरेक-रांच्या नावाने ओरडत पुढे गेला. तेव्हां ते सारेजण घडपडत बाहेर आले. आणि घाबरून जात अमरपालच्या भोवती कोंडाळी करून उभे राहीले. ते वीस एकजण होते.

"अरे अमरपाल, तू कसाबसा सुटलास वाटते? आम्ही आशा सोडली होती की, तू त्या राक्षसाच्या तावडीत सांपडून कधीच



मरून गेला असशील?" त्यातील एक पहारेकरी म्हणाला.

"अरे, मी मरणाच्या दाढेतून बाहेर पडलो आणि तुम्हा लोकांकडे जीवानिशी पळत आलो. त्या देवालाच ठाऊक मी किती संकटे पार करून इथे येऊन पोहोचलो. "हो पण हे सांगा त्या पक्षांपैकी सर्वजण सुरक्षित झोपडींमधे बांधलेले आहेत ना!" अमरपालने उत्सुकतेने विचारले.

"हो, हो, ते सर्व पक्षी अगदी सुरक्षित आहेत आपले महाराज नागवर्मा आता धवलगिरीवर आक्रमण करण्यास गेले आहेत. ह्याक्षणी कपिलपुरचे राखणदार आम्हीच आहोत. किल्ल्यात अगदी हातावर मोजण्या इतकेच लोक आहेत. परंतु राजकुमारी कांतीमतीला आम्ही पळून जाऊ नये म्हणून तिच्यावर पहारा देण्यासाठी बसलो आहोत. ह्यावेळी ते चित्रसेनच्या जंगलातील असलेला किल्ला सुद्धा हस्तगत करण्याच्या विचारात आहेत. त्यानंतरच ते बहुदा परत इथे येतील." पहारेकऱ्याने उत्साहात येत सांगितले.

ते ऐकताच अमरपालला इतका आनंद झाला. तो मोठमोठ्याने हंसू लागला हसता हसताच तो आपल्या लपलेल्या साथीदारांना उड्या मारून सांकेतील खुणा करू लागला की तो अभिनय पहारेकऱ्याच्या लक्षाही आला नाही आणि राक्षस चित्रसेनचे अनुयायी त्या सर्वांवर एकदम हल्ला करून आले. ते पाहून अमरपालने म्यानेतून आपली तलवार बाहेर काढली व समोर येणाऱ्या प्रत्येकाची मान सपासप कापून काढली. काही क्षणातच ते निशस्त्र पहारेकरी बिचारे सर्वजण गतप्राण झाले.

त्यानंतर अमरपाल व रक्षक सैनिक त्यांच्या घरात घुसले व सर्वांनी मशाली हातात घेतल्या व त्या तेलात बुडवून पेटवल्या व ते भयंकर पक्षी ज्या राहुट्यांमधून बांधून ठेवलेले होते त्या झोपड्यांना ते भराभर आगी लावू लागले. ते पक्षी अशा तऱ्हेने साखळ्या खेचू लागले. की त्यांच्या



त्या खेचण्याने त्या झोपडया धडाधड खाली त्यांच्याच अंगावर कोसळू लागल्या त्या अंगावर पडल्याने काही पक्षी मेले. काही पक्षी पेटून साखळचा सह उंच उडू लागले. परंतु असहाय्यतेने परत जमिनीवर येऊन कोसळले व मरण पावले.

तो सर्व प्रकार पाहून अमरपाल व त्याचे साथीदार आनंदाने जल्लोष करीत उडया मारू लागले. त्यांच्या आनंदाला पारावार उरला नाही. आनंदाने जोरजोरात किंचाळू लागले. तितक्यात डोंगरांच्या पलिकडून रणभेरीयांचा निनाद ऐकू येऊ लागला त्या आवाजाच्या रोखाने पहात अमरपाल म्हणाला–" महाराज चित्रसेन आणि उग्राक्षाचे सैनिक येत असावेत. येथे आपण जी जाळपोळ केली. ती त्यांना बहुदा लांबूनच दिसली असावी. आता आपल्याला ताबडतोब कपिलपुरवर ताबा मिळवावयास हवा. तुमच्या पैकी दोघांतिघांनी पुढे जाऊन ताबडतोब जाऊन सांगा की, आपण योजलेले कार्य पूर्ण झाले.

अमरपालचे ते बोलणे संपते नां संपते तोच चार राक्षस सैनिक आपल्या दगडी गदा उंच उगारीत झाडांवरुन उडया मारुन ज्या ठिकाणाहून रणभेरींचा आवाज येत होता त्या दिशेने जोरात पळू लागले.

काही वेळात चित्रसेन व उग्राक्ष राक्षस सुद्धा त्या ठिकाणी येऊन पोहोचले. त्यांनी अमरपालने केलेली निघृण हत्या पाहिली व पक्षांच्या झोपडया जळून भस्मीभूत होऊन अनेक पक्षी बेचिराख झालेले पाहिले उग्राक्षाचा आनंद उमळून आला. तो आनंदाने उडया मारु लागला. नंतर आनंदाने त्याने त्याला दोन्ही हाताने वर उचलले व त्याला गदागदा हलवित म्हटले– "छान अमरपाल, तू खरोखरी धाडसी शूर आहेस. तू माझ्या जंगलातील दुष्ट शत्रूचा नायनाट करुन आम्हांला संकटातून मुक्त केलेस सांग तुला काय हवे ?"

"अरे, अरे, तू तर आनंदाच्या भरात मला अशा तऱ्हेने हलवित आहेस की जणू



काही माझे प्राण आताचा निघून जातील त्यामुळे तू प्रथम कृपाकरुन मला खाली सोड" अमरपाल घाबरून धापा टाकीत म्हणाला.

उग्राक्षाने अमरपालला जमिनीवर हळूवारपणे उभे केले व त्याच्या पाठीवर थोपटत म्हटले–"अरे, तू त्या भयंकर पक्षांना आगीत जाळून टाकले आहेस नां ? त्यांपैकी कोणीही जीवंत तर राहीले नां ?"

"नाही बिलकुल नाही. ते सारे पक्षी जळून मरुन गेले. त्याच बरोबर त्याचे वीसजण पहारेकरी सुद्धा मेले. आता त्यातून काही राहीलेच असतील तर ते फक्त कपिलपुरच्या किल्ल्यात." तो म्हणाला.

"आता ते पळपुटे कुठे पळून जातील. आपण ससैन्य जाऊन किल्ल्यावर हल्ला करुन त्या सर्वांना सुद्धा मारुन टाकू." मांडी थोपटत उग्राक्ष आवेशाने म्हणाला.

"पण आपण जर किल्ल्याला सुद्धा आग लावून दिली तर कांतीमतीच्या जीवाला धोका पोहोचेल. त्यामुळे 'उग्राक्षा' तू किल्ल्याचा ताबा मिळविण्याचे काम माझ्यावर सोपव." चित्रसेन घाईने म्हणाला.

"अरे होय रे, मी राजकुमारी किल्ल्यात असलेली गोष्ट तर साफ विसरूनच गेलो बघ. तेव्हां किल्ल्याला धोका पोहोचता कामा नाही. तुम्ही लक्षपूर्वक ऐकता



आहात नां ?" असे म्हणत उग्राक्षाने त्रिवार आपली नजर टाकली.

"महानायका, आम्ही आपली गोष्ट लक्ष देऊन ऐकली आहे ! एका सुरात सारे सैनिक ओरडले. ह्यानंतर अमरपालच्या नेतृत्वाखाली दहा घोडेस्वार कपिलपुरची हालहवाल पहाण्यासाठी रवाना झाले. बाकी सैनिक स्वयंपाक करण्यात मशगुल झाले.

हळूहळू सूर्य मावळू लागला व सारे थकलेले सैनिक आपापले खाणे पिणे संपवून झाडाच्या सावलीत विश्रांती घेऊ लागले. तेवढ्यात एक घोडेस्वार तिथे आला आणि चित्रसेन महाराजांना म्हणाला–" महाराज, आता आपण संकटात पडलो आहोत. आताच

पन्नास साठ व्याघ्रचर्मधारी राजकुमारीला पालखीत बसून जंगलाच्या वाटेने घेऊन चाललेले आम्ही पाहिले.

तो समाचार ऐकताच चित्रसेन व उग्राक्षाला आश्चर्य वाटले. बहुदा ते भयंकर पक्षी जळून बेचिराख झालेल्या बातमीचा त्यांना दिसलेल्या धुरा वरून त्यांनी अंदाज लावला असावा की, ते पक्षी जळून गेल्यामुळे किल्ल्यात रहाणे धोक्याचे होईल. म्हणून ते राजकुमारीला ताबडतोब पळवून नेवून एखाद्या गुहेत लपविण्यास घेऊन जात असावेत.

चित्रसेनाने असा विचार केला व स्वत: आपल्या बरोबर पन्नास वीर व उग्राक्षाचे अनुयायी ह्यांना बरोबर घेऊन जवळच्या वाटेने राजकुमारीची सुटका करण्याच्या विचाराने ताबडतोब निघाला आणि बाकी सैन्याला व अमरपालला त्यानी कपिलपुरवर हल्ला करून तो किल्ला हस्तगत करण्याच्या कार्यावर जाण्यासाठी आज्ञा केली.

गुप्त समाचार घेण्याच्या रोखाने गेलेला अनुयायी चित्रसेन व त्यांच्या बरोबरच्या सैनिकांना रस्ता दाखवून मार्गदर्शन करू लागला ते थोड्या अवधीतच त्या व्याघ्र-चर्मधारी लोकांचा मागोवा घेत त्यांच्या जवळ जाऊन पोहोचला गुप्तचराने सांगितलेल्या प्रमाणे चार धष्टपुष्ट भोई पालखी उचलून नेत होते व त्याच्या चौफेर खड्गधारी पहारा देत पालखी बरोबर जात असलेले त्या सर्वांनी पाहिले.

चित्रसेन व त्याचे सैनिक जवळ येत असलेले पहाताच व्याघ्र चर्मधारींचा नायक इतरांना उद्देशून ओरडून म्हणाला–"हे पहा, ऐका तुम्ही पालखी खाली उतरवून ठेवा." नंतर आपल्या साथीदाराकडे पहात त्यांना म्हणाला–"तुम्ही एक गोष्ट लक्षपूर्वक ऐका जोपर्यंत आपल्या शरीरात प्राण आहे तोपर्यंत कांतीमतीच्या शरिराला कोणालाही हात लावून द्यावयाचा नाही हे लक्षात घ्या. आपल्यातील सैनिक जोपर्यंत एकच शिल्लक राहील तोपर्यंत आपण तिच्या प्राणांचे रक्षण करावयाचे आहे." हा आपले महाराज नाग-वर्मांचा आपल्याला हुकुम आहे." (क्रमश:)



# धाडसी वीर

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू श्रम करीत आहेस ते असाधारण म्हटले पाहिजेत परंतु तुला माहित आहे कां ? त्याचे फळ योग्य कां अयोग्य? कारण आपल्याहून काही बलवान व हुषार माणसे सुद्धा ह्या जगात आहेत. परंतु सर्वजण असे असले तरी ते आपल्याहून कमी श्रेणीच्या लोकांची खोटी स्तुती करतात. व त्यांच्या अनुपस्थितीत त्याचीं टिंगल करून आनंद प्राप्त करतात. परंतु अशी कामे फक्त माणसेच करतात असे नाही तर राक्षस सुद्धा करत होते. ह्याचे उदाहरण म्हणून तुला एका राक्षसाची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



कैलासपुर नावाच्या राज्याच्या राजा चतुरसेन होता. त्याने पुष्कळशा लढाया करून बरेच प्रदेश जिंकून घेतले व प्रत्येक जिंकलेल्या राज्यात निवडक लोकांची नियुक्ती करून यश प्राप्त केले. व चक्रवर्ती बनला. त्याला आता युद्धाची भीती राहली नाही. त्याच्या सर्व देशांत शांतता नांदू लागली. युद्धाची भीती न राहिल्याकारणाने देशातील अनेक तरुण युवक रिकामपणाने वेगवेगळया कलांविषयी व अनेक कामकाजाविषयी आपली आसक्ती दाखवू लागले. असा समाचार राजाला मिळाला. त्या तरूणांना युद्धकलेत प्राविण्य मिळावे असा विचार करून राजाने चढाओढ आयोजित केली.

त्या चढाओढीत भाग घेण्याच्या निमित्ताने अनेक देशातील तरूण मंडळी उपस्थित झाली. त्यांच्यासर्वांच्या उतरण्याच्या सोई करण्यात आल्या.

चढाओढीचा शुभारंभ दोन दिवसाबरच येऊन ठेपला. त्यावेळी नेमका ताडामाडा-सारखा एक बलदंड अक्राळ विक्राळ राक्षस राज्यात आला. राजाच्या नावाने जोर-जोरात ओरडू लागला. ते पाहून तेथे जमलेले सर्वजण घाबरून सैरावैरा पळू लागले राजा थरथर कांपू लागला.

"राजा, याद राख, जर कां मी मनांत आणले तर माझ्या एका लाथेने हे तुझे नगर उध्वस्त करून टाकेन. "हे बघ, मी रोज ह्यावेळी येथे येईन तेव्हां तू दोन घष्टपुष्ट तरूण मला खायला दे. त्यांना खाऊन मी संतुष्ट होऊन इथून निघून जाईन." तो विप्पाड राक्षस म्हणाला.

चतुरसेनला मुकाटयाने त्याचे म्हणणे मान्य करावे लागले. त्या दिवशी तो राक्षस दोन घष्टपुष्ट तरुणाना उचलून घेऊन राजधानीतून निघून गेला.

राक्षस निघून जाताक्षणी राजाने आपल्या मंत्र्याना बोलावले व ते येताच त्यांच्याशी ह्याबाबत विचार-विनिमय केला. आता ही समस्या कशी काय सोडवावी? शेवटी ते एका निर्णयाला येऊन पोहोचले.



त्यांनी राज्यभर अशा तऱ्हेची दवंडी पिटविली. ह्यापूर्वी जशी घोषणा केली होती युद्धकलेच्या चढाओढी न ठेवता आपल्या राज्यात जो राक्षस आला आहे. त्याचा जो कोणी वध करेल त्याचा राजा अद्भूतपूर्व सन्मान करेल.

ती दवंडी ऐकताच असलेले काही शूर तरूण राजाला येऊन भेटले व त्यांना निवेदन करीत म्हणाले–"महाराज, त्या राक्षसाची शक्ति अफाट आहे. तो तर मोठ मोठे वृक्ष मुळासकट उपटून सहजसुलभतेने फेकून देतो. नदी पिऊन टाकून तिला वाळवून टाकण्याचे सामर्थ्य त्याच्यात आहे. त्याच्या विरुद्ध भडकवून काही उपलब्ध होणार नाही.

त्या राक्षसाच्या बाबतीत बऱ्याच तरूणांना काहीबाही माहीती होती. तो राक्षस अनेक राज्यातून हिंडत फिरत इथे कैलासपुरला येऊन पोहोचला होता.

राजा चतुरसेन कळवळून म्हणाला– हे पहात, मी काय माझ्या प्रजेतील लोकांचा रोज बळी देऊ म्हणता कां?"

प्रभू, हा राक्षस सदाकदा हिंडत असतो. हा फारकाल एका ठिकाणी राहात नाही. ह्या राक्षसापासून आपल्याला जे काही कष्ट भोगावे लागत आहेत ते तात्कालिक आहेत. लाखो लोकांचे प्राण वांचविणं व



नगरातील इमारतीची तोड-फोड होणे वांचविण्यानी सध्या शंभर लोकांचे प्राण खर्ची घातले तर विशेष नुकसान म्हणता येणार नाही. आमच्या राज्यातील आपल्या प्रतिनिधींनी असेच केले होते" एका तरूणाने राजाला सांगितले.

राजाने चितामग्न होत त्या तरुणाची पाठवणी केली व तो काळजी करू लागला.

रोजच्या ठरल्या वेळेला राक्षस राज-धानीत आला. आणि निवडून दोन सुदृढ तरूणांना घेऊन गेला.

आपल्या असहाय्यतेवर राजा फार दुःखी झाला. त्यानी पुन्हा मंत्र्याना बोलावले त्यांच्या समोर आपला विचार



मांडला व म्हटले "मी आपल्या प्रजेला अशा प्रकारे राक्षसाच्या हाती सोपवू शकत नाही. तुम्ही तरी ह्यावर काहीतरी तोडगा सांगा नाहीतर मी स्वतः त्याच्या-बरोबर लढण्यास निघतो."

चतुरसेन राक्षसा बरोबर लढणार म्हणजे ह्याच्या अर्थ तो स्वतः आत्महत्या करून घेण्यासारखाच आहे. ते माहीती होताच मंत्र्यानी गंभीरतेने विचार विमर्श केला व महामांत्रिक सांबकाला बोलावले.

महामांत्रिक सांबकाने डोळयात अंजन घातले व सांगितले–"मला त्या राक्षसाच्या शक्तिसामर्थ्याचा काही एक अंदाज लागू शकत नाही. तेव्हां मी इथेच राहून माझ्या मंत्रबळाच्या सहाय्याने त्याच्या बरोबर लढेन. जर कां माझे भाग्य बलवत्तर असेल तर राक्षसाचा नक्कीच सर्वनाश होईल किंवा माझा प्राण जाईल."

त्याच दिवशी रात्री मांत्रिक सांबकाने पुजेच्या खोलीची साफसफाई करवून घेतली. नंतर तेथे सुंदर रांगोळी घालून तेथे पद्म काढले तेथे शनिच्या प्रतिमेची प्रतिष्ठापना केली. व त्याच्या समोर पद्मासन घालून त्याने मंत्रोच्चारणा करण्यास प्रारंभ केला.

परंतु थोडया वेळातच मंत्र्याना असा समाचार मिळाला की, मांत्रिक सांबक रक्त ओकून मेला. दुसऱ्या दिवशी राक्षस नेहमी प्रमाणे आला आणि दोन तरुणांना उचलून घेऊन गेला ते ऐकताच चतुरसेन राजाला अत्यंत दुःख झाले.

मंत्र्यानी पुन्हां एकमेकांच्यात विचार-विमर्श केला. ह्यावेळी त्यांनी धन्वतंरी म्हणून प्रसिद्ध असलेल्या वैद्याला बोलावले व विचारले–"वैद्यमहाराज, आपण प्राण वाचविणाऱ्या औषधां बरोबर प्राण घेणारी औषधे सुद्धा जाणत असाल नां! मग राक्षसावर विषाचा प्रयोग करून त्याला मारण्याचा संभव नाही कां?"

"अत्यंत महान बलवान व्यक्तिला सुद्धा काही क्षणातच मारून टाकणारे कालकुट विषाचे ज्ञान मला आहे." राजवैद्य म्हणाला.

"पण काय ह्या विष प्रयोगाने तो राक्षस नक्की मरण पावेल नां!" मंत्र्यानी आपली शंका प्रगट करीत विचारले.

राजवैद्य स्मित हास्य करीत म्हणाला–"जर कां त्या विषाने तो राक्षस मरण पावला नाही तर ह्या जगात त्या सारखे दुसरे विषच पहावयास मिळणार नाही."

त्या दिवशी राजवैद्याने कालकुट विष तयार केले व राजवैद्याच्या हाती सोपविले दुसऱ्या दिवशी राक्षसाचा आहार बनणाऱ्या दोन तरुणांना मंत्र्यानी समजावित म्हटले–"तुम्हीं हे विष आपल्या मुठी मधे घट्ट धरून ठेवा तुम्हांला गिळता क्षणी हे विष सुद्धा राक्षसाच्या पोटात जाईल. ह्या चांगल्या करीता तुमचा प्राण गेला तरी राक्षसाला मारण्याचे यश तुम्हांलाच प्राप्त होईल. जोपर्यंत सुर्यचंद्र तळपत रहातील तो पर्यंत लोक तुमचे स्मरण करतील."

नेहमीप्रमाणे ठरलेल्या वेळी राक्षस आला व घष्टपुष्ट तरुणांना उचलून घेऊन गेला. व त्या दोघांना खाऊन त्याच्या सोबत त्यानी त्यांच्या बंद मुठीतले विष सुद्धा खाऊन टाकले. तरी सुद्धा विषाचा त्या राक्षसावर जरा देखिल काही परिणाम झाला नाही. त्याची पचनशक्ति भयंकर दांडगी होती. त्यानंतर दुसऱ्या दिवशी सुद्धा तो आणखी दोन तरुणांना उचलून घेऊन गेला.





राजा चतुरसेनाने राणीला व आपल्या मंत्र्यांना व राजपरिवाराला एकत्र जमवून म्हटले–"मी अनेक राज्यं जिंकून चक्रवर्ती राजा बनलो आजतागायत मी कोणासमोरही नतमस्तक झालो नाही. परंतु आता एका राक्षसाने मला असहाय्य करून सोडले आहे व माझ्या प्रजेला गिळंकृत करीत आहे. तो अशा तऱ्हेने माझ्या प्रजेतील लोकांचा नायनाट करत आहे हे मला डोळयाने पहावत नाही आता ह्या सिहासनावर बसण्याची माझी योग्यता राहीली नाही आता शेवटचा एकच उपाय राक्षसाबरोबर मी लढाई करून त्याचा प्राण तरी घेईन नाहीतर मी मरून जाईन.

तेव्हां सर्वांनी राजाला समजावित म्हटले–"हे तर आपणाहून मरण ओढून घेण्यासारखे कार्य आहे. तरी राजाने कोणाचेही म्हणणे मान्य केले नाही.

"आता राक्षसाला ठार केल्याशिवाय मला चैन पडणार नाही. एक तर त्याला ठार करीन नाहीतर मी राक्षसाच्या हाती मरेन व स्वतःला भाग्यवान समजेन" राजा चतुरसेन म्हणाला.

राक्षस जेव्हां दुसऱ्या दिवशी आला तेव्हां राजा चतुरसेन त्याच्यासमोर येत म्हणाला–"अरे ऐ राक्षसा. ह्या जगातील सर्व राज्यावर विजय प्राप्त केलेला चक्रवर्ती चतुरसेन राजा आहे. असे असतांना तू क्षुल्लक बनून माझ्यावर अधिकार गाजवितोस. जर मी तुझ्या बरोबरच्या लढाईत विजयी झालो तर माझ्या प्रजेच्या मागची तुझी कटकट तरी बंद होईल. आणि तू जर जिंकलास तर हे राज्य तुझे होईल." असे म्हणून राजाने म्यानेतून तलवार खसकन् बाहेर काढली.

राक्षसाने चतुरसेनाला मांजराच्या पिल्लाला उचलतात त्याप्रमाणे उचलून आपल्या तळहातावर बसवले. आणि विकट हास्य करीत विचारले–"अरे मरतुकड्या माझ्यावर विजय मिळविण्याची आशा बाळगतोस की काय?"

"हो हो, लढणे हे तर वीराचे लक्षण आहे जय किंवा पराजय हे दैवाधिन असते." असे म्हणत राजाने आपली तलवार जोरात राक्षसाच्या हातात खुपसली.

ते पाहून राक्षसाला तळहातात काही कांटा खुपसल्याचा भास झाला. परंतु त्या घावाने त्यातून रक्तस्त्राव सुरू झाला राक्षसाने त्यामुळे जाणून बुजुन दुर्लक्ष केले व तलवार खेचून घेऊन दूर भिरकावून लावली. आणि म्हणाला–"चक्रवर्ती, मी तुझ्या शौर्यावर अत्यंत खुष आहे. तुझ्यासारखा साहसी वीर दुसरा शोधूनही सांपडणार नाही. त्यामुळे तुला पहातच मला खूप बरे वाटले. आता मी तुझे राज्य सोडून निघून जाईन.

त्यावर राजा चतुरसेनाला खूप आश्चर्य वाटले त्याने राक्षसाला विचारले "तू कोण आहेस? माझ्या राज्यात कशासाठी आलास आणि आता कां जातोस?"

राक्षस म्हणाला–" मी पाताळ लोकात रहाणारा आहे. तेथील सर्व विद्यांमध्ये मी प्राविण्य मिळविले आमच्या राज्यात मला हरवणारा कोणीही राहीला नाही. पाताळ लोकातील राजाने सुद्धा माझ्या पराक्रमाची प्रशंसा करून मला राज्याचा सेनापती होण्याची सुचना केली. परंतु मी राजाला समजावले की मी जोपर्यंत माझ्याहून बलशाली पराक्रमी वीराचा सामना करू शकणार नाही तोपर्यंत मी कोणत्याही एका ठिकाणी स्थिर रहाणार



नाही. त्यावर त्यानी मला सांगितले की तू जर कां पृथ्वीलोकात संचार करशील तर तुला ती संधी प्राप्त होईल. येथिल अनेक देश व नगरा मध्ये गेलो. परंतु माझ्याशी सामना करणारा एकही शूर वीर मला सांपडला नाही बऱ्याच वर्षानंतर तुझ्या-सारखा साहसी वीर मला दिसला. माझी मनोकामना पूर्ण झाली. आता मी परत पाताळ लोकात परत जातो."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, चतुरसेनाने भोसकलेल्या तल-वारीचा आघात त्याला केवळ एखादा कांटा टोचल्या प्रमाणे भासला. अशा चतुरसेनला पराक्रमी आहे हे म्हणून घेऊन त्याच-बरोबर दुसऱ्याची मुखस्तुती करून अवहेलना करून घेणाऱ्यातील नव्हता ह्यामागाचे कारण काय? ह्या प्रश्नाची उत्तरे तू माहित असून दिली नाहीस तुला ठाऊक आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला–"राक्ष-साला पाताळ राजाने सेनापती पदावर नियुक्त करण्याचे आश्वासन दिले. त्यावरून ह्या गोष्टीचा खुलासा होता की, राजा राक्षसाहून शुर वीर पराक्रमी आहे नाहीतर राक्षसाने केव्हांच स्वतः राजाला पराभूत करून पाताळ लोकांचा राजा बनला असता. ह्याचाच अर्थ की राक्षसापाशी राजाबरोबर युद्ध करण्याची कुवत नव्हती. लढणारा माणूस साधारण लढवय्या म्हटला जातो परंतु उसन्या शक्ति सामर्थ्याहून जास्त बलवान असलेलाच साहसी वीर म्हटला पाहिजे. हि गोष्ट समजून येताच राक्षसांने ताडले की, साहसाच्या बाबतीत आपण राजाची बरोबरी करू शकणार नाही. त्यामुळे त्यानी राजाचे कौतुक व अभिनंदन केले व तो पाताळ लोकात निघून गेला.

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



आपली देवळे :

## चांमुण्डेश्वरी

प्राचीनकाळी महिषासुर नावाचा भयंकर राक्षस मदोन्मत्तपणे तिन्ही लोकांवर हल्ला करून विजय प्राप्त करू लागला.




देवदेवतांनी पुष्कळ वेळा त्यांच्या लढ्याला तोंड दिले. परंतु प्रत्येक युद्धात महिषासुरालाच विजय मिळत गेला. त्याची ती निघृण कृत्ये पाहून पृथ्वी लोकथरथर कांपू लागला. ते पाहून तर तो राक्षस जास्तच चेकाळला लोकांना सतावू लागला.





देवतांनी न रहावून विष्णुपाशी जाऊन प्रार्थना केली की, महिषासूर राक्षसाची आमच्या पाठची कटकट थांबवा विष्णुनी त्यांना आज्ञा केली. की त्यांनी एक यज्ञ आरंभ करावा. देवतांनी सामुग्री जमवून यज्ञ केला व त्या यज्ञकुंडाच्या सभोवताली बसून त्यांनी प्रार्थना सुरू केली. त्यांच्या प्रार्थनेला संतुष्ट होऊन यज्ञकुंडातून दुर्गादेवी प्रत्यक्ष झाली.



दुर्गादेवीला शंकर भगवानांनी आपला त्रिशूळ दिला इंद्राने तिला वज्रायुध दिले. अशा प्रकारे अनेक देवतांकडून अनेक प्रकारची आयुधे व शक्ति प्राप्त करून, ती एका अद्भुत अशा सिंहासनावर बसून विन्ध्याचलच्या दिशेने निघून गेली.

महिषासुराने दुर्गादेवीचे ते अनुपम सौंदर्य नुसते ऐकलेले होते. परंतु त्याने प्रत्यक्षात तिला पाहिले व तो भान हरपून बसला त्याने तिच्याजवळ असा निरोप पाठविला की, तिने आपल्या बरोबर विवाह करावा. त्याला दुर्गादेवीने स्पष्ट नकार दर्शविला. तेव्हां महिषासुराला भयंकर राग आला.





महिषासुराचे अनुयायी दुर्गादेवीला पकडून कैद करण्याच्या विचारात पाठोपाठ जाऊ लागले. परंतु ते सर्व एका पाठोपाठ गतप्राण झाले. सर्वात शेवटी महिषासुराने तिचा पाठलाग केला. तेव्हां दुर्गादेवीने महिषासुराला आपल्या आयुधांनी ठार करून त्याच्यापासुन होणारा त्रास थांबवला व जगाचे कल्याण केले

महिषासुराला ठार केल्यानंतर दुर्गादेवीने एका उंच डोंगरावर बसून थोडी विश्रांती घेतली. ह्यानंतर ती जागा एक पवित्र क्षेत्र म्हणून प्रसिद्ध झाली.





म्हैसूर राज्यापासून तेरा किलोमिटर लांब चामुंडी म्हणून हा पर्वत प्रसिद्ध आहे. ह्याच पर्वतावर चामुंडेश्वरी म्हणजे दुर्गामातेचे देऊळ स्थापन झालेले आहे.

समुद्रतळापासून ३,४८९ फूट उंचीवर असलेल्या ह्या दिव्य क्षेत्री जावयाचे झाले तर एक हजार पायऱ्या चढून जाव्या लागतात. ह्याच पर्वतावर चामुंडेश्वरीदेवी बरोबर एक महाबळेश्वर नावाचे एक शंकराचे देऊळ आहे.





डोंगराच्या अगदी शिखरावर जायच्या वाटेत एक अत्यंत प्रचंड अशी नंदीची मूर्ती आहे हि एका अखंडखडकात कोरलेली आहे. मुर्तीच्या गळ्यातील घंटा सुद्धा त्याच दगडात कोरलेल्या आहेत. त्या पाहून यात्रेकरूना अत्यंत आश्चर्य वाटते त्या घंटापाहून असे वाटते की त्या लोखंडी बनविलेल्या असाव्यात.

देवळाच्या गाभाऱ्यातील देवीची मुर्ती सोन्याच्या सिंहासनावर आरूढ होऊन मोठ्या दिमाखाने सुशोभित केलेली आहे. देवळाच्या सभोवताली सुद्धा नैसर्गिक मनमोहक दृश्ये दृष्टीस पडतात.





ह्या डोंगराच्या टोकाला असलेल्या देवळात पोहोचावयाचे म्हणजे प्राचीन काळी काही सोई उपलब्ध नव्हत्या. तरी भक्त लोकांची गर्दी कायम असे. आज तेथे जाण्यासाठी अनेक सोई करण्यात आल्या आहेत. येथे दरवर्षी नवरात्र उत्सवात देशातील कानाकोपऱ्यातून भक्तगण येऊन दर्शन घेतात.



# पंचव्याघ्रशूर

शंभर वर्षापूर्वी चीन देशात एक गरीब माणूस रहात होता. तो लाकूड कापून स्वतःचे व आईचे पोट भरीत असे.

थंडीचे दिवस होते. एके दिवशी संध्याकाळच्या सुमारास तो माणूस डोंगरदरीत लाकूड कापीत असतांना जवळच्याच कांटेरी झुडपातून कसला तरी कण्हण्याचा आवाज ऐकू आला. इतकी झाडे घनदाट होती की पलीकडचा माणूस दृष्टीसही येत नव्हता. त्याला उत्सुकता लागली.

तो खांद्यावर कुऱ्हाड ठेऊन त्या काटेरी झाडाच्या रोखाने दबकत निघाला. तो जसा जसा आवाजाच्या रोखाने निघाला तसा कण्हण्याचा आवाज स्पष्ट ऐकू आला. त्याने मोठ्या सावधपणे त्या झाडीत पाय घातला कारण ते बांभळीचे रान पांच वर्षापूर्वी कापले असल्यामुळे त्याचे कांटे इतके धारदार झाले होते. की चुकून पाय पडला तर कापेल.

लाकुडतोड्या सावधपणे झुडपे बाजूला सारीत पुढे गेला. तेव्हां त्याला एक वाघिण दृष्टीस पडली. तिच्या एका पायात बाभळीचा कांटा खोल रूतला होता. त्याकारणाने ती हलण्याच्या स्थितितही नव्हती व जोरजोरात कण्हत होती. प्रथमतः जेव्हां त्या लाकूडतोड्याला तीं वाघिण दिसली तेव्हां तो जरा घाबरला परंतु वाघिणीने त्याच्याकडे दिनपणे पाहिल्यावर त्याला दया आली.

त्यानंतर तो पळत घरी येऊन पोहोचला व आपल्या आईला म्हणाला–" आई, त्या डोंगरावरच्या बाभळीच्या झुडपात एक वाघिण कांटा पायात रूतून विव्हळत आहेग! आपण कसे तरी तिला वाचवू या नां! तू सुद्धा माझ्या बरोबर चल नां तिच्यां मदतीला.

" हो कां! बाळा, ठिक आहे थोडा थांब. तिच्या जखमांना लावायला मी



काही औषध मलम घेते" आई त्याला म्हणाली.

थोडया वेळातच ते दोघे वाघिण जेथे पडली होती तेथे आले. आईने त्या वाघिणीला सांत्वनापूर्ण शब्दात आंजारले गोंजारले व मुलाने तेवढया अवधित तिच्या पायातील कांटा खस्‌कन बाहेर काढला. त्या संकटातून मुक्त झाल्या बरोबर त्या वाघिणीने त्या दोघाकडे पाहून गुरकावले नाही. परंतु त्यांच्याकडे कृतज्ञतापूर्ण नजरेने पाहिले नंतर आईने त्या वाघिणीच्या जखमांना मलम चोपडले नंतर एकदम ती दोन पावले मागे झाली व तिचा निरोप घेण्यासाठी औपचारीक रूपात म्हणाली–

"वाघिण ताई, आम्ही खूप गरिब आहोत. माझ्या मुलाबरोबर कोणत्याही मुलीचा बाप लग्न करून देण्यास तयार नाही. जर कां तुझ्या कोणी माहितीतील मुलगी असली तर माझ्या मुलाचे लग्न लावून त्याला एक गृहस्थ बनव. तुझे फार उपकार होतील आमच्यावर" असे केविलपणे म्हणून ती आपल्या मुलासोबत घरी आली.

थंडीचे दिवस संपायला काही अवधी बाकी होता. तेव्हा एके दिवशी एका श्रीमंताची मुलगी लग्ना साठी आवश्यक सामुग्रांनिशी आपल्या सासरी निघाली होती. नवरी मुलगी पालखीत बसलेली होती. पालखीत बरोबर पुढे मागे काही भोई लोक सामानसुमान लादून घेऊन चाललेले होते.

अचानक त्यांच्या वाटेत चार वाघ त्यांचा रस्ता अडवून बसलेले त्यानी पाहिले बसल्या बसल्याच ते जबडे आवासून डरकाळया काढत होते. त्यांना पहाताच सर्वांची बोबडी वळली. ते जिवानिशी सामान सुमान तेथेच सोडून पळून गेले. वधू पालखी बाहेर येऊन पळून जाण्याच्या विचारात होती. तिने बाहेर पावूल टाकतांच पांच वाघ समोर बसलेले तिने पाहिले वाघांशिवाय दुसरे कोणीही जवळपास नव्हते. त्यानंतर कोणी लाकुडतोडयाच्या दारावर ठोठावले.





त्या तरुण लाकूड तोडयाने जाऊन दार उघडले तेव्हां दाराबाहेर एक साजशृंगार केलेली तरुण वधू उभी असलेली व तिच्या पाठीमागे पांच वाघ उभे असलेले पाहिले त्या लाकूडतोडयाला वाटले की वाघ त्याच्याकडे पाहून मंदहास्य करीत आहे.

त्यानंतर त्या लाकूडतोडयाने तिच्या बरोबर लग्न केले. ती तरुणी पती व सासूचा खूप मान राखीत राहली त्याचे उभयातांचे आयुष्य खूप सुखाने जाऊ लागले. परंतु काही दिवसातच त्या तरुणीच्या पित्याला समजले की तो डोंगरापलीकडे रहाणारा व गरीब लाकुडतोडया आहे व आपणतर एक श्रीमंत व प्रतिष्ठित दूरदूर पर्यंत आपला प्रभाव आहे. त्यामुळे त्याला अतिशय संताप आला. त्याने कोर्टात त्या मुलाविषयी तक्रार नोंदवली की त्या दोघांनी माझ्या मुलीला पळवून नेऊन लग्न लावले तेव्हां न्यायाधिशान त्या दोघांना कोर्टात बोलावून घेतले.

तेव्हां लाकुडतोडयाने स्पष्ट सांगितले– "मी मुलीला पळवून नेले नाही. त्या तरुणीला वाघ स्वताहून घेऊन आले व माझ्या घरी आणून सोडून गेले. परंतु न्यायाधिशाला त्याच्या म्हणण्यावर विश्वास झाला नाही त्याने आपल्या शिपायांना आज्ञा केली की, तो खरे सांगे पर्यंत त्याला फटके मारा."

तेव्हां त्या मुलाची आई न्यायाधिशाचे पाय पकडून म्हणाली–"सरकार, माझा मुलगा खरे सांगतो आहे. मी पाहिजे तर



तुम्हाला वाघांकडून साक्ष देववते. त्या बाईचे बोलणे न्यायाधिशाला विचित्र वाटल तरी त्याने तिला आश्वासन देत म्हटले– " ठिक आहे. तू साक्षीदार घेऊन ये."

त्यानंतर त्याची आई निघून गेली. आणि थोड्यावेळातच परत आली. तिच्या पाठोपाठ पांच वाघ दमदार पावल टाकीत येत होते. ते पहाताच कोर्टातील लोकांची घाबरगुंडी उडाली ते सर्व लोक सैराबैरा पळू लागले. न्यायाधिश तर त्यातल्या त्यात उंच टेबलावर चढून बसला व थरथर कांपत त्या वाघाकड दृष्टीक्षेप टाकीत म्हणाला–" तुम्ही लोक...? ह्यानंतर त्याच्या तोंडून आवाजही फुटला नाही.

वाघांनी अशा तऱ्हेने मान हलविली की जणूकाही ते न्यायाधिशाच्या प्रश्नाला उत्तर देत आहेत. नंतर तो तरुण त्याच्या आईला घेऊन घरी आला.

त्याच वर्षी उन्हाळयात जंगलातील हजारो लोकांनी राज्यावर हल्ला केला त्याच्या सोबत अस्वले शिकारी कुत्री व माकडे होती. चक्रवर्तीचे सैन्य त्याच्याशी तोंड देण्यासाठी तेथ येऊन पोहोचले. परंतु त्या जंगली लोकांशी त्याला तोंड देता आले नाही. तेव्हां असे वाटू लागले की आता बहुदा राजाचा पराजय होणार व प्रतिष्ठा धुळीला मिळणार तितक्यात कोणी एकाने येऊन राजाला असे सांगितल की इथं जंगलात एक लाकुडतोड्या आहे त्याच्या जवळ पांच वाघ आहेत त्या वाघांची जर कां मदत घेतली तर आपला जय नक्कीच होईल. तेव्हा चक्रवर्ती राजाने त्याला बोलावणें धाडले व म्हटले–" जर कां तू त्या दुष्टांना पळवून लावलेस तर तुला मी सेनापती पदावर नियुक्त करेन."

ती रानटी माणसे ते पांच वाघ पहाताच घाबरून पळून गेले. मग काय? चक्रवर्ती राजाचा जय झाला. राजाने मोठ्या शास्त्रविधिपूर्वक लाकुडतोड्याची मुख्य सेनापतीच्या पदावरनेमणुक केली व पंच व्याघ्रशूर हि पदवी बहाल केली व मोठे वेतन देऊन दरबारात नेमले.






शुक आणि श्रेष्टपद नावाच्या आपल्या दोन मंत्र्यांना बरोबर घेऊन कुबेर मोठ्या अभिमानाने रावणाकडे गेला आणि म्हणाला–" हे बध रावणा, माझ्या म्हणण्याकडे तू लक्ष देत नाहीस. परंतु याचा परिणाम चांगला होणार नाही. त्याचा दुषपरिणाम तुला नक्की भोगावा लागेल. हे नक्की याची प्रत्यक्ष प्रचिती आल्याशिवाय तुला सुबुद्धि कोठून येणार. तुला कांहीही सांगण्यात अर्थ नाही. तरी मी मोठा भाऊ म्हणून तुला सांगतो. असे एकंदरीत मनापासून वाटले.

नंतर ह्या दोघा भावांमध्ये एकमेकांच्या घमेंडीमुळे न ऐकता द्वंद्वयुद्ध सुरू झाले. बरेच काळ युद्ध टिकले. कुबेराची सर्व शस्त्रें रावणाने निष्प्रभ करून टाकली आणि रावणानें मायाजाल युद्ध करण्यास प्रारंभ केला. त्यामुळें कुबेराला एकाएकी अदृश्य रावण कोठें दिसलाच नाही.

शेवटी रावणाने असावधपणे कुबेराच्या डोक्यावर गदेचा प्रहार करून त्याला बेशुद्ध पाडले. कुबेर रक्तबंबाळ झालेला पाहून धावतपळत संपत्तिच्या देवतांनी त्याला नंदनवनात नेले व त्याच्यावर उपचार करून त्याची सुश्रुषा केली.

अशा प्रकारे कुबेरावर विजय मिळवून रावणानें त्याचे पुष्पक विमान हस्तगत केले. आणि तो शरवण पर्वताकडे निघाला. तो सुवर्णकांति पर्वत जणूं सूर्यप्रमाणें तळपत चमकत होता. विमान



पर्वताजवळ येताच त्याची गति कुंठित होऊन ते एकदम स्थिरावले.

विमान एकाएकी थांबलेले पाहून रावणाला आश्चर्य वाटले त्यानें आपल्या मंत्र्यांस विचारले. हे इच्छा शक्तिच्या बळावर चालणारे विमान एकदम थांबले का?" ह्यापाठीमागे कोणते गुढ आहे.

त्या बरोबर शंकराचा पार्श्वरक्षक नंदीश्वर पुढें होऊन त्याला समजावत म्हणाला–"दशग्रीवा, तूं आत्ताच्या आत्ता येथून निघून जा. तुझे इथे येणे ह्यावेळी बरोबर होणारे नाही.

ह्या पर्वतावर सध्या शिवपार्वती एकांतात आहेत. त्यांना कोणी आलेले पसंत पडणार नाही. शिवाय सुशेण, नाग, यक्ष, दैत्य दानव राक्षस वगैरे तुझ्या सारख्या असणाऱ्यांना ह्या पर्वतावर येण्याची तर सक्त मनाई आहे.

हे ऐकताच रावण एकदम् संतापाने लालीलाल झाला व विमानातून उतरून पर्वताजवळ आला, आणि मोठ्याने ओरडून म्हणाला–"कोण तो शंकर!"

त्यानें पर्वतावर पाहिले तेव्हां त्याला प्रत्यक्ष महादेव आणि त्रिशूल हातांत घेऊन शंकरासारखा दिसणारा नंदीश्वर दिसला.

त्याला त्या नंदीचे तोंड माकडासारखे दिसले म्हणून तो मोठ्याने खदाखदा हंसला. त्यावर क्रोधित होऊन नंदीने रावणाला शाप देत म्हटले–"माझ्याकडे पाहून तोंडवाकडे करून तूं हंसलास तेव्हां अशाच तोंडाच्या आणि अशाच माझ्याप्रमाणे अचाट शक्तिच्या वानरा कडून तुझा आणि तुझ्या वंशाचा सर्व नाश होईल."

रावणाचा क्रोध अनावर होऊन तो आकांडतांडवाने म्हणाला–"माझ्या विमानाला आडवणाऱ्या या पर्वतालाच मी उपटून टाकू शकतो." असे म्हणून त्यानें रागारागाने पर्वत उपटवला त्या सरशी रावणाचा स्वतःचा हात पर्वताखाली सापडून ब्रह्मांडाला कानठळ्या बसतील एवढ्या मोठ्यानें तो ओरडला.





त्याची केविलवाणी स्थिति पाहून त्याच्या मंत्र्यांनी त्याला शंकराची प्रार्थना करण्याची विनंती केली. नाइलाजाने व्याकुलतेने त्याने शंकराला प्रसन्न करून घेऊन आपली सुटका करून घेतली.

आशुतोष शंकरानें प्रसन्न होऊन त्याला वरदान पण दिले. म्हटले–"मी तुझ्या स्वरशक्तिवर प्रसन्न आहे. ह्यापुढे तूं रावण ह्या नावाने ओळखला जाशील." ह्यामुळेच त्याला रावण हे नाव पडले.

रावण हात जोडून प्रार्थना करीत शंकराला म्हणाला–"मला पूर्वीच देवी देवतांकडून अभय आणि दिर्घायुष्याचे वरदान ब्रह्मदेवाकडून मिळाले आहे. मानवाची मला पर्वा नाही. तरी आपण माझ्यावर संतुष्ट झालात म्हणून मी आपणाकडून आणखीं दोन गोष्टीची अपेक्षा करतो. ती तुमच्याकडून मला प्राप्त व्हावीत अशी इच्छा आहे. एक तर प्रदिर्घ आयुष्य आणि दुसरे आयुध."

शंकराने 'तथास्तु' म्हणून चंद्रहास नावाचे खड्ग दिले आणि म्हणाला–"ह्या खड्गाचा किंचित जरी अपमान झाला तर लगेच ते माझ्याकडे परत येईल." ह्या गोष्टीची लक्षपूर्वक आठवण ठेव.

रावणाने आनंदानें ते खड्ग घेतले व येऊन विमानांत बसून सर्व पृथ्वीवर संचार करून देशोदेशीच्या लोकांना त्रास देऊं लागला. कांही त्याच्याशी लढून मृत्यू पावले, काहींनी त्याची स्वाधीनता मानली. त्यांनी पृथ्वीवरील सर्वांना नको नकोस करून टाकले.

असाच संचार करीत असता रावण एकदा हिमालय पर्वतावर गेला. तेथे त्याला एक सुंदरी जटा वल्कल धारण करून तप करत बसलेली दिसली. तिचे सौंदर्य पाहून रावण मंत्रमुग्ध झाला. रावणाने मोठ्या आपुलकीच्या आविर्भावाने जवळ जात तिला विचारले कि तू हे असे कठोर तप कां करते आहेस? त्या पाठीमागचा तुझा उद्देश काय?



ती म्हणाली–"बृहस्पतिचा पुत्र जो कुशध्वज ते माझे वडील. माझें नांव वेदवती माझ्यासाठी अनेक देवता गंधर्व वगैरेनें माझ्या वडिलांच्या जवळ लग्नासाठी मागणी केली पण त्यांना त्यापैकी कोणीही पसंत पडत नव्हते. परंतु विष्णुला जावई करून घेण्याची त्यांची मनोकामना व त्याच बरोबर फार इच्छा होती म्हणून त्यांनी इतर सर्वांना नकार दिला.

ह्यावर दंभु नावाच्या एका राक्षसाने माझे वडील झोपेत असतां त्यांना मारून टाकले. त्यांच्या पाठोपाठ माझी आई सती गेली.

वडिलांच्या इच्छेप्रमाणें मी विष्णुला आपला पति मानून त्याच्यासाठी तप करते आहे. तू त्यात काहीही विघ्न न आणता ताबडतोब आता तूं येथून निघून जा."

"हे सुंदरी, अशी उन्मत्त होऊ नको. तुझे ते अनुपम तारूण्य व आपले यौवन सौंदर्य असे व्यर्थ घालवूं नकोस विष्णु असा कोण मोठा लागला आहे. माझ्याकडे लक्ष देऊन पहा तरी? मी लंकाधिपती आहे. चौदा चौकड्याचे राज्य माझ्याकडे आहे शिवाय माझे तपोबल ही भरपूर आहे. तू माझी पत्नी हो, तुला सर्व वैभव उपभोगायला मिळेल." एवढी तरी माझी मनोकामना पूर्ण कर.

"लंपटा! आवर आपली निच वाणी." वेदवतीचे हे शब्द ऐकतांच रावणानें दुष्ट पणाने तिचे तावातावाने रागाने केस धरून खसकन् ओढले. त्या बरोबर तिने आपल्या हाताने आपल्या जटा उपटून टाकल्या आणि क्रोधाग्नि प्रज्वलित करून म्हणाली–"नीचा! अवमानित मी अग्नि प्रवेश करून मरून जात आहे. पण तुझा नाश करण्यासाठी मी आयोनिज अशी पुन्हां भूतलावर प्रगट होईन व तुझा सर्वनाश करेन."



हीच वेदवती म्हणजे पुढच्या जन्मीची सीता, हीच रावण लंकाधिपतीच्या नाशाला कारण झाली.

असाच संचार करत असतां रावण राजा मरुत्तच्या यज्ञ मंडपांत गेला. तेथे सर्व देव एकत्र गप्पा करीत बसलेले होते. बृहस्पतिचा धाकटा भाऊ संवर्त आद्यपुरोहित होता. रावणाला पाहून सर्व घाबरून गेले.

दिक्पालासह सर्व देवांनी विविध प्राण्यांची रूपे घेतली. रावण तेव्हां सरळ राजा मरुत्ताकडे जाऊन म्हणाला– "बोल, राजा तु माझ्याशीं युद्ध करतोस का माझी अधिनता मानतोस?" तुला काय करणे योग्य वाटते आहे.

"अरे! अगोदर तू आहेस कोण हे तरी सांग? तुझा परिचय दिल्यावर योग्य अयोग्य ह्यांचा निवाडा करेन." राजा म्हणाला.

"माझें नाव ऐकले नाही असा त्रिलोकात कोणी नसेल. तु माहीत नाही म्हणतोस? तूं कधी रावणाचे नांव ऐकले आहेस? तोच मी रावण. बघ माझ्या पराक्रमाने मी माझ्या मोठ्या भावाचे हे विमान हिरावून घेतले आहे." मोठ्या गर्वात फुलून जाऊन घमेंडीत रावणाने सांगितले.



"वडीला समान मोठ्यां भावाशीं युद्ध करून त्याला पराभूत करण्याने काय एवढा मोठेपणा मिळविलास? अशा दुष्टाचा शिरच्छेदच केला पाहिजे. थांब...." असे म्हणून तावातावाने राजा मरुत्ताने धनुष्य उचलले.

संवर्तने राजाला अडवले. म्हणाला– "राजन्, अशी घाई गर्दी करूं नका. हा महेश्वर यज्ञ मध्येंच थांबलां तर वंशक्षय होईल आपण सध्या यज्ञदीक्षेत आहांत इतक्यात विसरलात काय? तेव्हां युद्ध करणे बरे नांही आणि दुसरे हा दुर्जय आहे. हे आपल्याला माहीत आहे नां?"



पुरोहिताचे वचन मानून राजा यज्ञवेदी जवळ येऊन बसला. हे पाहून रावणाचा मंत्री शुक खुश होऊन ओरडला–"राजा रावणाचा विजय असो. विजय असो! मग तेथे जमलेल्या काही ऋषिमुनींचे भक्षण करून त्रास देऊन रावण आल्यावाटेने निघून गेला.

रावण निघून गेल्यावर रूपे पालटलेल्यांनी आपली पूर्व वत रूपे धारण केली, कांहींनी ज्यांची रूपे घेतली होती त्यांना वर प्राप्त झाले.

इंद्राने मोरांना सुंदर रंग दिले, सहस्र नेत्रांचे लावण्य त्यांच्या पिसांत घातले, सापापासून अभयदान दिले आणि आकाश भरून आले असतां आनंदाने थुई थुई नाचण्याची वृत्ति दिली. त्यांना पहाताच मानवाला प्रसन्न वाटावे असे रूप त्यांनी मोरांना दिले.

यमराजाने कावळयांना रोग मुक्त केले, त्यांचा सहज मृत्यू दूर केला. कावळयांना खाऊं घालून संतुष्ट केल्यास स्वर्गात पितर संतुष्ट होतील असा ही वर दिला. त्यामुळे मानव जातीत काकबळी देण्याची प्रथा पडली.

वरुणाने हंसांना समुद्रफेसाप्रमाणें शुभ्र-पांढरारंग देऊन सुखमय असे नल विहाराचे जीवन दिले.

कुबेरानें सरडयाला सोनेरी रंगाचे वरदान दिले.

रावण पुष्पक विमानांतून सतत संचार करीत होता आणि प्रत्येक राजाला प्रश्न करीत होता–"माझ्याशी युद्ध करणार का? आपला पराजय मान्य करणार." असे प्रत्येकाला विचारत आव्हान देत तो पुढेपुढे जात राहला.

त्याने दुष्यंत राजाला तसे विचारले त्यांनी हार मान्य केली. दुष्यंत, तसेच एकापोठापाठ अनेक राजांना त्यांनी आव्हान दिले. गाधी, गय, पुरूरव वगैरे राजाने रावणाला दुर्जय मानून आपली हार मान्य केली.



पण अयोध्येचा राजा अनरण्याने रावणाला युद्धाचे आह्वान दिले. ह्या युद्धांत अनरण्याची सर्व सेना नष्ट झाली. अग्नित कीडा मुंगी मरावे तशी सर्व प्रजा पटापट मरून गेली.

नंतर द्वंद्व युद्धांत अनरण्य राजाच्या शरिरावर कांहीही परिणाम झाला नाही. शेवटी रावणाने त्याच्या डोक्यावर जोराचा एक गुद्दा मारला त्या बरोबर राजा विव्हळत खाली कोसळला.

मरण्यापूर्वी त्याने संतापाने रावणाला शाप दिला कि ईक्ष्वाकु वंशातील राजाच्या हातीच तुझे मरण निश्चित आहे आणि तोच तुला मारील आणि तो गतप्राण झाला. इतरांना त्याच्या मरणाचे फार दुःख झाले.

रावण असाच गर्वाने फुलून मस्तीनी सर्वांना त्रास देत, कष्ट देत, पुष्पक विमानातून आकाशांत विहार करीत असतां एक दिवस अचानक त्याची नारदाची गाठ पडली.

दोघांनी एकमेकांचे क्षेम कुशल विचारलें. बोलण्याच्या संदर्भात नारद म्हणाला–"रावणा तू अद्वितीय बलशाली आहेस. तुझा सर्वत्र दरारा आहे. मला त्याचे फार कौतुक वाटते. देवीदेवता इच्छा असून सुद्धा तुला हारवू शकत नाहीत.



पण मला हें समजत नाहीं की तू त्या निरपराध क्षुद्र मानवांच्यावर आपला पराक्रम कशाला दाखवतोस? तुला तुझा पराक्रम दाखवायला दुसरा कोणी भेटला नाही कां?

ते तर आधीच आपल्याच आधिव्याधि, म्हातारपण, संकटे यांनी गांजलेले असतात. त्यांना मारून तूं काय मिळवतोस त्यांना मृत्युदंड यमराज देतोच आहे.

वीरांनी वीरांशी युद्ध करावे. तू प्रत्यक्ष यमराजाला युद्धांत मारून संपूर्ण नरलोक आपल्या हातात घेऊं शकतोस.

"नारदा! मी भू-पाताळ आणि स्वर्ग लोक वगैरे प्रथम आपल्या अधिकारांत

आणणार आहे. नंतर समुद्र मंथन करून अमृत मिळविण्याच्या दृढ विचारांत आहे. त्याने आपल्या मनांतली इच्छा स्पष्टपणें नारदा समोर उघड केली." रावणानें सांगितले.

"अरे यमलोक तर ह्या इथे मागच्या बाजूस आहे. तो सोडून आणखी कशाला कुठे जातोस? हा रस्ता सरळ यमलोकाकडेच जातो आहे." नारद म्हणाला.

ह्यावर हंसून रावण म्हणाला–"बरं बाबा सांगितलस. मी आत्ता जाऊन त्याच्यावर स्वारी करतो.

नाही तरी मी ह्या पुर्वीच चारी दिक्पालांच्यावर विजय मिळविण्याची प्रतिज्ञा केलीच आहे आता त्या कार्यात विलंब कशासाठी सर्व सैन्यासह हा निघालो. असे म्हणत रावण त्याचा रोख न ओळखता निघण्याची तयारी करू लागला.

हा रावण आता मागेपुडे न पहाता प्राणिमात्रांना मृत्यूचे भय दाखवून घाबरवून सोडणाऱ्या त्या यमाचा मी प्राण घेण्यास निघतो." एवढे बोलून रावणाने नारदाला नमस्कार केला आणि त्याचा निरोप घेऊन आपल्या मंत्र्यांबरोबर दक्षिण दिशेला यमलोकाच्या मार्गावर चालूं लागला. त्याला तेथें जाण्यास बराच काळ लागला.

तेवढ्याने नारदाने विचार केला कि मृत्यूचा अधिकारी यम. ह्याचा प्राण रावण कसाकाय घेऊ शकेल? युद्धांत कसा रावण यमाचा पराभव करील? हे कदापी शक्य तरी आहे का? त्याला उमग न पडल्यामुळे त्याने जाऊन प्रत्यक्षच पाहण्याचा विचार केला आणि तोही रावणाचा पाठोपाठ निघाला. तो जसा जसा जाईल तसा तसा त्यांच्या पाठोपाठ लपत छपत नारदही उत्सुकतेने निघाला.





# प्रामाणिकपणा

भूसूरपुर नगरांत विश्वनाथ नांवाचा एक गरीब अनाथ मुलगा होता. त्याची आई त्याच्या जन्माच्या वेळीच मेली आणि बाप तो पांच वर्षांचा असतांना सांप चावून मेला.

आईबापाच्या मुळावर आलेला असा अपशकुनी म्हणून त्याच्या कोणीही नातेवाईकांनी त्याला जवळ केले नाही.

गांवकरीच त्याच्यावर दया करून जे काय देतील त्याच्यावरच तो आपले दिवस कंठित असे. तो ही अगदी उनाडक्या करीत नसे. यथाशक्ति लोकांची मदत करीत असे.

विश्वनाथ कामसू होता. त्याच्या कामावर सर्वजण खुश असत. आता तो थोडा मोठाही झाला होता. म्हणून पूर्वी अनाथ म्हणून जे काही देत असत ते लोक आता त्याच्याकडून काम करून घेऊन मजुरीच्या रूपाने त्याला मदत करीत असत.

आणखी काही वर्षे अशीच गेली. आता विश्वनाथ उमदा तरुण झाला होता. त्याच गांवच्या सरपंचाला विश्वनाथने बरेच वेळा बऱ्याच कामांत मदत केली असल्यामुळे त्याच्याबद्दल धर्मदासला सहानुभूती वाटू लागली होती. धर्मदासला वाटले की, आता त्याला स्वतःच्या पायावर उभे राहता येईल.

एक दिवस धर्मदासाने विश्वनाथला जवळ बोलावले आणि म्हणाला–"मी तुझ्या कामावर, तुझ्या नेक व्यवहारावर खुश झालो आहे. मला तू स्वावलंबी व्हावेस असे वाटते. म्हणजे स्वतंत्रपणाने तू राहूं शकशील. त्यासाठी तुझी काही मदत करावी असा माझा विचार आहे. त्यासाठी तू माझ्या गोठ्यातील आपल्या पसंतीच्या चार म्हशी निवडून घे. त्यांचे दूध विकून तू दुधाचा धंदा कर आणि सुखाने रहा.



जेव्हां तुला पुरेसा पैसा मिळेल तेव्हां तू म्हशींची किमत दे व कर्ज चुकते कर.

विश्वनाथाने आपली कृतज्ञता व्यक्त केली आणि धर्मदासाच्या गोठयांत जाऊन चांगल्या दुभत्या चार म्हशी घेऊन गेला. नतर एका चांगल्या मुहूर्तावर त्याने धंदा सुरू केला. तो सरळ व्यक्ति असल्याने चांगले दूध थोडया किमतीत विकू लागला.

त्याच गावांत कलिंग नांवाचा दुसरा एक गवळी होता. तो पाणी मिसळून दूध विकण्यात फार पटाईत होता.

विश्वनाथचा व्यवहार पाहून एक दिवस कलिंग विश्वनाथला म्हणाला—"अरे, तू दुधाचा व्यापार करतो आहेस. हा काही दानधर्म नाही. तुला आपला नफा नको का पहायला. पैसा मिळविल्याशिवाय तुझे पोट कसे भरणार आणि धर्मदासचे कर्ज कसे फेडणार? असे धारेचे दूध कमी किमतीला विकून कुठे पैसा मिळत असतो? तुला दुधाचा धंदा करायचा आहे. तर मी सांगतो ते ऐक. दुधांत थोडे पाणी मिसळ आणि ते विक."

"हे सर्व खरे आहे रे. पण हे गांव माझे आहे. हे लोक माझे आहेत. त्यांच्या आश्रयावरच मी आजपर्यंत वाढलो. अशा लोकांना पाण्याचे दूध घालायचे म्हणजे आपण आपल्यालाच फसवल्यासारखे नाही का होणार? छे बुवा ते काम माझ्या हांतून होणार नाही. मी खऱ्याचा व्यापार करणार. त्यांत जेवढे मिळेल तेवढे पुरे.

क्षेमेंद्राच्या मुलीच्या लग्नांत विश्वनाथने त्याची खूप मदत केली होती. एक दिवस क्षेमेंद्र आपल्या घराच्या कट्टयावर बसला होता. विश्वनाथला समोरुन जाताना पाहून त्याला बोलावून क्षेमेंद्रने विचारले—"काय रे तू म्हणे कसला तरी व्यापार सुरू केला आहेस? कसला व्यापार करतो आहेस? कसा काय चालला आहे धंदा?"

"काय सांगू तुम्हांला दुध विकून जेवढे पैसे मिळत आहेत त्याच्या पेक्षा किती तरी जास्त पैसे गुरांच्या चारापाण्याला खर्च होत आहे. कसे काय त्यातून निभावून न्यावे काही कळत नाही." विश्वनाथ म्हणाला.

"माझ्या घरासमोर ही जी रिकामी जमीन पडली आहे. तिची मशागत करून त्यांत भाजीपाला लाव आणि तो विक. त्यांत तुला पैसा मिळेल." क्षेमेंद्रने सुचविले.

विश्वनाथला ते पटले. त्यानी क्षेमेंद्राची सूचना मान्य केली. लगेच तो धर्मदासकडे गेला आणि म्हणाला—"दादा, दूधाच्या व्यापारात मला काही मिळकत होतेशी वाटत नाही. मी आत्तापर्यंत काही ही जमवू शकलो नाही. म्हणून मी आपल्या म्हशी परत करायला आलो आहे.

क्षेमेंद्राच्या सांगण्याप्रमाणे विश्वनाथने त्या पडीक जमिनीची मशागत करून भाजीपाला लावला. त्याचा व्यापार सुरू झाला. मळयातून भाजी उपटून आणल्यावर ती साफसूफ करून व्यवस्थित जुडया बांधून विकू लागला पण कमी किमतीला. आपल्या कष्टाची मजुरी सुद्धां त्यांत निघत नसे.

चक्रधर नावाचा एक भाजीचा व्यापारी त्याला म्हणाला—"तुझी भाजी चांगली आणि साफसूफ केलेली असते. मग ती तू आमच्या भाजीच्या पेक्षा जास्त किमतीला कां नाही विकत. तू तर आमच्या पेक्षाही कमी किमतीत विकतोस. अशाने तुझा व्यापार कसा चालेल? हे बघ व्यापार करायचा





म्हणजे नफ्याकडे अगोदर लक्ष दिले पाहिजे. चांगुलपणा नंतर. नाहीतर तू आमच्या प्रमाणे सरसकट जुड्या बांधून आमच्या किमतीतच भाजी विक. म्हणजे तुला फायदा होईल आपला व्यापार वाढवू शकशील.

चक्रधराचे बोलणे ऐकून घेतल्यावर विश्वनाथ विचार करून शांतपणे म्हणाला— "तुला माहीत आहे ना कि मी अगदी अनाथ होतो. त्या वेळी ह्याच गांवातल्या लोकांनी माझ्यावर दया दाखवून वात्सल्याने माझे रक्षण केले. त्या वेळी त्यांनी माझ्या-काही मिळण्याची कल्पनाही केली नव्हती. अशा लोकांकडून मी आणखी किती फायदा उठवणार नाही. मला सत्याला जागले पाहिजे. मला इमानदार राहिलेच पाहिजे म्हणूनच आज माझी ही स्थिति आहे."

विश्वनाथचा भाजीचा व्यापारसुद्धा अशा तऱ्हेने घाटयांत आला.

त्या गावांत सभापती म्हणून एक फुलांचा व्यापारी होता. त्याने एक दिवस विश्वनाथला बोलावून घेतले आणि म्हणाला— "विश्वनाथ, मी दिवसेंदिवस वार्धक्याने थकत चाललो आहे. माझ्याच्याने आतां हा फुलाचा धंदा होत नाही. माझी मुलं आहेत पण ती आपापल्या धंद्यात पुष्कळ पैसे मिळवीत आहेत. ती काही येणार नाहीत. बघ, जर तू हे काम करणार असशील तर मी हा धंदा तुझ्यावर सोपवा-यला तयार आहे."

तो ही व्यापार करून पाहावा म्हणून विश्वनाथ भाजीचा धंदा सोडून फुलांचा व्यापार हाती घेतला. विश्वनाथ आपल्या स्वभावाप्रमाणे चांगली ताजी टवटवीत फुले निवडून हार तयार करीत असे आणि नेहमीच्या किमतीत विकत असे.

सभापती म्हणाला—"विश्वनाथ, असे करून धंद्यात फायदा कसा होणार? तुला सरसकटच फुले घेऊन हार केले पाहिजेत आणि फुलां मधून थोडे अंतर हीं सोडले पाहिजे. तुझ्या ह्या असल्या कामामुळे दुहेरी नुकसान होत आहे. एक म्हणजे खरेदी किमत वसूल होत नाही आणि दुसरे म्हणजे हे मेहनत करून सुंदर केलेले हार त्या मानाने फारच कमी किमतीला विकतो आहेस.

"काका, मी एकटा सडाफटिंग आहे. कसे ही माझे पोट मी भरतो. मग बिचाऱ्या ह्या गांवकऱ्यांना तरीं मी कशाला फसवू."

काही दिवसांनी सभापती बोलतांबोलता एका मोठ्या व्यापाऱ्याला म्हणाला— "शेटजी, ह्या फुलांच्या धंद्यांत सुद्धां हा विश्वनाथ दुर्दैवी ठरला. सगळा बुडीत धंदा. पण माणूस आहे मात्र प्रामाणिक." विश्वनाथाची स्तुति ऐकून ज्ञानगुप्त शेट एक दिवस स्वत: विश्वनाथाकडे गेले. गावांतलाच असल्याने विश्वनाथाला ते ओळखतच होते. ते म्हणाले—"तुझ्या प्रामाणिक पणाचे मला फार कौतुक वाटते. म्हणून मी तुला आपला जांवई करून घ्यावा म्हणतो आणि धंदा म्हणून माझे हे किराण्या मालाचे दुकान तुला देतो. तुझी काही आडकाठी नसेल तर सांग तसे, विचार करून."

ज्ञानगुप्तासारखा साक्षात शेट विश्वनाथाला आपली मुलगी देत आहे आणि विश्वनाथाने ही त्याचा जांवई होण्याचे कबूल केले आहे. हे ऐकून कलिंग, चक्रधर आणि सभापती ह्या सर्वांना आश्चर्य वाटले. आणि ते तिघे मिळून शेट ज्ञानगुप्ताकडे गेले. म्हणाले—"ऐकले आहे विश्वनाथ आपला जावई होणार आणि आपले दुकान



पण पाहणार. अहो, पण तो व्यापारांत अगदी कच्चा आहे. तुम्हांला त्यांत काही फायदा व्हायचा नाही. हां ! तो आहे अगदी खरा प्रामाणिक."

"पहाल तुम्ही. तोही उत्तम व्यापारी होईल." ज्ञानगुप्त म्हणाला.

ठरल्याप्रमाणे ज्ञानगुप्ताने आपल्या मुलीचे लग्न मोठ्या थाटाने विश्वनाथशी लावून दिले. आता विश्वनाथाने दुकान आपल्या हातांत घेतले. ह्याच्या दुकानांत माल उत्तम आणि स्वस्त मिळू लागला म्हणून गिऱ्हाईक वाढले. पण फायदा शून्य. ह्या अवधीत त्यांना एक पुत्ररत्नही झाले. तेव्हां त्याची बायको म्हणाली—"अगोदर तुम्ही एकटेच होतात. आता आपण तिघे आहोत. ह्या पुढे माझ्या वडिलांच्याकडून तुम्हांला मदत पण मिळणार नाही. प्रामाणिक व्यापारात सुद्धां फायदा होतो. पण जो फक्त दुसऱ्याचाच फायदा करू पाहातो त्याचे नुकसानच होते. आपलाही फायदा पाहाणे हा व्यवहार आहे."

ह्यावर विश्वनाथ संतापून म्हणाला— "म्हणजे मी लोकांनी केलेला उपकार विसरून फक्त स्वार्थच बघत बसू. माझा प्रामाणिकपणा वेशीवर टांगू ? ते होणार नाही."

ज्ञानगुप्त त्यांचा संवाद ऐकून म्हणाला— "तुझ्या बायकोचे म्हणणे तू बेइमान व्हावे असे नाही. प्रामाणिकपणाचा व्यापार उलट फार फायद्याचा आणि मानाचा असतो. भेसळ करून किंवा तराजू मारूनच व्यापारात फायदा होतो असे नाही. तू सध्या ज्याप्रमाणे माल देत आहेस तसाच माल दे. परंतु तो योग्य किंमतीला दे. मग पहा तुला कसा फायदा होतो ते. अरे व्यापार म्हणजे नुसता दानधर्म नव्हे."

ज्ञानगुप्ताच्या मदतीने आणि त्याच्या शिकवणी प्रमाणे विश्वनाथने व्यापाराला नव्याने सुरुवात केली. त्याच्या उत्तम मालामुळे त्याचे दूकान खूप छान चालले आणि थोड्यांच दिवसांत तो प्रमुख व्यापाऱ्यांत गणला जाऊ लागला.





# नाळघोटे

आदित्यसेन राजाच्या दरबारी अनेक राज्याधिकारी होते. ते सारे जण राजाची बरवर स्तुती करण्याची नेहमी संधी पहात असत व खोटी स्तुती करून त्याला नकोसे करून टाकीत. राजाला माहित होते की ही आपली होणारी स्तुती स्वार्थाप्रित्यर्थ आहे इमानदारीची नाही.

एक दिवस भयंकर थंडी होती. तेव्हां राजा उठला व आपल्या महालातून बाहेर आला त्याच्या मनांत विचार घोळू लागला की आता पाहू तरी कोणत्या मुख स्तुती करणाऱ्याची गांठ पडते ते ?

राजाने शालीने आपले संपूर्ण अंग झांकून घेतले व तो राजमार्गाने चालू लागला जाताजाता त्याला एका घराच्या ओसरीवर एक माणूस आडवा झालेला दिसला.

आदित्यसेन राजाने त्या माणसाच्या जवळ जात विचारले—"अरे बाबा, इतक्या कडाक्याच्या थंडीत काही अंगावर न घेता पडला आहेस तुला थंडी वाजत नाही कां ?

अहो कां नाही वाजणार मी तर माझ्या अंगावर फाटके कांबळे पांघरले आहे ना ? तर त्यातून थंडी एका भोकातून येते व दुसऱ्या-भोकातून बाहेर निघून जाते पण तुम्हांला थंडीचा एवढा त्रास होतो आहे. मीं पहा कशी सहन करतो आहे ते ? त्या व्यक्तिने उत्तर देत म्हटले.

त्या माणसाच्या बोलण्याची गंमत वाटून राजाला हंसू येऊ लागले. राजाने त्याला विचारले—"ऐक, माझ्यापाशी सोन्याची शंभर नाणी आहेत त्यातली पहा मी तुला वीस देतो परंतु तू मला एक कबुल कर की, ह्या राज्याच्या राजाची जशी स्तुती करतात त्याप्रमाणे तू माझी कर कबुल ?"

"हात्तिच्या ! एवढ्याच्या वीस सोन्याच्या नाण्याने मी राजासारखी स्तुती करू ?

अपर्णा खोटे

ही किंमत फारच लहान आहे बुवा! मला नाही जमणार." तो म्हणाला.

"ठिक आहे! माझ्यापाशी जेवढी संपत्ती आहे त्यातील अर्धी मी तुला देतो मग तर चालेल?" राजाने विचारले.

"मग तर आपण दोघे बरोबरीचे होऊ. त्यात स्तुती करण्याचा प्रश्नच कुठे उरतो." त्या गरीब व्यक्तिने म्हटले.

त्याच्या उत्तरावर राजा अत्यंत खुष झाला. त्याने असा विचार केला की, आपण थोडे पुढे चालत गेलो तर तो माणूस धनाच्या लोभाने पाठोपाठ धावत येईल. तो आला नाही, तेव्हां नाईलाजाने राजा पुन्हां त्या गरीब व्यक्तिजवळ आला.

राजाला जवळ आलेले पहाताच त्या व्यक्तिने आश्चर्याने विचारले–"सरकार आपण बहुदा पुन्हां मला काही प्रश्न विचारण्याच्या उद्देशाने पुन्हां परत आला.

"प्रश्न करण्यासाठी नाही मी तू केलेली स्तुती ऐकण्यासाठी पुन्हां परत आलो आहे. मी तुला पूर्वीच सांगितले सोन्याची शंभर नाणी आहेत." राजा म्हणाला. "हो तुम्ही मगाशीच सांगितले" ती गरीब व्यक्ति म्हणाली. "ठिक आहे! मी ती सारी शंभर सोन्याची नाणी तुला देतो. मग तर तू राजाबरोबर माझी स्तुती करशील नां?" त्याने गरीब व्यक्तिला विचारले.

"सरकार, जर कां हे सारे पैसे माझे झाले, तर मला तुमची स्तुती करण्याची गरजच काय? पाहीजे तर तुम्हांलाच फार गरज वाटत असेल तर तुम्हीच माझी स्तुती करा." तो गरीब मोठमोठयाने हसत म्हणू लागला.

ते पाहून राजासुद्धा त्याच्या बरोबर त्याच स्वरात हंसू लागला.

त्यानंतर राजाने त्या गरीब व्यक्तिला आपली ओळख करून दिली व त्याला सोन्याच्या शंभर सुवर्ण मुद्रा बक्षीस देऊन राजदरबारात त्याची नियुक्ति केली.

ते सर्व समजताच राजदरबारातील इतर अधिकाऱ्यांनी राजाची वरवर स्तुती करण्याचे सोडून दिले.



# चोर

अवंतीचा राजा मोठा महत्वाकांक्षी धूर्त होता. त्याने आपले राज्य वाढविण्याच्या दृष्टीने आजूबाजूच्या अनेक राज्यावर हल्ला केला व अनेक संपत्ती जमवली परंतु त्या युद्धामुळे व्यापारी वर्गात भष्ट्राचार सुरु झाला. नैसर्गिक संकटे न येता सुद्धा राज्यात अकाल पडू लागला.

खाद्यपदार्थ कमी झाल्यामुळे राज्यभर चोऱ्यामाऱ्या दंगेधोपे होऊ लागले. शेवटी राजाच्या खजिन्यात हात घालून चोरी करतांना एका चोराला पकडण्यात आले ते पहाताच मंत्र्यानी राजा समक्ष शिपायांना आज्ञा केली–"ह्या चोराला सोडून द्या."

चोर निघून जाताच राजाने मंत्र्याला विचारले–"आपण त्या चोराला सोडून कां दिलेत?" त्यावर मंत्री म्हणाला–"महाराज, मला क्षमा करा. ह्याने चोरी नक्की केली आहे. परंतु चोरी करण्याची परिस्थिती तर आपणच उत्पन्न केली आहे नां!"

मंत्र्याचे उत्तर ऐकून राजाचे डोळे उघडले ह्यानंतर राजाने ऊठसुट युद्ध करणे थांबवले व देशात शांतता सुविधा उत्पन्न करण्याच्या योजना आखल्या.





# भाटाची युक्ति

कोण्या एका गावात चंडेल नावाचा एक भाट रहात होता. तो मोठा चतूर होता. गावांत कोणतेही मंगल कार्य असो चंडेल त्या कार्यक्रमास खास आवंजून जाई व स्वतःच्या रचलेल्या स्तुतीसुमनांची उधळण करुन तेथील उभयतांकडून पुरस्कार व प्राप्त करे. स्वतःचा उदर-निर्वाह् चालवित असे.

त्या गावातील बऱ्याच थोरामोठ्यां लोकांनी चंडेलला काही ना काहीं कार्याला बोलावून बऱ्याच वस्तू भेटी दाखल दिलेल्या होत्या. परंतु त्या गावच्या पाटलाने त्याला अद्याप एक फुटकी कवडी सुद्धा दिलेली नव्हती. पाटलाकडे जेव्हां केव्हां काही शुभकार्य होई तेव्हां चंडेल नेंहमी प्रमाणें जाऊन आपले काव्य तेथे म्हणून परत येई. दर खेपेस कंजुस पाटील त्याला म्हणे– "अरे बाबा! काय सुंदर काव्य केलेस ह्यासाठी तुला खरोखरी उत्तम बक्षीस मिळाले पाहिजे. तू पुढच्या खेपेस माझ्या घरी काही कार्य निघाले की मला नक्की प्रथम भेट बर कां?"

ह्या खेपेस पाटलाच्या सर्वात धाकट्या मुलीचे लग्न ठरले. तेव्हां चंडेलाने मनोमन निश्चय केला की ह्यावेळी कसेही ह्या कार्यात पाटलाकडून नक्कीच बक्षिस प्राप्त करावयाचे. त्याच्याकडे दुभती गाय नव्हती. त्यामुळे त्याला नेहमी फार त्रास होत असे. चंडेलने विचार केला की कोणत्याही परिस्थितीत आता पाटलाकडून मुलीच्या लग्नाप्रित्यर्थ एक दुभती गायमिळवायची

एकदा लग्न प्रसंगी पाटील व त्याचे सगेसोयरे मोठ्या आनंदाने गप्पा गोष्टी करीत बसलेले होते. त्या वेळी चंडेल मधेच जात पाटलाची स्तुती सर्वासमोर गाऊ लागला व वधुवराला आर्शिवाद देत त्याच्यावर केलेली काव्ये म्हणू लागला. ती ऐकून सर्वांना फार आनंद वाटला. संधी सापडताच चंडेल म्हणाला–"प्रभू, तुमच्या-सारखा दानशूर सापडणार सुद्धा नाही तेव्हां मला बक्षीस देऊन टाका."

आपल्या मित्रमंडळी नातेवाईक, ह्यांच्या कोंडाळ्यात पाटलाला नाही म्हणता येणे अशक्य होते. जर दिले नाही तर अपमान झाल्याप्रमाणे होणार. त्यामुळे त्याने उत्सा-हाचा आव आणीत विचारले–"अरे बावचळू नकोस सांग तुला काय बक्षीस हवे?"

"अन्नदाता, मी लेकरेबाळे असलेला. गृहस्थ आहे- कृपा केलीत तर एक दुभती गाय मला द्यावीं!" चंडेलने विनंती केली. तावडतोब पाटलाने एका नोकराला हांक मारली नोकरजवळ येताच त्याच्या कानांत काहीतरी कुजबुज करीत म्हटले–"अरे ऐक, ह्याला एक गाय आणून देऊन टाक."

नोकर एक वयस्क गाईला ओढत घेऊन आला त्या वयस्क गाईला समोर पहाताच तेथे उपस्थित असलेल्या सर्वांना मोठा अचंबा वाटू लागला. ते सर्वजण आश्चर्याने पाहू लागले.

चंडेलच्या समोर मोठा गहन प्रश्न निर्माण झाला. तेव्हां हिला घेऊन गेले किंवा नाही तर पाटलाचा अपमान झाल्या सारखा होईल तेव्हां न नेण्या करीता त्यानें एक उपाय शोधला. तो त्या गाईच्या जवळ गेला व तिच्या कानात काहीतरी पुटपुटल्या सारखा बोलण्याचा अभिनय केला. नंतर असे ढोंग करून त्याने तिच्या तोंडाजवळ



कान नेऊन ऐकण्याचा बहाणा केला की ती जसे काही ह्याला सांगतेच आहे.

"अरे चंडेला, तुझी गाईच्या बरोबर काय खुसुखुस चालली आहे?" पाटील म्हणाला.

"मालक, तशी काही खास गोष्ट नाही हो? मी फक्त तिला एवढेच विचारत होतो की काय तू वासरे देऊ शकतेस कां?" चंडेलाने झटक्यान उत्तर दिले.

पाटलाने उपहासाने विचारले—"ठिक आहे, अरे पण तुझ्या प्रश्नाचे तर तिने काही उत्तर दिले असेल नां!"

अहो ती गाय म्हणते—"मी कृतयुगात महिषासुराकडे रहात होते. परंतु महिषासुराचा आदिशक्तिने संहार केला. कृतयुग संपून गेले तरी मला मरण आले नाही. नंतर त्रेतायुग आला. रावणाचा जन्म व रामचंद्राच्या हातून रावणाचे मरण हे सर्व मी स्वत: डोळ्याने पाहिले. ह्यानंतर द्वापरयुगात कंसाने जन्म घेतला. कृष्णाकडून कंसाचा वध झालेला सुद्धा मी स्वत: डोळ्याने पाहिला. तरी सुद्धा मी मेले नाही. परंतु मी खरे मनापासून सांगते आत्ता कोणत्याही वस्तूची किंवा गोष्टीची अभिलाषा आसक्ति नाही. माझ्या मनात आता वैराग्य निर्माण झाले आहे. पहाता पहाता कलियुग सुद्धा आले. इतकी वर्षे जगत आलेल्या मला तुम्ही असा प्रश्न करावा की तू किती वासरे जन्माला घालशिल. हे विचारणाऱ्या तुला लाज वाटली पाहिजे. लोक ते पाहून मला हसणार नाहीत कां? असे उत्तर दिले प्रभू!" चंडेल पाटलाला म्हणाला.

चंडेलाचे उत्तर ऐकताच तेथे उपस्थित असलेले सर्व लोक पोट धरधरून हंसू लागले. सर्व लोकांसमोर पाटलाला लाजल्या सारखे झाले त्याचा अपमान झाला. त्यांनी लाजेने मान खाली घातली.

"अरे मुर्खा, तुला एक दुभती गाय आणायला सांगितली तर एक जख्खड म्हातारी गाय हांकीत आणलीस काय रे?" असे म्हणत त्याने आपला सारा राग नोकरावर काढला. शेवटीं उत्तमपैकी दुभती गाय घेऊन आला व ती त्याने चंडेलाला दिली.







## रानमांजर

अमेरिकेतील उष्ण प्रदेशात रहाणारे स्लाथ नावाचे तीन बोटे असलेले रानमांजर अतिशय मंदगतीने चालते हा एक सस्तन जातीचा प्राणी आहे हे जमिनीवर दर मिनीटाला ६.८ फूट वेगाने व झाडांवर दर मिनीटाला २ फूट ढांगा टाकीत चालते.



## प्राचीन फुलणारे झाड

गिंकगो नावाच्या फुलाचे झाड अत्यंत प्राचिन काळापासून फुलणारे मानले जाते. हे झाड १६०,०००,००० वर्षापूर्वी चीन मधे सांपडले.

## जास्त धुके

जगात सर्वात जास्त धुके असणारा प्रदेश म्हणजे कॅनडातील न्युफौण्डमधील ग्राण्डबांक्स नावाचे शहर तेथे वर्षातील १२० दिवस सतत रात्रंदिवस धुके पसरलेले असते.













# चांदोबा


संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी


ही म्हण तर प्रचलितच आहे. की, मूर्खानें गप्प रहाणे शहाणपणाचे असते. परंतु ही गोष्ट मूर्ख माणसास कधी समजत नाही. ह्यावर कधीच विश्वास बसत नाही की आपण गप्प राहू शकू. त्याकरीता बुद्धिमान विवेकशील माणसास सदा सावध राहिले पाहिजे ह्या गोष्टीची सत्यता आपल्याला "विचारवंत माणूस" ह्या कहाणी वरून समजेल.

## अमर वाणी

दुर्जनेन समं सख्यं, प्रीतिं चापि न कारयेत् ।
उष्णो दहति चांगारः शीतः कृष्णायते करम् ॥

[दुर्जन माणसांच्या बरोबर मैत्री अगर सख्य करणें नेहमी हानिकारक असते. जसा जळता कोळसा हात जाळतो. तशा प्रकारेच थंड कोळसाला हात लावला तरी तो हात घाण करतोच.]


वर्ष : ३६ | फेब्रुवारी १९८७ | अंक : ८

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००




### चाळीस वर्षे न झोपलेला माणूस

मानवाला जगण्यासाठी जशी आहाराची आवश्यकता असते तशीच झोपण्याची सुद्धा नितांत गरज असते. झोपेविना माणूस कधी जगू शकत नाही. परंतु क्युबा येथील रहाणारा टोमास इज्वियार्डे चाळीस वर्षे डोळयाच्या पापण्या न मिटता जिवंत राहिला. जागतीक संशोधनाच्या ऐतिहासीक गोष्टीमध्ये असा आश्चर्य-कारक घटनेचा केव्हांही उल्लेख सांपडला नाही. असे क्युब चे प्रमुख मानसिक शास्त्रज्ञ डॉ. पेड्रोगार्बिया यांचे म्हणणे आहे.

### दिर्घकालीन जगण्याचे रहस्य

ब्रिटनचे १०५ वर्षांचे वृद्ध गृहस्थ आपल्या दिर्घकाल जगण्याची तीन महत्वाची रहस्ये सांगतात. एक ते दारू पित नाहीत. धुम्रपान करीत नाहीत आणि सदान्कदा स्वतःला कोणत्यातरी कामात मनापासून गुंतून ठेवतात.





### समजुतदार प्राणी

न्युयार्क मधील प्राणी संग्रहालयातील भूतपुर्व निर्देशक डॉ. नीडब्लेथर यांचा असा विचार आहे की, चिंपाझी ओरांग उटांग हत्ती, गोरिल्ला, कुत्रे, घोडा, सी लायन, अस्वले मांजरे इत्यादी प्राणी चांगल्या प्रकारे स्मरणशक्ति बरोबर ग्रहणशक्ति सुद्धा उत्तम प्रकारे ठेऊ शकतात.

# जयंती

कोण्या एकावेळी राक्षसाचें गुरू शुक्राचार्य यांनी कैलास पर्वतावर भगवान शंकराची तपश्चर्या करण्यास आरंभ केला. तेव्हां देवदेवतांनी विचार केला की शुक्राचार्यांची तपश्चर्या जर सफल झाली तर आपला सर्वनाश होईल. तेव्हां कोणत्या ना कोणत्यातरी उपायाने त्यांच्या तपश्चर्येत विघ्न आणले पाहिजे. देवता इंद्राची अत्यंत सुंदर मुलगी जयंती हिच्याकडे आले व विनंती करीत म्हणाले–"आम्ही देवलोक तू आमचे कल्याण करावेस व आम्हांला तू मदत करावीस म्हणून विनंती करावयास आलो आहोत.

"कसली मदत ?" जयंतीने आश्चर्याने विचारले.

"तू जर प्रथम वचन देशिल तरच आम्ही सांगू." देव म्हणाले.

"तुम्हां लोकांचे माझ्या मदतीने कल्याण होत असेल तर ह्यापेक्षा चांगली मी काय इच्छा करेन ? सांगा, तुमच्या साठी मी काय करावे ?" जयंतीने विचारले.

"कैलास पर्वतावर जाऊन तेथे तपश्चर्येत मग्न असलेल्या शुक्राचार्यांची सेवा करून त्यांच्या बरोबर तू लग्न करावेस." देव म्हणाले.

जयंतीने मनातून जाणले की, देव लोक आपल्याकडून शुक्राचार्यांची तपश्चर्या भंग करण्याच्या विचारात आहेत. परंतु कोणाचे वाईट व्हावे असे तिला वाटत नव्हते. म्हणून तिने वचन दिले. ते वचन मोडू नये यासाठी ती कैलास पर्वतावर मुनी कन्येच्या रूपाने पोहोचली व तिने अत्यन्त श्रद्धा व भक्तिने शुक्राचार्यांची सेवा केली. शुक्राचार्यांची तपश्चर्या संपली. त्यांनी शंकराकडून अनेक वर प्राप्त केले. जयंतीच्या सेवेवर प्रसन्न होऊन वर मागण्यास सांगितले. तिने म्हटले की, आपण माझ्या बरोबर विवाह करावा शुक्राचार्यांनी मोठ्या प्रसन्नतेने तिच्याबरोबर लग्न केले. जयंतीने शुक्राचार्यांच्या तपश्चर्येत विघ्न न आणता तिने देवांना जे वचन दिले होते त्याचे पालन केले.





# धाकला संन्यासी

गोदावरी नदीच्या तीरावर शिवस्वामी नांवाचा एक संन्यासी एका लहानश्या झोपडीत रहात असे. तो दिवसांतून एकदांच भिक्षामागून आणे. ज्या लोकांची त्याच्यावर श्रद्धा होती त्यापैकी कोणी नां कोणी त्याला जेवायला घालीत असत. तेवढ्यावर तो समाधान मानून परत येई आणि आपला वेळ ईश्वर चिंतनांत घालवे.

त्या गांवाच्या पाटलाची त्या संन्याशावर फार श्रद्धा होती. त्याला वाटे आपण त्याची कांहींतरी सेवा करावी त्याचे भिक्षा मागण्याचे कष्ट कमी करावेत. एक दिवस तो त्या संन्याश्याकडे गेला आणी म्हणाला–"महाराज! आपल्याला दररोज गांवात जाऊन भिक्षा मागावी लागते. ते मला बरे वाटत नाही. त्यापेक्षा मीच आपल्याला दररोज जेवण पाठवेन." पाटलाचे बोलणे ऐकून शिवस्वामी स्मित करून म्हणाला–"मी सबंध दिवसांत एकदाच जेवत असतो. आपल्या गावांतली लोकं मला जे प्रेमाने देतात. तेवढें मला पुरेसे होते आणि गावांत थोडे फिरल्याने त्यांची सुखदु:खे समजतात. त्यांच्याशी चार शब्द बोलले जातात. वर कपडे म्हणाल तर मला चार हाताचे एक धोतर आणि एक लहानसे उपरणे येवढें पुरं होतं वर्षभरासाठीं. तेही मला गांववाले प्रमानें देतात. मग कशाला आपण एवढे कष्ट घेता! त्यातून काहीं गरज भासलीच तर मी जरूर आपल्याकडे येईन."

शिवस्वामीची निस्पृहता पाहून त्याच्या विषयीची पाटलाची श्रद्धा जास्त वाढली. पाटलाने त्याला मोठ्या आदराने नमस्कार केला आणि काही न बोलता झोपडी बाहेर पडला. व निघून गेला. त्याच वेळी त्या बाजूने चाललेल्या एका मुलाने त्या दोघांचे बोलणे ऐकले. पाटलाने आदराने संन्या-



शाला केलेला नमस्कार पाहिला. त्यामुळे त्याच्याही मनांत त्या संन्याशाविषयी श्रद्धा उत्पन्न झाली. त्याला वाटले आपणही भेटून त्याचे शिष्य व्हावे, नाही तरी मी एक अनाथ. नंतर तो आत शिरला आणि संन्याशाच्या पायावर डोके ठेवून हात जोडून पुढे उभा राहिला.

संन्याशाने त्या मुलांला आशीर्वाद देऊन विचारले–"तू कोण?" तो मुलगा म्हणाला–"मी अनाथ आहे. मला कोणी नाही.

अनाथ आहे. तरराहू दे. म्हणून संन्याशाने त्याला ठेवून घेतले. जसजसे दिवस जात होते. त्या मुलाची संन्याशाविषयी श्रद्धा व भक्ति वाढतच गेली. तो मुलगा मना-पासून त्याची सेवा करीत असे. एक दिवस शिवस्वामी त्या मुलाला म्हणाले–"बाळा मी आतां तीर्थयात्रेला जाणार आहे." त्यावर त्या मुलाने त्यांचे पाय धरले आणि म्हणाला–"स्वामी, मीही आपल्या बरोबर येतो मला घेऊन चला."

नकारार्थी मान हालवून स्वामी म्हणाले-"बाळ, तू बरेच वर्षांपासून माझी सेवा करतो आहेस. तुझी श्रद्धा आणि भक्ति वर संतुष्ट झालो आहे. तुला संन्यासी होऊन माझ्या बरोबर तीर्थयात्रेला येण्याची इच्छा आहे. अगदी स्तुत्य गोष्ट आहे. पण अजून तुला ते करण्याची वेळ आली नाही. अजून थोडे दिवस जाऊं देत. मी पाटलाशी तुझ्याबद्दल बोलतो. ते शेतीवाडी करून पोट भरण्यासाठी तुला थोडी जमीन देतील. त्यावर तू सुखाने राहून फावल्या वेळांत ईश्वर चिंतन, नामस्मरण वगैरे कर."

आता त्या मुलाचे वय सोळा वर्षांचे होते. तरी पण तो आपल्या गुरूला प्रणाम करून म्हणाला–"गुरूजी, मला प्रापंचिक सुखाची मुळीच अभिलाषा नाहीं. मला वाटते मीही आपल्या प्रमाणेच ह्या कुटीत रहावे व भिक्षेवर जगावे."

शिष्याच्या विचारावर आपली काहीही प्रतिक्रिया व्यक्त न करता संन्यासी गप्प राहिला. नंतर ठरल्या प्रमाणे एकटाच तीर्थयात्रेस निघून गेला.

शिवस्वामी गेल्या नंतर आपल्या गुरूच्या झोपडींतच तो मुलगा राहू लागला. गुरू प्रमाणेच त्याचे वैराग्य पाहून सर्व लोक त्याला धाकला संन्यासी म्हणू लागले. त्याच्या जवळ फक्त एक धोतर एक उपरणें एक सुरई एवढेच होते.

एक दिवस रात्रीच्या वेळी धाकटा संन्यासी झोपला असतां एका उंदरानें त्याचे उपरणे कुरतडलें सकाळी उठल्यावर उपरणे घेण्यासाठी तो गेला तेव्हां त्याला ते कुरतडलेले भोंक दिसले. त्याला फार वाईट वाटले. त्याचवेळी झोपडी जवळून एक गृहस्थ चालला होता. त्याला मोठ्या केविलपणे आपले दुःख बोलून दाखविले.

तो गृहस्थ त्या धाकल्या संन्याशाला म्हणाला–"आपण संन्यासी मी आपल्याला दुसरे नवे उपरणे देऊ शकतो. परंतु उपयोग नाही. कारण काही दिवसानी ते उपरणे पण उंदीर कुरतडून टाकतील. तेव्हां उंदरांना मारण्यासाठी एक मांजर पाळा."

मांजर पाळण्याची त्या गृहस्थाची सूचना ऐकल्या बरोबर संन्यासी चकित होऊन म्हणाला–"दादा मी ती गोष्ट ऐकली आहे. एका संन्याशाने आपली लंगोटी उंदरापासून वाचवण्यासाठी एक मांजर पाळले आणि



त्या मांजराला सांभाळण्यासाठी त्याला गृहस्थाश्रमाच्या खाईत खोल खोल बुडावे लागले. नकोच ते."

संन्याशाचे बोलणे ऐकून तो गृहस्थ हसून म्हणाला–"साधु महाराज, अहो ही कोणाची तरी कल्पित गोष्ट आहे. आपण आत्म-संयमी आहात. एवढेच नव्हे तर सर्वसंग परित्यागी शिवस्वामी महाराजांचे आपण साक्षात शिष्य आहात."

संन्यासी काय बोलणार तो गृहस्थ संन्याशाला नमस्कार करून निघून गेला.

दुसऱ्या दिवशी त्या गृहस्थानें एक मांजराचे पिल्लू आणून त्या संन्याशाला मोठ्या प्रेमाने अर्पण केले.



मांजराचे पिल्लू अगदी लहान होते. उंदीर पकडून खाण्याइतके ते मोठे नव्हते. त्यामुळे भुकेने ओरडूं लागले.

ही गोष्ट त्या संन्याशाच्या तोंडून दुसऱ्या एक गृहस्थाला समजली. तो गृहस्थ म्हणाला–"स्वामी, मांजर भुकेनें तडफडून मेले तर केवढे पाप लागेल आपण असे करा आत्ताच्या आत्ता पाटलाकडे जाऊन एकादी दुभती गाय मागून आणा. पाटील उदार आहेत."

ह्या धाकट्या संन्याशाला कल्पना आवडली. तो लगेच पाटलाकडे गेला आणि आपली अडचण सांगितली त्या मांजराच्या पिल्लासाठी गाय पाहिजे असल्याचे सांगितले. पाटलाने ताबडतोब एक चांगली दुभती गाय त्याला देऊन टाकली.

सुमारे एक आठवडा लोटला. दामोदर नावाचा एक गृहस्थ धाकल्या संन्याशाकडे आला. म्हणाला–"मांजराच्या दुधासाठी गाय पाहिजेच आणि गाईसाठीं चारापाणी पाहिजे. मला वाटते आपण पाटलाकडे शब्द टाकलात तर ते काही नाही म्हणणार नाहीत. मी ह्या जमिनीची मशागत करून ह्यांत पीक काढूं शकेन. त्यांतले अर्धे आपण घ्यां अर्धे मला होईल. अशाने आपल्यालाही भिक्षा मागण्यासाठी दारोदार हिंडावे लागणार नाही."

नाही तरी गाईच्या चारापाण्याचा प्रश्न होताच. त्याने प्रयत्न करण्याचे ठरविले आणि पाटलाकडे गेला. पाटलानें शांतपणे सर्व ऐकून घेतले आणि म्हणाला–"आपले म्हणणे अगदी बरोबर आहे. असे पहा आपल्या झोपडीपासून नदी किनाऱ्या पर्यंतची सारी जमीन मी आपल्याला देतो. नाही तरी सध्या ती ओसाडच पडलेली आहे.

पाटलाकडून जमीन मिळाल्यावर दामोदराने खूप मेहनत करून ती कसली. त्यांत धान्य पेरले पाणी लावले. चांगली काळजी घेतली. त्या जमीनीत पीकही उत्तम आले. धाकला संन्याशी व दामोदर दोघांनाही फार समाधान वाटले. त्यांचे दिवस सुखाने जाऊ लागले. पुढे धान्य साठविण्यासाठी म्हणून झोपडीच्या जागी एक पक्के घर बांधले.



काही दिवसांनी दामोदराने आपल्या बायको व मलीला कामाला बोलाविले. त्या दोघी झोपडीच्या बाजूला भाजीपाला लावून पीक काढूं लागल्या. आपल्या स्वैपाकाबरोबर स्वामीचाही स्वैपाक होऊं लागला. अनायासे त्यांना स्वामीची सेवा घडू लागली.

दुसऱ्यावर्षी भरपूर पीक आले. पोटापुरते ठेवून बाकी सर्व विकून थोडी पुंजी स्वामीच्या नावाने जमा झाली

एक दिवस दामोदर धाकल्या स्वामीला म्हणाला–"स्वामी, आपली ही वाढती जबाबदारी आपण एकटे कसे काय करणार एकादा माणूस ठेवा पण नोकर तो नोकर. त्याला आपलेपणा कोठून वाटणार. माणसाला आपल्या जीवनामध्यें आपले म्हणणारे कोणी तरी असावे लागते. आपण गृहस्थाश्रम कां पत्करत नाही? माझी कन्या आपल्याला माहीतच आहे. ती आपल्याला अगदी योग्य वधू आहे.

धाकला स्वामी विचार करूं लागला. दामोदर म्हणतो आहे. त्यांत खरोखर काही अर्थ आहे, आणि त्याचीं मुलगी विजया सालस सुंदर खरीच आणि कामधाम सुद्धा कसे व्यवस्थित करतें. त्याने आपली पसंती दामोदरास सांगितली आणि एका शुभ मुहूर्तावर त्याने विजयाशी लग्न लावून घेतले.

आता त्याला लोक 'धाकलास्वामी' न म्हणता 'महाराज' म्हणूं लागले.



दिवस जात राहिले. महाराजांना दोन मुलगे झाले. व ते वाढले मोठे झाले. आपल्या वडिलांना आणि आजोबांना शेतीवाडी करण्याच्या कामात मदत करू लागले.

त्याच सुमारास पाटील वृद्धापकालाने कालवश झाले. त्याचे मुलगे पाटीलकी पाहूं लागले. त्यानी महाराजाकडे आपल्या जमीनीची मागणी केली. महाराजाला वाटले होते की, ती जमीन पाटलाने त्याला दान दिली आहे. पाटलाचे मुलगे ते मान्य करीनात त्यामुळें गावांत दोन तट पडले. एक पाटलाचा दुसरा महाराजाचा.

दुष्मनी वाढत गेली. इतकी की एक दिवस पाटलाच्या दलाने महाराजांच्या घरावर हल्ला केला. महाराजाच्या लोकांनीही त्याला प्रत्युत्तर दिले. मारामारी झाली. त्याचवेळी शिवस्वामी तीर्थयात्रा संपवून परत आले. त्यांना पाहून सर्वानी हात आवरले त्यांना नमस्कार केला आणि खाली मान घालून उभे राहिले. शिवस्वामीनी विचारले—"वीस पंचवीस वर्षांपूर्वी येथे एक झोपडी होती एक शिष्य होता.. ती झोपडी कुठें आहे ?"

गुरूचे शब्द ऐकल्याबरोबर महाराजाने एकदम त्यांच्या पायावर लोळण घेतली. अश्रु ढाळू लागला. शिवस्वामीने आपल्या शिष्याला ओळखून जमीनीचा न्यायनिवाडा केला. तो पाटलांच्या मुलांनी मान्य केला.

त्या रात्री महाराज स्वामीना म्हणाला—"मी आपल्या बरोबर तीर्थयात्रेला येतो म्हटले तेव्हां आपण म्हणाला होता अजून वेळ आली नाही. थोडे दिवस थांब आणि आपण खरेच सांगितले होते. पण मला वाटते आता मी संन्यास घेऊन आपल्या पदचिन्हांवर जाण्यास योग्य झालो आहे."

शिवस्वामी म्हणाले—"होय संसार सागरातून बाहेर पडण्याची आता वेळ आली आहे. तुझे मुलगे आपल्या आईचा सांभाळ करण्याजोगे झाले आहेत. आता तूं सुखाने संसारातून बाहेर पडूं शकतोस." अशातऱ्हेने गुरूचा आशीर्वाद घेऊन सर्वसंग परित्याग करून तो घराबाहेर पडला.





# विचार मग्न व्यक्ति

श्रीपुरचे जमीनदार रामराज लहान होते, तेव्हां त्यांना त्यांच्या वडीलांनी शिकवण्याचा बराच प्रयत्न करून पाहिला. पण व्यर्थ ! पुढे मोठेपणी त्यांचा वेळ कर वसूली शिकार आणि चमचमीत खाणे ह्यातच रमू लागला. त्यांना नेंहमी वाटायचे कि जे लोक विचारांत मग्न असतात ते फार हुषार आणि कुशाग्र बुद्धिचे असावेत त्यांच्या कचेरीमध्यें गंगादास नांवाचा एकजण होता. तो नेहमी अगदी चितामग्न होऊन कसला तरी विचार करीत असे. त्यामुळें त्याच्यावर जमीनदार रामराजची फार मर्जी बसली.

जमीनदार गंगादासला नेहमी आपल्याजवळ बसवीत असे. काम संपले म्हणजे त्याला विचारीत असे कि एवढा कशा विषयी विचार करीत आहेस ?

एक दिवस जमीनदार गाढ झोपलेला होता. पण कसल्या तरी आवाजाने त्याची झोप मोडली. कसला आवाज असेल हे पाहण्यासाठी ते उठले आणि दरवाजा उघडून सरळ बाहेर आले. पहातात तो एवढी रात्र झाली तरी गंगादास आपल्या अंथरुणावर बसून विचार करत बसलेला त्याला दिसला. त्याने विचारले—"एवढ्या रात्री सुद्धां कसला विचार करतो आहेस सांग तरी ?"

"सरकार, चोर अमावास्येच्या रात्रीच का चोरी लूटमार करण्यासाठी बाहेर पडतात ! याचा मी विचार करीत होतो." गंगादास म्हणाला. त्याचे उत्तर ऐकून जमीनदार खुश झाला आणि झोपण्यासाठी आपल्या खोलींत निघून गेला. बराच वेळ झाला त्याला कांहीं झोप येईना. मग गंगादास आता कसला विचार करीत असेल ते तरी आपण जाणून घ्यावे. असा विचार मनांत येताक्षणीच तो उठला आणि व्हरांड्यांत आला व म्हणाला—"निजलास काय गंगादास ?"

"नाहीं सरकार, विचार करतो आहे." गंगादास म्हणाला.

"कसला रे? मला तरी ऐकू दे."

"असा विचार येतो आहे कि, हे चोर लोक श्रीमंत लोकांच्या घरांतच चोरी कां करतात?" गंगादासने सांगितले.

गंगादासाचे उत्तर ऐकून त्याला आनंद झाला आणि गंगादास किती हुषार माणूस आहे. असा विचार करीत तो झोपल्या. थोड्यावेळाने त्याला छान झोप लागली. पहाटे त्याची झोप मोडली. तो उठून बाहेर आला. तेव्हां गंगादास अंथरुणावर बसून विचार करीत होता. ते पाहून त्यानें विचारलें— "सांग आता कसला विचार येत आहे?"

"सरकार, आता माझ्या मनांत असा विचार येतो आहे. थोड्या वेळापूर्वी आपल्या तिजोरीतील सर्व संपत्ती चोरांनी लुटून नेली. त्याचे लुटेरे काय करणार आहेत?" गंगादासाने उत्तर दिले. हें ऐकताच जमीनदाराला कांपरेच भरले तो घाईघाईने तिजोरीच्या खोलीत गेला. पाहतो तो काय खरोखरच समोर तिजोरी रिकामी उघडी पडलेली होती. जमीनदार संतापाने लालबुंद झाला व गंगादासाजवळ येऊन रागारागाने त्याला म्हणाले—"अरे मूर्खा, चोर येऊन तिजोरी फोडून सारे धन लुटून घेऊन गेले हे नुसते गप्प राहून पहात बसलास?"

गंगादास ह्यावर कांहींही न बोलता नुसता गप्पच राहिला. तेव्हां रागारागाने त्याच्याकडे कठोर नजरेने पहात तो ओरडला—"अरे लबाडा. बोलत कां नाहीस? तोंडाला खीळ बसली की काय तुझ्या?"

आणखीनच खोल विचारांत मग्न होऊन आकाशाकडे दृष्टी लावून, चिंतातूर चेहरा करून गंगादास म्हणाला—"सरकार, मी विचारांत पडलो आहे कि ज्या वेळी लुटेरे येऊन तिजोरी फोडून धन नेत होते, ते डोळ्यांनी पाहून सुद्धां आपण म्हणालात तो विचार माझ्या मनांत कां आला नाही?"

मग हा विचारता! जमीनदाराने गंगादासाला लगेच नोकरीवरून काढून टाकले.






[८]

[अमरपालच्या नेतृत्वाखाली त्याच्या बरोबरच्या सैनिकांनी भयंकर प्राण्याना उभे जाळून मारून टाकले. त्यांना एक गोष्ट समजली की, राजकुमारी कांतिमतीला काही व्याघ्रचर्मधारी पळवून घेऊन चालले आहेत. तेव्हां उग्राक्ष व चित्रसेनाने त्यांचा पाठलाग केला. तेव्हां त्यांच्या नायकाने कांतिमतीला मारून टाकण्याची आज्ञा केली. पुढे वाचा...]

व्याघ्रचर्मधारीच्या सरदाराने आपल्या अनुयायांना चेतावणी दिली. ती ऐकताच एका बाजूने चित्रसेनाने व दुसऱ्या बाजूने उग्राक्षाने व त्यांच्या सैनीकांनी एकसाथ त्यांच्यावर हल्ला केला. पहाता पहाता अचानक हल्ल्याने व्याघ्रचर्मधारी पटापट मरू लागले ते पहाताच व्याघ्रचर्मधारीच्या सरदाराला खात्री वाटली की आता आपला नाईलाज आहे आपला पराभव नक्की होणार तसे वाटताच त्याने एका हातात भाला व दुसऱ्या हातात तळपती तलवार घेतली व वर उगारीत जोरजोरात ओरडत त्याने आपल्या उरलेल्या अनुयायांना ओरडून म्हटले—"ऐका आता आपला अंतिम समय जवळ आला आहे. तेव्हां तुम्ही ताबडतोब कांतिमतीला ठार करा.

व्याघ्रचर्मधारी सरदाराचे बोलणे ऐकून चित्रसेन चकित झाला. त्याने विचार केला



राजकुमारी कांतिमती नक्कीच ह्या दुष्टांच्या हाती सांपडू नये म्हणून स्वतःच्या जीवाचे बरेवाईट करून घेईल. पालखी सभोवताली दहा एकजण तरी एकमेकांशी लढण्यात गुंतले आहेत. त्याना मारूनच पुढे जाता येईल.

चित्रसेन आवेशाने तलवार उगारीत समोर येणाऱ्या प्रत्येकाला सपासप मारून पालखीपाशी पोहोचण्याचा प्रयत्न करू लागला. तो जवळजात नाही तोच पालखीचे दार फटकन उघडले गेले. व दुसऱ्याक्षणी झटक्यात राजकुमारी पालखी-तून खाली उडीमारून बाहेर पडली. आणि शेजारीच मरून पडलेल्या सैनिकाची तलवार तिने खसकन् ओढून हातात घेतली व समोर येण्याऱ्याबरोबर धैर्याने लढू लागली. ते पहातच उग्राक्ष तोंडाने हुंकार भरीत म्हणाला–"अग, कांतिमती मी आलोच तू तर खरोखरी क्षत्रिक कन्या म्हणण्यासारखी लढतेस." असे म्हणत समोर दिसणाऱ्या प्रत्येक व्याघ्रचर्मधारी माणसाला आपल्या गदेचा प्रहार करून खाली पाडीत तो तिच्या नजिक जाऊ लागला. तेवढ्यात चित्रसेन सुद्धा पालखी जवळ येऊन पोहोचला त्याला रक्ताने थबथबलेली तलवार हातात घेतलेली राजकुमारी दृष्टीस पडली.

"हे आमचे महाराज चित्रसेन व मी उग्राक्ष आहे. हे सारे जगंल माझे आहे." उग्राक्षाने कांतिमतीला सांगितले.

कांतिमतीने कोपाने उग्राक्षकडे पाहिले आणि चित्रसेनाकडे दुर्लक्ष करून त्याच्याकडे न पहाताच ती पालखीत जाऊन बसली.

राजकुमारीचे ते वागणे चित्रसेनाला विचित्र वाटले. त्याला तिचा संताप आला, त्याने तर स्वतःच्या प्राणांची पर्वा न करता तिचे रक्षण केले तरी सुद्धा कृतज्ञता प्रकट न करता उलट आपल्याकडे तिरस्काराने पहात ती पालखीत जाऊन बसली म्हणजे उघड उघड आपला अपमान केल्या सारखे चित्रसेनला वाटले.



"उग्राक्षा, आता आपले कर्तव्य संपले. आता आपण धवलगिरीला जाण्यासाठी निघाले पाहिजे." चित्रसेन थोडा चिडीने म्हणाला.

चित्रसेनचा तसा आवाज ऐकून उग्राक्ष आश्चर्यात पडला. कारण पूर्वयोजने नुसार कपिलपुरच्या किल्ल्यावर हल्ला प्रथम करावयाचा होता. त्या कामगिरीवर अमरपाल थोड्या सैन्यानिशी पुढेही गेला होता. कपिलपुरचा किल्ला हस्तगत करून राजद्रोही नागवर्माला ठार करावयाचे तेव्हां आताचे ते बोलणे ऐकून...

"अरे चित्रसेन, आपण पूर्वी ठरविल्या प्रमाणे प्रथम कपिलपुरचा किल्ला ताब्यात घ्यावयाचा होता नां? तेवढ्यात आपल्या सुदैवाने आपण राजकुमारी कांतिमतीचे रक्षण केले." उग्राक्ष तत्पप् करीत म्हणाला.

"काय म्हणालास? आपण राज-कुमारीचे रक्षण केले? ती तर असे सोंग करते आहे की, जणुकांही तिनेच आपल्या सर्वाचे रक्षण केले. त्या अमरपालने ह्यापूर्वी आपल्याला सांगितले होते. की महाराजा वीरसिंहला अग्नी द्वीपच्या रहिवाश्यांनी एकजूटी करण्याच्या निश्चयाने कैद करून नागवर्माने अग्नी द्विपाला पाठवून दिले आहे. अशा परिस्थितीत आपण युद्ध करून कपिलपुर हस्तगत केले तर शेवटी त्या किल्ल्यावर कोणाचा राज्यभिषेक करावयाचा?" चित्रसेन संतापाच्या आवेशात ओरडला.

चित्रसेनाचे बोलणे ऐकून कांतिमती धडपडत बाहेर आली. आणि चित्रसेनाकडे शंकेने पहात म्हणाली–"सांगा, माझ्या वडिलांना त्या राजद्रोही नागवर्माने अग्नी द्वीपला पाठवून दिले. ही बातमी सांगणारा तो अमरपाल कोण आहे?

तो तर कपिलपुरचा निवासी आहे. परंतु तो नागवर्माच्या सैन्याच्या हाती कैदी बनला त्यानंतर त्याने काही गुप्त गोष्टी सांगून आम्हांला मदत केली." चित्रसेन म्हणाला.





"तो अमरपाल खोटारडा आहे. बहुदा त्याला त्यागोष्टीची अजिबात माहिती नसावी. माझे वडील किल्ल्यात कोठेतरी गुप्त ठिकाणी कैद करून ठेवले असावेत." कांतिमती म्हणाली.

"हां, हां, असे आहे काय?" चित्रसेन उद्‌गार काढत म्हणाला.

"चित्रसेना, मग प्रथम त्या महाराजाचे रक्षण करू यां!" उग्राक्ष व्याकुळतेने म्हणाला.

"आपण न सांगता कशाला कुणाचे काम करायचे. आपल्यापाशी काय कुणी मदत मागितली आहे कां?" चित्रसेन त्याला दटावत म्हणाला.

"अहो, क्षमा करा. मी आपल्याला मदती करता हात जोडून विनंती करते." कांतिमती थोडी कळवळून म्हणाली.

"पण थोडयावेळा पूर्वीचे आपले विचित्र वागणे काही चांगले सभ्य नव्हते. पुढे तर मी एक राजा असून सुद्धा असा गर्व बहुदा माझ्या विषयी तुला काहीच कल्पना नसावी. पण आता तू ज्या ठिकाणी ह्या जंगलात आहेस हा सारा प्रदेश माझा आहे आणि इथून समोर दिसणारा तो भव्य महाल तो सुद्धा माझा स्वतःचा आहे. त्याला लागूनचा सारा प्रदेश माझी राजधानी आहे." चित्रसेन म्हणाला.

राजकुमारी कांतिमतीच्या चेहऱ्यावर ते ऐकून थोडे हास्य उमटले ती म्हणाली– "आता थोडयावेळा पूर्वी तर उग्राक्ष म्हणाला की हे सारे जंगल माझे आहे."

चित्रसेनने उग्राक्षकडे डोळे वटारून रागाने पाहिलं तेव्हां उग्राक्ष घाबरला. त्याच्या तोंडून शब्दही बाहेर पडेनासे झाले थोडयावेळाने रडका चेहरा करीत उग्राक्ष म्हणाला. जरी कां हे सारे जंगल माझे असले तरी ह्या जंगलाचा महाराज चित्र-सेन ह्यांचा मी अनुयायी आहे.

"आता ठिक, माझा संशय दूर झाला. कपिलपुरच्या राजा विरसिंहची एकुलती एक मुलगी कांतिमती आपल्यापाशी मदती करीता विनवणी करत आहे. राजद्रोही





असलेल्या नागवर्माच्या तावडीत सांपडलेल्या माझ्या वडीलांना वाचंवून आपण त्याचे रक्षण करावे आणि त्या द्रोही नागवर्माला चांगला धडा द्यावा. अशी मी आपल्याला विनंती करते." कांतिमती व्याकुळ स्वरात म्हणाली.

कांतिमतीची विनवणी ऐकताच चित्रसेनला मनांतून अपार आनंद झाला त्याने उग्राक्षाकडे वळून पहात म्हटले– "उग्राक्षा, तुझी घमेंड उतरली नां! आता या पुढे तोंडातून ब्र काढू नकोस. हे सारे जंगल माझे आहे. त्यातून तू ह्या पूर्वी जे काय म्हणालास की मी महाराजांचा अनुयायी आहे पण एक लक्षात ठेव तू माझा अनुयायी नाहीस. तू एक राक्षस नोकर आहेस.

"हो, हो, मी शंभर टक्के नोकर आहे." असे म्हणून उग्राक्षाने कांतिमतीकडे आदराने वांकून नमस्कार केला.

कांतिमतीला अत्यंत आनंद झाला. ते पाहून चित्रसेनाने दुप्पट उत्साहाने आपल्या साथीदारांकडे वळून पहात म्हटले–मला वाटते की त्या व्याघ्रचर्मधाऱ्यापैकी एक सुद्धा जिवनिशी सुटून गेला नसेल तर ती गोष्ट ठिक आहे आता आपण सरळ कपिल-पुरला जाण्याकरीता निघण्याची तयारी करावी. तुमच्या पैकी चौघांनी पालखी उचला." नंतर कांतिमतीला उद्देशून म्हणाला–"आपण पालखीत चढून बसावे."

तेव्हां तिने नकारार्थी म्हटले–"महाराज, ह्याक्षणी मी कैदी बंदिवासात नाही. त्यामुळे मला आपण परवानगी द्यावी की मी मोकळेपणाने घोडयावर स्वार होऊन आपल्या बरोबर निघावे.

"हो महाराज, हेच ठिक होईल. आपण प्रथमच पाहिले आहे की, थोडयावेळा पूर्वी राजकुमारीने त्या व्याघ्रचर्मधाऱ्याशी कसा सामना केला." उग्राक्ष म्हणाला.

परंतु आता तलवार हातात घेऊन त्यांना युद्ध करण्याची जरूर नाही. परंतु हवे असल्यास घोडयावर बसून आमच्या



सोबत येण्यास हरकत नाही. परंतु कपिलपुर किल्ला हस्तगत करणे व महाराज वीरसिंहना कैदेतून मुक्त करणें हे आमचे काम आहे. ह्या प्रयत्नात शत्रुशी जो सामना करणे भाग पडोल तेव्हां आम्ही व आमचे सैन्य लढेल." चित्रसेन म्हणाला.

दुसऱ्या क्षणाला चित्रसेनाचे साथीदार व उग्राक्षाचे राक्षस ह्यांचे दोन गट पडले. घोडयावर स्वार होवून चित्रसेन व त्याच्यापाठोपाठ कांतिमती कपिलपुर किल्ल्याच्या रोखानेपुढे निघाले. एका तासाभराच्या प्रवासाने ते लोक एका डोंगरापाशी येऊन पोहोचले दूरनच त्यानी पाहिले. की, किल्ल्याच्या तटावर काही सैनिक पहारा देत आहेत. आणि किल्ल्याच्या भोवताली आकाशात दोन भयंकर पक्षी घिरटया घालीत आहेत.

त्या दोन भयंकर पक्ष्यांना पाहून चित्रसेन व उग्राक्ष दोघांनाही आश्चर्यच वाटले. उग्राक्ष मोठ्या कष्टाने चित्रसेन पाशी जात म्हणाला—"महाराज येथे सुद्धा त्या भयंकर पक्ष्याना तोंड द्यावे लागणार!"

चित्रसेनच्या मनांत सुद्धा तशीच शंका डोकावू लागली. त्याने किल्ल्याच्या दिशेने एकवार नजर टाकली. त्या किल्ल्याची दारे बंद होती. दारांच्या समोर मृत सैनिकांचा मागमुसही लागत नव्हता. बहुदा अमरपाल सुद्धा अशाच विचारात कुठेतरी नसला असावा की ह्या किल्ल्यात शिरकाव मिळवायला कोणती संधी मिळेल.

चित्रसेन विचारमग्न होता तितक्यात कोण्या लांबून त्याला गडबड ऐकू आली. काही क्षणातच अमरपाल येऊन पोहोचला. व म्हणाला—"महाराज, आपण पहात आहात नां? नागवर्माने मोठ्या काळजी पूर्वक धवलगिरीवर हल्ला करून जाण्यापूर्वी ह्या किल्ल्याच्या रक्षणाकरीता सैन्याची कशी चांगली मजबूत व्यवस्था केली आहे. दोन भयंकर पक्षी किल्ल्यावर चांगलाच पहारा देत आहेत ते पाहून तर असे वाटते. की ते दोघे सोडले तर किल्ल्यात बहुदा



पक्षी नसावेत. आणि किल्ल्याच्या तटावर पहारा देणारे सुद्धा जास्त संख्येने सैनिक नसावे. तरी सुद्धा आपण येण्याची वाट पहात बसलो होतो.

तू तर खरोखरी शहाण्या सारखेच काम केलेस त्यातून तू जर चुकून हल्ला केला असतास तर आता सर्व सैन्यासह तुझा सर्वनाश झाला असता. हे तर बरेच झाले. तू आमची वाट पहात बसलास." चित्रसेनाने अमरपालच्या म्हणण्याला दुजोरा दिला नंतर उग्राक्षाकडे वळून पहात म्हटले– "उग्राक्षा, आता आपल्यापाशी एकच उपाय काय तो उरला आहे. किल्ल्याची दारे फोडून आत प्रवेश करण्याच्या मदतीसाठी तुझे अनुयायी समर्थ पाहिजे."

उग्राक्षाने एकवार चित्रसेनकडे पाहिले नंतर आकाशात फिरणारे ते भयंकर पक्षी पाहात एका हाताने डोके खाजवत म्हटले– "माझ्या काही सैनिकांना दारें तोडण्याच्या कामी व काही लोकांना तटाच्या भिंती फोडण्याच्या कामाला पाठवतो परंतु......ते भयानक पक्षी......उग्राक्षाच्या चेहऱ्यावर किंचित भीतीची छटा पसरली.

उग्राक्षा, तू आजिबात चिंता करूनको. त्या पक्षांनी तुमच्यावर हल्ला करण्याची आम्ही संधी त्यांना येऊन देत नाही. त्यांना आम्ही मधेच अडवायचा प्रयत्न करतो. त्याची जबाबदारी माझी" अमरपालने धीर देत म्हटले.

"ते कसे काय शक्य होईल?" चित्रसेनने विचारले.

आज सकाळी जेव्हां मी ह्या पक्षांच्या झोपड्याना आगी लावल्या तेव्हां मी पाहिले होते की ते कसे घाबरून गेले होते. ह्या पक्षांना आता आग पहाता क्षणी भीती वाटते, त्यामुळे आता आपण आपल्या प्रत्येक सैनिकाच्या हातात एक पेटती मशाल द्यावयाची म्हणजे ती पहाताच त्याच्यावर स्वार झालेल्या व्याघ्रचर्मधाऱ्याची आज्ञा ते पाळण्याची प्राज्ञाच रहाणार नाही आणि आपल्यावर ते हल्ला सुद्धा करून येणार नाहीत." अमरपालने युक्ती लढवीत म्हटले. (क्रमश:)



# दोषकोणाचा?

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, तू जे कष्ट सहन करीत आहेस ते वाखाणण्याजोगे आहेत. परंतु तुला माहीत आहे का? कोणत्याही कामासाठी जे गुण आवश्यक असतात त्या गुणांची माहीती असली पाहिजे नाहीतर स्वतःच्या शक्तिच्या पलिकडे असलेली एखादी गोष्ट करण्यासाठी तू तयार झाला नसतात. त्या करीता तुला एक प्रसन्न व ज्ञानेंद्र नावाच्या पितापुत्राची गोष्ट सांगतो. ती लक्ष देऊन ऐक असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

बऱ्याच वर्षांपूर्वी धरणगिरी नावाच्या गावांत एक प्रसन्न नावांचा श्रीमंत शेतकरी रहात होता. त्याला दोन मुलगे होते



एकाचे नाव जितेंद्र व दुसऱ्याचे ज्ञानेंद्र. जितेंद्र जात्याच शांत व विनयशील. त्या उलट स्वभाव ज्ञानेंद्रचा होता.

प्रसन्नने आपले सारे शेत दुसऱ्याला मशागत करण्यास दिले होते. तरी तो दररोज तेथे प्रत्यक्ष जाऊन कामाची पहाणी करे. कारण शेतकाम जरी दुसऱ्यास दिले तरी देखरेख केली नाही तर भू-मातेचा अपमान होईल असे त्याचे मन म्हणे.

जितेंद्र सुद्धा आपल्या वडीलांबरोबर रोज शेतात जाई. व शेतकऱ्यांसोबत मोठमोठ्या गप्पा करी. की कोणते बी पेरल्याने जास्त पिक निघेल किंवा धान्य कोणत्या वेळी पेरावे वगैरे वगैरे त्या कारणामुळे त्यांनी शेतकऱ्यावर आपला जास्त प्रभाव पाडला.

ज्ञानेंद्रला मनापासून शेतकामाची आवड नव्हती. त्याच्या वडीलांनी जर त्याला शेतीबद्दल काही काम सांगितले तर एकदा सांगून पुरत नसे तर दहादा सांगितल्यावर तो ते काम अनिच्छेने करे.

त्याला एकच काम आवडे, गावातील चार पांच उडाणटप्पू मुलांच्या बरोबर आपला वेळ घालवून फालतू गोष्टीची चर्चा करीत बसणे. त्या एकच कारणांमुळे ज्ञानेंद्र वडिलांच्याच मनांतून नाही तर इतर गावातील लोकांच्या मनांतून साफ उतरला. वडीलांनी बरेचदा आपल्या मुलाला मोठ्या भावाचा आदर्श समोर ठेऊन पटवण्याचा प्रयत्न केला. सरतेशेवटी त्याला रागावून दामटवून सुद्धा पाहिले तरी त्याचा काही उपयोग झाला नाही.

परंतु ज्ञानेंद्रला सुद्धा मनातून हि गोष्ट डाचत होती की, आपण वेळ अगदी व्यर्थ घालवत आहोत. पण करणार काय? त्याचे मन शेतीमधे अजिबात रमत नसे.

असेच काही दिवस उलटले. एक दिवशी ज्ञानेंद्र अचानक आपल्या वडिलांपाशी आला व त्यांना म्हणाला–"बाबा, तुम्ही मला कित्येकदा अयोग्य म्हणून रागावला आहात त्यामुळे मी विचार केला व आता एक निर्णय घ्यायचा. की, एखादा चांगला व्यापार करावा. त्याकरीता राजधानी योग्य आहे. हि गोष्ट ऐकून वडिलांना एकदम आश्चर्याचा धक्काच बसला ते म्हणाले–"अरे बाळा, तू व्यापार करणार म्हणतोस पण त्यासाठी भांडवल कोठून आणणार?"

सध्या व्यापारासाठी तुम्ही मला थोडे पैसे द्या आणि जर कां देणार नसलात तर ह्या इस्टेटी मधला माझा वाटा मला काढून द्या." ज्ञानेन्द्र आपल्या वडिलांना म्हणाला.

त्यावर वडिल निराश होत म्हणाले–"अरे अनेक पिढ्या आपल्या ह्या शेत-जमिनीवर वाढल्या आणि आता तर तू म्हणतोस हे गांव सोडून शहरात जाऊन धंदा करतो हा तुझा विचार तुझे यश उज्वल करणारे वाटत नाही. तू एकदा का शहरात पाऊल टाकलेस की तेथील झगमगती दुनिया पाहून त्या गोष्टीना बळी पडशील. माझ्या कुडीत जोपर्यंत प्राण आहे तोपर्यंत मी तुझे हे चाळे चाल-वून देणार नाही."

ज्ञानेंद्रने प्रथमच: आपल्या वडिलांना इतके संतापाने बोलताना पाहिले तरी तो थोडा सुद्धा घाबरला नाही व दृढनिश्चयानें वडिलांना म्हणाला–"बाबा, मी शहरातील झगमगीकडे पाहून आपल्याकडे पैसे मागत नाही. परंतु व्यापार धंदा करावयाचा हा माझा निश्चय कायम आहे. आपण पैसे देणार असलात तर द्या. नाहीतर, माझा ह्या इस्टेटीतला हिस्सा द्या."





वडिलव मुलामधे अशा तऱ्हेचा वाद-विवाद बराच काळ चालला. शेवटी तर हि समस्या गावातील दोन तीन प्रतिष्ठीत माणसे व जितेंद्र समोर मांडण्यात आली. तरी त्यांचे भांडण मिटले नाही. तेंव्हा एका प्रतिष्ठीत माणसांनी एक उपाय सांगत म्हटले–"प्रसन्न, तू थोडे पैसे ज्ञानेंद्रला दे. त्या पैशाने तो व्यापार तरी सुरु करेल परंतु त्यासाठी एक अट त्याला घाल. की काही झाले तरी एका वर्षाच्या आत तू धद्यात काही तरी फायदा मिळवून दाखवला पाहिजेस. हि अट मान्य असेल तरच तू पैसा दे. व व्यापार करण्याची अनुमती दे."

ज्ञानेंद्रने त्या लोकानी सांगितलेली अट मान्य केली. तेव्हां प्रसन्नने अनिच्छेनेच त्याला व्यापारासाठी थोडाफार पैसा दिला.

ज्ञानेंद्रने शहरात जाण्यापूर्वी आई-वडीलांना नमस्कार केला आणि त्याचा आर्शीवाद घेतला. आईने डोळयात पाणी आणून त्याचा निरोप घेतला परंतु वडिलांनी कठोर शब्दात त्याला म्हटले–"तू आता जाऊ शकतोस. आमचे आशिर्वाद नेहमी तुझ्या पाठीशी रहातील. परंतु ह्यापुढे माझ्याकडून तुला काही मिळेल ह्याची मात्र अपेक्षा ठेऊ नकोस."

ह्यानंतर ज्ञानेंद्र राजधानीला येऊन पोहोचला व एका महिन्याच्या आतच त्याने बापाने दिलेला सारा पैसा खर्च करून टाकला. तेवढ्यात त्याला वाईट व्यसने सुद्धा लागली तो दारू पिऊ लागला व त्यातच तो खूप आजारी पडला.

ज्ञानेंद्रची आई त्याची ती दयनिय स्थिती पाहून रडू लागली. परंतु त्याच्या वडीलांचा राग अनावर झाला ते चिडून जात त्याला म्हणाले–"तू तर आपल्या भूमातेला विसरून तिच्यावर अविश्वास दाखविलास आता तरी तुझ्या डोक्यात काही अक्कल आली का नाही? ह्यानंतर रागाच्या भरातच त्यानी वैद्याला बोलावणे धाडले व त्याच्यावर औषध पाणी केले.

थोडया दिवसातच त्याची तब्येत चांगली सुधारली. तेव्हां प्रसन्नने पुन्हां त्याला बजावत म्हटले–"तुला जो काय अनुभव आला तो डोळयासमोर ठेवलास तरी पुरे. आता उद्यापासून तू जितेंद्रबरोबर शेतात कामास जा. तोच तुला शेतीविषयी सर्व शिकवले. ज्ञानेंद्र नाइलाजास्तव शतकाम करू लागला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला–"राजा, आता तूच सांग त्या बाप लेकात जो वादविवाद झाला. त्यात कोणी सहज-सुलभपणे मार्ग अवलंबला. त्यामधे जी काय अट घातली गेली त्यात तर पैसा खर्च होण्यापलीकडे काही पर्याप्त झाले नाही. मग दोष कोणाचा? या प्रश्नाची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"सारा दोष माझा आहे म्हण! कारण ज्ञानेंद्र स्वभावाने तर काही वाईट नव्हता तेव्हां त्याच्या मनांत व्यापार करण्याची इतकी उत्कट इच्छा असतांना वडिलांनी त्याच्याबरोबर वाद न घालता पैसा देण्याचे कर्तव्य प्रथम करावयास हवे होते. तो जरी शेतकरी असला. तरी मुलांनी सुद्धा शेतकरीच व्हावे हि अभिलाषा वडिलांनी बाळगणे योग्य नाही. परंतु जेव्हां त्याच्या लक्षात आले की ज्ञानेंद्रची ओढ व्यापार करण्यापाठीमागे आहे. तेव्हां वडिलांनी त्याला एखाद्या व्यापाऱ्यापाशी धाडून त्याचे शिक्षण देण्याचे कर्तव्य करावयास पाहिजे होते. तसे न केल्याने उलट चांगला मुलगा वाईट व्यस-नांच्या आहारी गेला व शेवटी अनिच्छेनेच तो शेतीवाडी करू लागला. ह्यापाठीमागे मला तरी सर्व दोषाचे कारण प्रसन्नने केलेल्या कार्याचे वाटते.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)














# दूधाची चव

धवलपुरीचा राजा सुवर्णवर्मा त्याला एकदा अशी बातमी समजली की आपल्या राज्या नजिकच्या जंगलात एक सूर्यदेव नावाचे ऋषी येऊन तपश्चर्या करीत आहेत. ते ऋषी महान तपशाली व प्रभावी महाज्ञानी आहेत. तेव्हां राजाच्या मनात विचार आला की, महामुनीचे फक्त दर्शनच नाही तर एक दिवस पूर्ण त्या महान ऋषिच्या सानिध्यात घालवावा. त्याकरीता त्याने ऋषीची अनुमती प्राप्त करण्यासाठी मंत्र्याला त्यांच्याकडे पाठविले.

मंत्री सूर्यदेवऋषीच्या आश्रमात आले व त्याचा निरोप ऐकून म्हणाले–"मी तर असे ऐकले आहे की, आपल्या देशचा राजा उत्तम राज्यकारभार करणाराच नाहीतर अत्यंत न्यायशील सुद्धा आहे. अशा व्यक्तिच्या मनात माझ्या आश्रमात एक दिवस घालवावा अशी इच्छा उत्पन्न झाली म्हणजे ह्याचा अर्थ तो धार्मिक जिज्ञासा मण ठेवणारा असावा. तसे जर नसते तर स्वतःचा सुखदायक महाल सोडून माझ्या ह्या पर्णकुटीमधे रहाण्याची इच्छा त्यांना झाली नसती. त्यांना जाऊन माझा असा निरोप द्या. की आपण येथे यावे.

मुनींचे बोलणे ऐकून मंत्री अत्यंत आनंदीत झाले. त्याचवेळी आश्रमातील एका शिष्याने एका लोटयात दूध आणले व मंत्री महाशयाना पिण्यास दिले. ते दूध पिताच त्या दूधाचा स्वाद मंत्र्याला असाधारण आहे असा वाटला. मंत्र्याने त्या शिष्याला म्हटले–"मी अद्याप पावेतो इतके स्वादिष्ट दूध कधी प्यायले नव्हते हे दूध देणारी गाय उत्तम पैकी जातीची असावी हो नां?"

"माझ्या गुरूंचे जास्त प्रेम असणाऱ्या गाईचे हे दूध आहे!" त्या शिष्याने उत्तर देत म्हटले.

मंत्र्याने थोडावेळ तेथे घालवला व नंतर ते राजधानीला परत निघून आले. दुसऱ्या दिवशी राजा सुवर्णवर्मा आपल्या मंत्र्यासह सूर्यदेव ऋषिच्या आश्रमात आले ते येताच ऋषीनी त्यांचे उत्तम तऱ्हेने स्वागत केले व त्यांना आशिर्वाद देऊन एका दर्भासनावर बसण्यास संकेत केला. ह्यानंतर त्यांनी आपल्या शिष्यापैकी एकाला बोलावले व राजाला दूध देण्यास सांगितले.

शिष्य आश्रमात जाऊ लागला तेव्हां मंत्र्याने हळूच त्या शिष्याला सांगितले–"अरे हे बघ, राजाला तू तेच दूध घेऊन ये जे काल मला दिले होतेस. म्हणजे तुझे गुरू जिच्यावर जास्त प्रेम करतात तिचेच दूध घेऊन ये. समजले!"

"हो, हो, मी त्याच गाईचे दूध आणतो. आमचे गुरुदेव अतिथींना पिण्यास देण्यासाठी त्याच गाईचे दूध आणण्यासाठी सांगतात." शिष्य म्हणाला.

ह्यानंतर शिष्याने दोन लोटे भरून दूध आणले. त्यातला एक राजाच्या हातात दिला व दुसरा मंत्र्याच्या हातात देत म्हटले–"महानुभाव, हे दूध त्याच गाईचे आहे ज्या गाईचे दूध तुम्ही आणण्यास सांगितले."

मंत्र्याने दूधाचा एक घोट प्याला व तोंड वेडेवाकडे केले नंतर त्याने शिष्याला हाताला धरून थोडे दूर नेले व विचारले–"अरे तू नक्की खरे सांगतो आहेस नां! की हे दूध काल मला दिलेल्या गाईचेच दूध आहे. कां चुकून तुझ्या हातून गडबड झाली.



"ह्यात काहीहीं चूक झाली नाही." शिष्य म्हणाला.

राजाने त्या गोष्टीकडे लक्ष सुद्धा दिले नाही व थोडे थोडे दूध पित एकाग्रचित्ताने ऋषीच्या वाणीचे श्रवण करीत राहला.

थोड्यावेळाने ऋषींनी आपले वक्तृत्व संपवले व ते उठून उभे राहीले. काहीं कामासाठी ते आत निघून गेले. त्यावेळी राजाला मंत्र्याने विचारले–"प्रभू, दूधाचा स्वाद कसा होता?"

"अरे वा! काय सांगू? एकदम अदभुत् सुंदर चविष्ठ." राजा म्हणाला.

ते उत्तर ऐकताच मंत्री म्हणाला–"महाराज, काल मला दूध इतके स्वादिष्ट अवर्णनिय लागले सांगू त्या करीता मी ऋषींपाशी ही गाय विकत घेण्याविषयी सुद्धा विचारले. ऋषींनी त्या गाईची किंमत एक हजार सुवर्णमुद्रा सांगितली. तेव्हां मी ते पैसे देण्याचा निश्चय केला. परंतु आश्चर्याची गोष्ट आहे. आज मी दूध प्यालो ते एकदम साधारण वाटले.

ते ऐकून राजा क्षणभर मौन राहीला. नंतर शांत चित्ताने म्हणाला–"मंत्रीवर, काल दूधाचा स्वाद अशाकरीता चांगला होता की तुमचे मन ऋषिंच्या बद्दल कृतज्ञतेने भारावलेले होते. परंतु दुसऱ्याक्षणी तुमचे मन चंचल झाले व ती भावना नाहीशी होऊन गेली तुमच्या मनांत दूधाचा स्वाद जाऊन त्या ठिकाणी स्वार्थ भावनेचा किडा वळवळू लागला व तुम्ही त्या ऋषींच्या गाईची किंमत सुवर्णमुद्रामधे केली व त्या गाईची तुलना पैशाच्यो भावात केली. तसे झाल्यामुळे दूधाचा कालचा स्वाद तुम्हांला आज कसा आणि कोठून चांगला येणार.

मंत्र्याने शरमेने मान खाली घातली.

तेव्हा राजा मंत्र्याला गंभीरतेने म्हणाला–"मंत्रीवर, मी ऋषींच्या चरणी व त्यांच्या सानिध्यात एक दिवस शांतीपूर्वक रहाण्याच्या इच्छेने आलो आहे. आपण परत निघून जावे."

त्यावर मंत्री आश्रमाबाहेर निघून गेला.



आपली देवळे

## कामाक्षी मंदिर



आसाम मधील गौहत्ती शहरा जवळच्या नील पर्वतावर शोभायमान कामाक्षी देवी भक्तजनांना मंत्र-तंत्राच्या शक्ति देते असा विश्वास पूर्वकाळापासून प्रचलीत आहे "जगदम्बा कामाक्षीच्या आज्ञेने सांगतो आता असे करा." असे मांत्रिक श्रद्धापूर्वक सांगतात.

भक्तांचा सुद्धा त्यावर विश्वास आहे की दक्ष यज्ञाच्या उपरान्त शंकर सती-देवीच्या भौतिक शरिराला उचलून सर्व पृथ्वीवर संचार करू लागले. तेव्हां सतीदेवींच्या शरीराचा एक अंश ह्या पर्वतावर पडला आणि त्याठिकाणीच ह्या कामाक्षी मंदिराची स्थापना झाली. त्या काळी हे देऊळ एका घनदाट अरण्यात होते. त्यामुळे साधारण भक्त लोकांना तेथे जाता येणे अशक्य व संकटाना तोंड द्यावे लागे.





१६ व्या शतकात ह्या डोंगरातील हे मंदिर काळापहाड सैनिकांनी उध्वस्त केले. त्या सैनिकांनी त्या मंदिराला चारी बाजूने घेरले. त्यामुळे क्षत्रिय राजाला त्या मंदिराचे रक्षण करणे जमले नाही. ह्यानंतर अनेक वर्षे ह्या मंदिरात एकच एक पुजारी राहिला तो म्हणत असे हे देऊळ सदा निर्जन असते.














काही काळानंतर आसामचा राजा मल्लदेव ह्याने बंगालच्या नवाबावर आक्रमण केले. परंतु तेथे युद्धात पराभूत होऊन तो त्या नवाबाचा कैदी बनला. नवाबाने त्याला आपल्या किल्ल्यातील तुरुंगात डांबून टाकले.

एक दिवस मल्लदेव गाढ झोपेत असतांना त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात देवीने प्रत्यक्ष दर्शन देत त्याला विचारले–"राजा तुझ्या राज्याच्या सीमेपाशी तुझ्या राज्याची अधिष्टात्री देवीचे देऊळ उध्वस्त होऊन पडलेले आहे. परंतु तू त्याकडे दुर्लक्ष करून त्याची डागडुजी न करता दुसऱ्या राज्यावर हल्ला करून आता कैदेत पडला आहेस काय तुला ह्या गोष्टीची लाज वाटत नाही का ?"





राजा खडबडून जागा झाला व त्याला स्वतःची चुक समजली देवीने त्याला स्वप्नात तुरुंगातून बाहेर पडण्याचा मार्ग सुद्धा सांगितला होता. दुसऱ्या दिवशी नवाबाची आई बागेत हिंडत होती. त्यावेळी ती साप चावल्याने बेशुद्ध होऊन खाली कोसळली.

अनेक वैद्यांनी नवाबाच्या आईवर उपचार करून तिचे रक्षण करण्याचा पूर्णप्रयत्न केला. परंतु तिच्या प्रकृतीत काही सुधार पडला नाही. नवाबाला स्वतः पेक्षा आईच्या प्राणांची जास्त पर्वा होती. त्यामुळे स्वतःच्या आईची स्थिती पाहून त्याला अत्यंत दुःख झाले.





वैद्यांनी अनेक प्रकारे उपचार करून शेवटी हार मानली. तेव्हां राजाने दरबार भरवला व अशी घोषणा केली. की जो कोणी माझ्या आईला बरे करेल. त्याला तो जे काय मागेल ते बक्षिस देण्यात येईल. परंतु भरलेल्या दरबारातील एकही माणूस पुढे आला नाही.

कैदेत बंद असलेल्या राजाने पहारेकऱ्याला सांगितले–"तू जर नवाबाला सांगून मला कैदेतून मुक्त केलेस तर राजाच्या आईला मी वाचवू शकेन" असे म्हणताच पहारेकऱ्याने राजाला जाऊन तो निरोप कळवला राजाची गोष्ट नवाबाने मान्य केली व त्याला दरबारातील राजमहालात येण्यासाठी विनविले.





कामाक्षी देवीने राजाला स्वप्नात एका मंत्राचा उपदेश दिला होता. राजाने नवाबाच्या आईपाशी जात त्या मंत्राचा पाठ म्हटला. तेव्हां त्याची आई अशा तऱ्हेने खणखणीत बरी होऊन उठली की जसे काही झोपेतून आता उठावी अत्यंत आनंदाने नवाबाने राजाला मीठी मारली आणि अनेक बक्षीसे भेटी देऊन त्याला मुक्त करून निरोप दिला.

राजा आपल्या राजधानीत परत आला. आणि उत्तमपैकी भाजून तयार, केलेल्या विटांनी मंदीराची बांधणी करून त्याने अल्प काळात ते मंदिर बांधून तयार केले. तो मरे पर्यंत त्या देवीचा भक्त म्हणून राहिला व देवळाची पुजाअर्चा इत्यादी कार्यक्रम व्यवस्थित पार पाडण्याची जबाबदारी शेवटपर्यंत पार पाडली.





त्या दिवसांपासून भक्तगण त्या देवळात दर्शनास येऊ लागले. ह्या देवळातील गाभाऱ्यात काळ्या दगडात कोरलेली देवीची प्रतिमा जणु जिवंत रूप असल्यासारखी भासते. तेथील कोरीवकाम अनेक कलांनी परीपूर्ण असल्यामुळे ह्या देवीला एक प्रकारची आगळी शोभा येते.



# निरर्थक कायदा

लवगपुरचे महाराजा शांतगुप्त धर्माचरण सम्बंधी व आचाराविचारांचे श्रद्धा-पूर्वक आचरण करत होते. मुख्य करून त्यांचा मनात साधू व संन्याशाविषयी भक्ति व अपार आदरभाव होता. राजाने राज्यात एक नविन कायदा काढला की, राज्यातील असलेल्या साधू संन्याशाना कोणत्याही प्रकारचे कष्ट होवू नये. व त्याचा प्रामुख्याने आदर सन्मान करावा. त्यांच बरोबर राजाने स्वतःच्या राज्यात साधू-संन्याशाच्या सोईसाठी त्यांना मुबलक खाणे-पिणे व रहाण्याच्या फुकटच्या धर्मशाळा बांधून दिल्या.

ह्या गोष्टी नंतर एक दिवस राजाचा मंत्री माधववर्मा राजाजवळ येत राजाला म्हणाला—"महाराज, आपण जो कायदा लागू केलात त्याकारणामुळे आपल्या राज्यातील मिळकत जास्त करून साधु-संन्याशांकरीता खर्च होत चालली आहे. त्यामुळे जनतेचे कल्याण न होता विनाकारण विघ्न येऊ लागले आहे. त्यात आणखी एक महत्वाची गोष्ट आपल्या राज्यात अधिक प्रमाणात अपराध करणाऱ्यांची संख्या वाढत चालली आहे.

मंत्र्याचे बोलणे ऐकताच राजाने अनिच्छेनेच मान हलाविली व म्हटले—"मी साधुंच्या कल्याणाच्या हेतूने हा कायदा बनवला. तर तुम्ही त्याच गोष्टीचे उलट कारण मानता आहात. म्हणजे तुमचा हेतू आहे. भगवतस्वरूपी साधू संन्याशाचा अपमान करावा.

मंत्री थोडावेळ गप्प राहीला नंतर म्हणाला—"प्रभू, खरे कारण सांगणे हे माझे मी कर्तव्य समजतो?"

राजाने त्याच्या म्हणण्याकडे स्विकृती सुचक मान हलविली व म्हणाला—"राज-

शाता पाठक



गुरू जवळजवळ वर्षभर देशाटन करीत आहेत. त्यामुळे मला कायदा करण्याचा पूर्व अनुभव असलेल्या महानुभावाकडें सल्ला विचारण्यांची संधी प्राप्त झाली नाही ही तर चांगली गोष्ट आहे. आता तुम्ही एक काम करा, ह्याक्षणी तुम्ही अशा एका गोष्टीची दवंडी पिटवा की, सारी प्रजा कष्ट मेहनत करून बरोबर वेळेला कर चुकता करेल त्यात जो कोणी हयगय करेल त्याला कठोर दंड देण्यात येईल हा नियम काटेकोरपणे पाळला तर आपल्या राज्याचा खजिनां नक्कीच पूर्णपणे भरला जाईल.

मंत्र्याने राजाच्या म्हणण्यानुसार साऱ्या राज्यभर तशी दवंडी पिटविली.

काही दिवसानंतर राजा शांतगुप्तने मंत्र्याला एकांतात बोलावून विचारणा केली–"मंत्रीमहोदय, ह्यावेळी राज्याच्या खजिन्याची काय हालत आहे? सारी प्रजा माझ्या आज्ञेचे पालन करेत आहे नां?

मंत्र्याने विनयतेने राजाला म्हटले–महाराज, तुम्हांला कसेकाय निवेदन करू. राज्याच्या खजिन्याची स्थिती जास्तच बिघडत चालली आहे.

ते उत्तर ऐकताच राजाला अत्यंत आश्चर्य वाटले म्हणजे–"प्रजा माझ्या आज्ञेचे पालन करीत नाही तेव्हां आपण आता त्याचे कारण शोधावयास हवे की प्रजेचा ह्यापाठीमागे काय हेतू आहे. आता गुप्तवेष धारण करून बाहेर पडावयास हवे.

ह्यानंतर राजा व मंत्री दोघे वेष बदलून देशाटन करण्यास निघाले–"एका गावांत पोहचल्यावर त्यांनी पाहिले की काही लोक शेकोटी पेटवून त्याच्या भोवताली गप्पागोष्टी करीत बसलेले आहेत.

राजा व मंत्री दोघे त्याच्यानजिक येऊन पोहोचले व म्हणू लागले–"आम्ही असे ऐकले आहे की, जी माणसे कामधंदा सोडून आळसटा सारखा स्वतःच्या वेळेचा अपव्यय करतात त्यांना ह्या देशाचा राजा मोठ्यात मोठी कठीण शिक्षा देतो.

त्यांचे बोलणे ऐकून ते शेकोटीच्या चौफेर बसलेले लोक पोट धरून खदाखदा हसू लागले. आणि म्हणाले–"अहो, आम्हांला वाटते की तुम्ही ह्या देशातील नसावेत परदेशातील असावेत." असे म्हणून त्यांनी त्या दोघांना भिंतीवर लटकवलेले दण्ड कमण्डलु व भगवी वस्त्रे दाखविली व ते दाखवत म्हटले–"जर कां कोणी आम्हाला असे म्हणू लागले की आम्ही राजाच्या आज्ञेचे उल्लंघन करीत आहोत तर काही क्षणातच आम्ही साधू संन्याशांचा वेष धारण करतो. परंतु एक गोष्ट खरी आहे. ह्या देशातील आळशी लोकांना मात्र शिक्षा मिळते आहे. परंतु साधू-संन्याशाच्या बाबतीत हा कायदा लागू होत नाही. मग त्यांनी कोणताही अपराध कां केला असेंना साधू संन्याशांच्या वेषात आम्हांला पाहून लोक उलट आमचा इतका सन्मान व आदर करतात बस्स्...

"हो, हो, असे आहे कां? ह्यानंतर राजा व मंत्र्याने आजुबाजूच्या देशातून भ्रमण केले. त्यांना बहुतेक ठिकाणी तशा प्रकारचा अनुभव आला.

नंतर राजा व मंत्री राजधानीत परतले. राजाला राजवाड्यात परत आल्यावर एक मोठी चिंता वाटू लागली की आपण प्रजेच्या हितासाठी ज्या गोष्टीची योजना आंखली ती तर निरर्थक सिद्ध झाली. त्याचवेळी राजगुरू देशाटनाहून परत आले होते तेव्हां ते ताबडतोब



मंत्र्याला राजाला समजले. राजा मंत्र्यासह राजगुरुच्या दर्शनास निघाला.

राजगुरूंनी राजाचे म्हणणे शांतचित्ताने ऐकले व त्याला समजावत म्हणाले– "राजन्, कोणत्याही गोष्टीची योजना व आदर्श न पहाता जो कायदा लागू करण्यात येतो तो सदा राजाला व प्रजेला अभिशाप म्हणूनच सिद्ध होतो. लोककल्याणाच्या हेतूने सर्वस्व परित्याग करणारे महापुरुष अगदी मोजण्या इतकेच सापडतात.

"गुरुदेव, आम्ही लोक प्रत्येक दिवशी अनेक साधू संन्याशाना पहात होतो नां?" राजा म्हणाला.

राजाचे उत्तर ऐकून राजगुरू मंदहास्य करीत म्हणाले–"पण त्यातील खरे साधू संन्याशी ओळखणे कठीण आहे. काही लोक जबाबदारी सांभाळण्याकरीता खोटे खोटे साधू संन्यासाचे रूप घेतात आणि अशा लोकांकरीता आपली प्रजा न्यायाने त्यांचा आदरसत्कार करते व त्यांना प्रोत्साहन देते. त्यामुळे लोकांमधे आळशीपणा व अराजकता माजू लागली आहे.

त्यावर राजा शांतगुप्तने नम्रतेने प्रणाम करीत म्हटले–"गुरुदेव, आपल्या म्हणण्याचा अर्थ हा निरर्थक कायदा न्याये हा नष्ट करण्याच्या उद्देशाचाच. आहे नां! तेव्हां आजच मी नष्ट करून टाकतो.

"राजन्, हे काम आपण जितके लवकर कराल तेवढे उत्तम होईल त्याचबरोबर एक गोष्ट लक्षात ठेवा. आजपासून धार्मिक रितीरिवाज ह्यांच्या चालीरिती संबधी आपल्या मनांतले भाव व विश्वास आपण जनतेवर अन्यायाने लादण्याचा प्रयत्न आजिबात करू नका." राजगुरूने राजाला सल्ला देत म्हटले.

राजाने त्याच दिवसांपासून साधू संन्याशांच्या सुखसोई करीता उपलब्ध केलेल्या धर्मशाला खानावळी वगैरे सर्व गोष्टी बंद करून टाकल्या आणि राज्यात अशी दवंडी पेटवली की राज्यात जो कोणी आळशी दिसेल त्याला कडक दंड करण्यात येईल.






यमराजा बरोबर युद्ध करण्याच्या इच्छेने गेलेल्या रावणाने यमलोकात नरक यातना भोगणारे पापी लोक व स्वर्गसुख भोगणारे पुण्यवान लोक पाहिले.

क्रुर व भयंकर असे वाटणारे यमदास सेवक पापी लोकांना किडे व घाण यांचा आहार देत होते. कुत्र्यांना चावायला लावत होते वैतरणी नदीत बुचकळत होते. तापलेल्या वाळूवर चालायला लावत होते. अशा तऱ्हेच्या भयंकर यातना भोगणारे लोक प्रेतवत पडून राहून तहानेने तडफडत होते. तर दुसऱ्या बाजूला पुण्यवान लोक पुण्याईची फळे चाखत अनेक प्रकारे सुखोपभोग प्राप्त करीत होते. लक्षावधी असलेले पापी लोक जे यातना भोगत होते. त्या पाहून रावणाला त्यांची अत्यंत कीव आली. त्याचे मन कळवळले. तो त्या यातनापासून त्यांना मुक्तकरू लागला. ते पाहून यमदूत संतापाने लाल झाला. त्या लोकांनी रावणाच्या पुष्पक विमानावर आपल्या शुळ, मुसळ, तोमर इत्यादी आयुधाचा वापर करून हल्ला केला, काहीजण तर मायावी वेष घेऊन मधमाश्याप्रमाणे त्यांच्या भोवताली गुंजारव करून विमानाची मोडतोड करून फेकून देऊ लागले. परंतु ते विमान अक्षय होते. त्यामुळे ते भंगले नाही.

तितक्यात नारदमुनी यमराजापाशी आले. त्यांनी त्यांचा आदर सत्कार करून पादपुजा वगैरे केली व कुशलक्षेम विचारत त्यांच्या येण्याचे कारण विचारले.









"यमराजा, दशग्रीव नावाचा अजेय राक्षस आपणास पराजित करण्याच्या दृढ निश्चयाने आपल्यावर हल्ला करण्यासाठी आला आहे. आता खरी आपल्या यमदण्डाची परिक्षा होणार आहे." नारद म्हणाला. त्याचवेळी लांब त्यांना एक झगमगते पुष्पक विमान दृष्टीस पडले.

तिकडे रावणाने थोडावेळ यमलोकांवर हल्ला करून युद्ध केले व शेवटी त्यांच्यावर पाशुपतास्त्राचा प्रयोग केला. तो झाल्यावर वणवा पेटल्या प्रमाणे तो सारा प्रदेश व त्यांतील झाडे झुडपे भस्मीभूत होत आग चौफेर पसरत चालली. त्यांत यमाचे दास सेवक त्यात पाखरां प्रमाणे जळून भस्म होऊन गेले. ते पाहून प्रसन्नतेने रावणाने आपला आनंद व्यक्त केला तो व त्याचे मंत्री मोठमोठ्याने हंसले की त्या हसण्याच्या आवाजाने सारा यमलोक दणाणून गेला.

तो आवाज ऐकून यमराजाने जाणले की, रावणाने सर्व जिंकले आहे. तेव्हां त्याने आपल्या सारथीला बोलावून रथ तयार करण्याची आज्ञा केली. काही क्षणातच लाल तांबुस घोड्यांचा रथ येऊन उभा झाला. मृत्यु देवी यमपाश धारण करून त्याच्या जोडीने रथामधे उभी राहली. यमराज रथात बसले. दुसऱ्या बाजूला कालपाश अशा प्रकारे युद्धाला निघालेले यमराज पहाताच तिन्ही लोक व देव देवता थरथर कांपू लागले.

मनाप्रमाणे विद्युतवेगाने धांवणारे ते यमराजाच्या रथाचे घोडे काही क्षणातच त्याला रावणा समोर घेऊन आले. मृत्यु देवतेच्या बरोबर अत्यंत भयंकर दिसणाऱ्या यमराजाच्या रथाला पाहूनच रावणाचे मंत्री घाबरून जाऊन सैरावैरा पळू लागले परंतु रावण थोडा देखील डगमगला नाही. तो जशाचा तसा निश्चल उभा राहीला.

त्यानंतर यमराज व रावण ह्या दोघांमधे सात दिवसरात्र घनघोर युद्ध झाले. यमराजाने आपल्या अस्त्राने रावणाला अनेक प्रकारे जखमी केले. परंतु रावणाने



हार मानली नाही. उलट आपल्या अनेक प्रकारच्या बाणाने यमराज व मृत्युदेवीला व सारथ्याला अनेक प्रकारे त्रस्त करून सोडले.

ते पाहून मृत्यु यमराजाला म्हणाला– "यमधर्मराज, ह्या राक्षसा बरोबर मला युद्ध करण्याची परवानगी द्या. मी ह्याला काही क्षणात मारून टाकतो: मारणे हा माझा हक्क आहे. मी कित्येक राक्षसांना मारलेले आहे. हे पण पाहिले आहे की, प्रलय काल आला तर साऱ्या जगाचा नाश होतो. हा तर मला एखाद्या किड्याप्रमाणे आहे?"

"तुम्ही पहा! मी ह्याला कसा मारून टाकतो." असे म्हणत यमाने कालदण्ड घेतले. ते ज्वाळेनें तळपत असल्याप्रमाणे भयंकर वाटले. यमराज ते उचलून रावणावर फेकणार तितक्यात ब्रह्मदेव प्रत्यक्ष होत म्हणाले–"यमराज, ह्या कालदण्डाचा प्रयोग करू नको. ह्या दण्डाच्या प्रयोगाने जर कां रावणाचा मृत्यु झाला तर रावणाला मी दिलेला वर खोटा प्रमाणित होईल. मृत्यु झाला नाही तर ज्या उद्देशाने मी ह्या कालदण्डाची सृष्टी केली आहे ती असत्य सिद्ध होईल. पुष्कळ वर्षांपूर्वी मी ह्याची सृष्टी मृत्यु साठी अमोघ म्हणून केली होती. त्यामुळे जर कां तू ह्या कालदण्डाचा प्रयोग रावणावर केलास तरी कोणत्या नां कोणत्या तरी रूपाने तो कालदण्ड खोटा सिद्ध होईल व माझे म्हणणे खोटे ठरेल."

ब्रह्माचे म्हणणे मान्य करून त्याने कालदण्ड वेगळे काढून ठेवले. त्याच्या लक्षात आले की, रावणाचा संहार करण्याचा दुसरा मार्ग नाही. तेव्हां युद्धक्षेत्री जाण्यात तरी काय अर्थ आहे? असा विचार करून यमराज रथासकट अदृश्य होऊन ब्रह्माबरोबर स्वर्गात निघून गेला.

रावणाने यमाला पराभूत केल्याची घोषणा केली. व तो आपल्या पुष्पक विमानात विराजमान होऊन यमपुरीला



पोहोचला. ते दृष्य पाहून नारदमुनी अत्यंत आनंदीत झाले.

यमराजाला पराजित करून मारीच व इतर मंत्र्याची स्तुती प्रशंसा प्राप्त करून रावण आपल्या पुष्पक विमानात बसून मोठ्या गर्वाने फुलून जाऊन पाताळ लोकात निघाला. तेथे प्रथम त्याने वरुणाच्या आधीन असलेले व स्थित समुद्रात प्रवेश करून वासुकी वगैरे नागलोकांवर अधिकार प्राप्त केला. नंतर निवात व कवच ह्यांच्या अधिकारात असलेल्या मणिमती नगरात पोहोचला. तेथे त्याने आपली अनेक विभिन्न अस्त्रे शस्त्रे धारण करून युद्धास तयार होऊन येत असलेल्या निवात व कवच ह्यांच्याबरोबर युद्ध केले.

हे युद्ध एक वर्षापर्यंत अखंड चालू होते. जय व पराजय ह्यांचा निर्णयच लागत नव्हता. अशा वेळी ब्रह्मा आपल्या वहानात बसून तेथे आले व त्यांनी त्या दोघांच्यात सख्य निर्माण केले. तोपर्यंत रावण निवात व कवच ह्यांच्याकडे पाहूणा म्हणून राहिला. त्याने त्या ठिकाणी त्याचा वेळ इतका ऐषआरामात घालवला. त्यावेळी त्याने त्यांच्यापाशी नव्याणव मायाजाल विद्या शिकल्या ज्या त्याला माहित नव्हत्या. नंतर तो वरुणाचे नगर शोधण्यासाठी निघाला. त्याला मार्गमध्यावर कालकेयचे अश्म नगर लागले. तेथे रावणाने कालकेया



बरोबर युद्ध केले. त्या युद्धात रावणाने कालकेयाचा संहार केला.

त्या युद्धात वीरांमध्ये विद्युज्जिव्ह सुद्धा होता. जो शुर्पणखाचा पती होता. त्याला आपल्या शक्ति सामर्थ्याचा भयंकर अहंकार होता. तो आपला जबडा आवासून विजेच्या कडकडाटा सारखा जिभेने राक्षसांना चाटून खाऊन टाकत असे. परंतु अशा पराक्रमी राक्षसाला रावणाने एका सेकंदात मारून टाकले. ह्या लढाईत एकूण चारशे कालकेयचे सैनिक रावणाच्या हाती मरण पावले.

तेथून निघाल्यावर रावण वरुणाच्या महालात आला. तो महाल पांढऱ्याशुभ्र खण्डा सारखा कैलासा प्रमाणे वाटत होता.



तेथे क्षणाक्षणाला दूधाची धारा देणारी सुरभी नावाची कामधेनु रावणाला दिसली. त्या क्षीरसागरा पासूनच चंद्रमा तयार झाला. अमृत निर्माण झाले. त्या क्षीरसागराच्या फेसाच्या आहारावरच काही ऋषी मुनी जगत. नंदी कामधेनु पासूनच उत्पन्न झालेला होता. त्या तशा कामधेनुला प्रदक्षिणा घालून रावण वरुणाच्या महालात पोहोचला. वरुणांच्या द्वारपालांनी त्याच्याबरोबर युद्ध केले. रावणाने त्या लोकांचा संहार केला. नंतर त्या वीरांना म्हटले— "तुम्ही त्या वरुणाकडे जा. व त्यांना सांगा की, रावण युद्धासाठी आला आहे." वरुणांची मुलेत्रनातवंडे आपल्या सैन्यासह रथांवर स्वार होऊन रावणाशी युद्ध करण्यास आले. परंतु काही क्षणातच सर्वजण रावण व त्याच्या मंत्र्यांच्या हाती पराभूत झाले. आपल्या सर्व सैन्याला लढाईत पराभूत झालेले पाहून वरुणाच्या मुलांनी मोठ्या पराक्रमाने शर्थीने लढा दिला परंतु त्यांना सुद्धा रावणापुढे हार मानावी लागली. त्यानंतर रावणाने वरुणाला मोठ्या गर्जना करीत युद्धास आव्हान केले. तेव्हां त्याला समजले की, वरुण आपल्या महालात नसून संगीत ऐकण्यासाठी ब्रह्मलोकात गेला आहे.

ते पहाताच रावणाने स्वतःचा विजय झाल्याची दवंडी पिटवीली. व पुष्पक विमानात स्वार होऊन तो पुनः अश्म नगरात परत आला. तेथे मोठ्या गर्वाने फुलून जाऊन तो स्वैरसंचार करू लागला. तेव्हां त्याला विलक्षण असे एक अद्‌भुत भवन दृष्टोत्पत्तीस पडले. तो महाल उत्तम तऱ्हेने सजविला होता. त्यात माणीक मोती वैडुर्य वगैरे मढवलेली दारे खिडक्यांना तोरणे होती सोन्या चांदीचे खांब होते स्फटिकाची जमिन होती. तो महाल कोणाचा आहे ह्याचा शोध काढण्याच्या उद्देशाने रावणाने आपला मंत्री प्रहस्त ह्याला आज्ञा करीत म्हटले—"तू ह्या महालाचा मालक कोण हे शोध ?"

प्रहस्त महालात प्रवेश करीत पहिला प्राकार निरखित आत गेला. परंतु तेथे त्याला कोणीही दिसले नाही. अशा प्रकारे तो एकापाठोपाठ सात दालने ओलांडून आत गेला. तेव्हां तेथे त्याला एक अग्नि दिसला त्याच्या मध्यभागी एक दिव्य असा पुरुष दिसला. तो सूर्याच्या तेजाने डोळे दिपावे तसा पहावत नव्हता. तो महापुरुष प्रहस्ताकडे पाहून प्रसन्नतेने हंसला ते त्याचे हसणे ऐकून प्रहस्त पुलकीत झाला. तो परत पावली रावणापाशी आला आणि त्याने तेथे पाहिलेला व ऐकलेला सारा समाचार रावणास सांगितला.

ती गोष्ट ऐकून रावण आपल्या पुष्पक विमानातून उतरला. व त्याने त्या महालात प्रवेश केला. तेव्हां त्या महालाच्या मुखद्वाराच्या आकाराचा प्रचंड भयंकर आकृतीचा एकजण दाराच्या चौकटीत उभा राहिलेला. त्याला दिसला. त्याच्या डोक्यावर चंद्र होता. त्याच्या तोंडातून भयंकर ज्वाळा बाहेर पडत होत्या. त्याचे डोळे तांबरलेले होते. ओठ लाल बुंद होते. त्याचा चेहरा गोरापान होता. केस विखूरलेले होते. लांब लांब मिशा व दाढी होती. जबडा भयंकर वासलेला होता. हातात वजनदार गदा होती. ते त्याचे भयंकर रूप पाहून रावण उभा हादरून गेला. त्याचे अंग कांपू लागले. ती भयंकर आकृती रावणाला पहाताच म्हणाली—"अरे राक्षसा,



भिऊ नकोस ! सांग तुला काय पाहिजे ?"

"मला युद्ध करावयाचे आहे." रावण म्हणाला.

"तू कोणा बरोबर रे युद्ध करणार ? माझ्या बरोबर कां बळी बरोबर ?" त्या भयंकर आकृती विचारले.

"मी तर या महालाच्या अधिपती बरोबर युद्ध करणार आहे. परंतु तुम्ही ज्याच्या बरोबर युद्ध करण्यास सांगाल त्याचा बरोबर मी युद्ध करतो.

"बळी महालाच्या आत आहे. पाहिजे तर तू त्या महामहूच्या बरोबर निर्विघ्नतेने युद्ध करू शकतोस." त्या भयंकर आकृतीवाल्याने सल्ला देत म्हटले.

रावण आत गेला. परंतु सूर्यांच्या प्रखर तेजा सारख्या तळपत असलेल्या बळीच्या डोळ्याकडे त्याला पहावले नाही. परंतु बळीने सरळ रावणाला सहजतेने उचलून आपल्या मांडीवर बसवले व म्हटले–"बाळा, तू कोणत्या कामासाठी आवर्जुन येथे आला आहेस. सांग मी तुझ्या सांगण्याची इच्छा पूर्ण करेन."

"महानुभाव तसे येण्यांचे काही खास कारण नाही. मी तर ऐकले होते पुष्कळ वर्षांपूर्वी विष्णुने आपल्याला धोका देऊन कैद केले होते. मी तर आपल्याला मुक्त करण्याची सामर्थ्यता ठेवतो. त्यामुळे मी ह्याकार्या साठी ते पूर्ण करण्याच्या विचाराने येथे आलो आहे." रावणाने विनयतेने म्हटले.

"ओहो, हे तर ठिक आहे, तर मग मी तुला एक खास गोष्ट सांगतो. तेथे पडलेले कुडल उचलून घेऊन ये." बळी म्हणाला.

रावणाने त्या कुंडलापाशी जाऊन ते पाहीले तेव्हां ते एका मोठ्या वजनदार चक्राप्रमाणे होते. रावणाने मोठ्या कष्टाने ते उचलण्याचा प्रयत्न केला व अपमानित झाला. ते कुंडल जराही हलले नाही. तेव्हां रावणाने आपली पूर्ण शक्ति पणाला लावली व दोन्ही हाताने जोर करून उचलण्याचा निष्फळ प्रयत्न केला ते जराही जागचे हलले नाही.

ते पाहून बळी रावणाच्या जवळ जात म्हणाला–"तू ज्या कुंडलाला किंचितही हलवू शकला नाहीस ते कुंडल आमचे पूर्वज हिरण्यकश्यपू ह्यांनी कानांत घातलेले एक कुंडल आहे. त्यांनी असा वर प्राप्त केला होता. की आपला मृत्यु कोणाच्याही हातून होवू नये. परंतु शेवटी नरसिंहरूप धारण केलेल्या विष्णुच्या हाती त्यांचा मृत्यु झाला. त्याच विष्णुला तू आता मुखद्वाराशी पाहिले आहेस. ते नेहमी त्याच द्वारावर रहातात.

ते ऐकताच रावणाचा संताप अनावार झाला. तो दारापाशी रागारागात गेला. त्याला द्वाराजवळ कोणीही दिसले नाही.





# केले ते मुद्दामच

कनकदास नांवाचा एक गृहस्थ सीतानगर गांवात रहात होता. तो निःसंतान होता. त्याने व स्वर्णलताने–पुष्कळ व्रत वैकल्ये वगैरे केले. शेवटी दहा वर्षांनंतर तिला दिवस राहिले. त्यामुळे तिच्या चेहऱ्यावर थोडी उदासी दिसू लागली.

कनकदासाचे आपल्या बायकोवर अतिशय प्रेम होते. तिला उदास असलेली पाहून तो म्हणाला–"तू अशी उदास उदास राहू नकोस. तुला काय हवे ती इच्छा मी पूर्ण करीन."

"रामपुरचा सोनार आहे ना! नागराज, त्याच्या हातांनी त्यानी स्वतः जडवलेली मोत्याची माळ गळ्यांत घालून मिरवण्याची मला फार इच्छा झाली आहे." स्वर्णलतेने आपले मनोगत सांगितले.

रामपुरचा नागराज सोनार फार प्रसिद्ध होता. लोकांचे असे मत होते कि, त्याच्या दुकानांत तयार केलेला कंठा गळ्यांत घालून फिरणे शुभ आहे.

एरवी त्याच्या बायकोने असा मोत्याचा कंठा मागितला असता तर कदाचित कनकदासाने दिला नसता. पण तिच्या अशा स्थितित तिला नकार देणे त्याला बरे वाटले नाही. तो म्हणाला–"ठीक आहे. मी स्वतः मोत्याचा कंठा करून आणतो."

"अहं, मला सोडून तुम्ही जाऊ नका बर! मला नाही चैन पडणार तुमच्याशिवाय तेव्हां दुसऱ्या कुणाला तरी पाठवून द्या." स्वर्णलता लाडिकपणे म्हणाली.

कनकदासाने विचार केला कि आपला मित्र शंभुदास ह्याचा मुलगा जो गणपती त्याला हे काम सांगावे.

शंभुदास लोहाराच काम करत असे. त्याचा मुलगा गणपती त्याला त्याच्या कामात मदत करीत असे. एकदा तरी

"वसुंधरा"



आपण रामपुर पाहून यावे असे गणपतीला नेहमी वाटत असे. पण त्या गावांत त्यांच्या नातलगापैकी कोणीही नव्हते. तेथे जायचे म्हणजे खूप खर्च त्या शिवाय तेथे धर्मशाळेत उतरायचे, खाणावळीत जेवायचे गावांत हिंडाफिरायचे हा वेगळा खर्च होणार म्हणून शंभूदासाने गणपतीला रामपूरला धाडण्याचा विचारच केला नाही.

कनकदास गणपतीला बोलावून म्हणाला– "मी तुला एक काम सांगतो. माझ्यासाठी तेवढे कर. तू रामपुरला जाऊन नाग-राजच्या दुकानांतून एक मोत्याचा कंठा बनवून आपल्याबरोबरच घेऊन ये. त्या गावांत माझे नातेवाईक सिद्धराज म्हणून आहेत त्यांच्याकडे उतर. तुझा हा सर्व खर्च मी करीन."

गणपतीला काय दुधांत साखर पडल्या-सारखेच वाटले. त्याने एकदम होकार दिला. शंभुदासला सुद्धा वाटले बरं झालं. बरेच दिवसापासून गणपती रामपुरला जाण्यासाठी पाठीस लागला आहे. अनायासा त्याच्या मनासारखे झाले.

गणपती रामपुरला पोहोचला. तेथे जाऊन चवकशी करत करत सिद्धराजाचा पत्ता काढला. त्याच्या घरीं जात असतां वाटेत एके ठिकाणी चिखलांत पाय घसरून पडला. कपडे सगळे चिखलाने भरले. पण शेवटी सिद्धराजाच्या घरी जाऊन पोहोचला. कनकदासने पाठविले आहे असे सांगितल्यावर सिद्धराजाने मोठ्या आदराने त्याचे स्वागत केले.

सिद्धराज त्याला म्हणाला–"कनक-दासाने पाठविले आहे म्हणजे तू आमचा पाहुणा ती तुझ्या हातातली पिशवी दे माझ्याकडे. मी नीट जपून ठेवतो. मागच्या अंगणात विहीर आहे तेथे जाऊन अगोदर स्वच्छ चांगली अंघोळ करून ये." असे म्हणून त्याला दोरबादली देऊन सिद्धराज एक हंडा घेऊन विहीरीकडे गेला. हंडा तेथे ठेवत तो म्हणाला–"आणि हे बघ अंघोळ झाल्यावर एवढा हंडा तेवढा पाण्यानें भरून ठेव."

'पाहुण्याच्याकडून अशी कामे करून घेतात अं!' म्हणून गणपतीला आश्चर्य वाटलं. तरी पण त्याने सांगितल्याप्रमाणे हंडा भरला आपले कपडे धूवून वाळवले. दमला होता बिचारा. सिद्धराज आपल्याला नोकर समजतो आहे. बहुतेक असे त्याला वाटले. पण तो काही बोलला नाही.

गणपती स्नान करून कपडे करून आल्याबरोबर सिद्धराजाने त्याला जेवायला बोलावले. तिथेही त्याला तसाच प्रकार दिसला. सिद्धराजाच्या घरचे लोक पाटावर बसले होते. त्यांच्या पुढे चांदीची ताटे होती. गणपतीच्या पुढे केळीचे पान ठेवून त्याला बसण्यास सांगितले. वाढताना सुद्धां सर्वांना कढत कढत अन्न वाढले आणि ह्याच्या पानावर मात्र गार गोटया. तो भुकेलेला आणि दमलेला होता. कसे बसे जेवण झाले.

"दमला असशील नाही? जेवण झालं ना नीटपणी? जा आता.ही चटई घे आणि पड तिथे." भिंतीकडे इशारा करून सिद्ध-राज म्हणाला आणि तो घरातील इतर मंडळी पलंगावर जाऊन झोपली. गणपती हे सर्व मुकाटयाने सहन करीत होता. पाहुणा होता ना?

दुसऱ्या दिवशीं भल्या पहाटेच सिद्धराजाची बायको गणपती निजला होता तेथे आली. त्याला उठवून म्हणाली–"बाळा, अरे आज अजून आमचा दूध काढणारा नोकर आला नाही रे. तूं जरा तेवढे





म्हशीचे दूध काढून आण बरं. अजून कोणी उठलं नाही म्हणून बरं आहे. बघ आत्ता येतील सर्व चहा साठी कांव कांव करत." काय करतो बिचारा गेला कासंडी घेऊन गोठयांत.

"शाब्बास. ठेव तिथे कासंडी. धार काढताना वैरण घातली होतीस ना? आता तिला पाणी दाखव. तिथे आहे बघ दोर बादली. आणि हे बघ, तेवढा हौद पण भरून ठेव पाण्यानी. नोकर सुद्धां अजून आलेला दिसत नाही." प्रेमळ आवाजांत सिद्धराजची बायको म्हणाली.

सर्व कामें मुकाटयाने करून आपले सर्व आटपून गणपती नागराज सोनाराकडे निघाला. त्याला निघालेला पाहून सिद्धराज म्हणाला—"थांब, थांब, मी ही येतो तुझ्या बरोबर."

सिद्धराज आणि गणपती दोघे घराबाहेर पडले. सिद्धराजाच्या हातांत एक मोठी पिशवी होती. जड असल्यामुळें ती गणपतीच्या हातांत देत सिद्धराज म्हणाला—"भोपळे आहेत ह्याच्यात. माझ्या मित्राच्या घरी पोहोंचवायचे आहेत. वाटेवरच आहे त्याचे घर जातां जातां पोचते करून पुढे जाऊं नागराजच्या दुकानात."

भोपळ्यांच्या वजनानें गणपतीचे हात अगदी भरून आले. ह्या हातांतून त्या हातांत. त्या हातातून ह्या हातात असे करत करत कसे तरी भोपळे मित्राच्या घरापर्यंत पोहोचले एकदाचे. मग सिद्धराज त्याला घेऊन नागराजाच्या दुकानांत आला.

सिद्धराजानें नागराजाला सांगितले कि कनकदास नांवाच्या माझ्या एका चांगल्या मित्राला त्याच्या बायकोसाठी एक हार पाहिजे आहे. फार दिवसांनी प्रथमच त्याच्या बायकोला दिवस राहिले आहेत. तेव्हां तिला आवडेल असा एक सुंदर हार करून दे.

चार दिवसांत करून देतो म्हणून नागराजानें सांगितले. हें चार दिवस गणपती सिद्धराजाच्या घरी राहिला. त्याच्याकडून नोकरा प्रमाणे सर्व कामें करून घेतली. पण त्याचा अपमान होईल किंवा वाईट वाटेल असे कांहीं ही कोणी ही त्याला बोलले नाही. गणपती सर्व मुकाटयाने सहन करत गेला.

चार दिवसानी नागराजाने म्हटल्या प्रमाणें हार तयार करून दिला. कनकदासाचा माल घेऊन गणपती सीतापुरास येण्यास निघाला. सिद्धराजाच्या घरच्या लोकांनी त्याला मोठ्या प्रेमानें निरोप दिला म्हणाले—"गणपती, पुन्हां केव्हांही तू रामपुरला आलास म्हणजे आमच्याच घरी उतरत जा.

रामपुर सोडल्यावर गणपतीला हाय से झाले. तो सुखरूप सीतापुरला येऊन पोहोंचला. लागलीच कनकदासच्या घरी जाऊन मोत्याचा कंठा त्याच्या स्वाधीन केला. कनकदासने त्याच्या प्रवासाविषयी चौकशी केली.

गणपती म्हणाला—"सिद्धराजच्या घरचे लोक फार चांगले आहेत. मधुर भाषी आहेत. पण मला वाटते त्यांचा पाहुणचार फार वेगळा आहे." आणि त्याने आपल्या स्वागताचे वर्णन केले.

ते ऐकल्यावर कनकदास संतापून म्हणाला—"वेगळं कांही नाही. मुद्दामच ते तसे वागले. चार दिवस तुला जेवाला घातलें ना? म्हणून दुप्पट काम करून घेतले दुसरं काय."

"नाही मला तसे नाही वाटत. मला राग येण्यासारखा त्यांचा व्यवहार नव्हता. मला वाटते ह्याला दुसरे कांहीं तरी कारण असले पाहिजे."

"होय, कारण आहे. त्यांनी अगदी जशास तसाच तो तुझ्याशी वागला.

"त्यात त्यांचे काय चुकलं?" कनकदास म्हणाला.

खरी गोष्ट गणपतीच्या लक्षात आली. त्यांचा पाहुण्याचा राग त्यांनी गणपतीवर काढला होता. म्हणून कनकदासाला त्याचे काही वाटले नाही. पण गणपतीने मात्र निश्चय केला कि कनकदासच्या कामासाठीं कधीही रामपुरला जायचे नाही.









# कोष्ट्याचे चातुर्य

**फार** पूर्वीची गोष्ट आहे. एकदा एक राजा आपल्या सिंहासनावर बसला होता. त्या वेळी शेजारच्या राज्याचा एक दूत तेथे आला. त्याने सिंहासना भोवती एक वर्तुळ काढले आणि राजाकडे पहात उभा राहिला.

राजाने आपल्या मंत्र्यांना विचारले कि हा दूत काय म्हणतो आहे? ह्या वर्तुळाचा काय अर्थ असेल?

मंत्र्यांच्या कांहीं लक्षांत येईना. ते नुसते आश्चर्यानें पहात राहिले. राजा त्रासून गेला आणि त्याने आपल्या मंत्र्यांना त्या वर्तुळाचा अर्थ समजणाऱ्या एकाद्या चतुर व्यक्तिला शोधून आणण्याची सर्वांना आज्ञा दिली.

सर्व मंत्री चारी दिशांना धावले. बरीच शोधाशोध केल्यावर काही मंत्र्यांनी पाहिले कि एका घरांत एका खोलीत पाळणा आपल्याआप हलतो आहे. वर गच्चीत वाळत घातलेल्या धान्यावर टांगलेला एक पंखा तोही असाच हालत आहे. त्यामुळें पांखरांपासून धान्याचे रक्षण होत आहे. मंत्र्यांनी आणखी एका खोलीत डोकावून पाहिले. तेथें त्यांना एक कोष्टी धोटा हलवत एकाग्रतेने कापड विणताना दिसला. असे विचित्र प्रकार!

मंत्र्यांनी त्याला विचारले–"अरे! हा काय चमत्कार आहे? हा पाळणा आणि तो वरती पंखा आपोआप कसे हालत आहेत? तेथें कोणीही बसलेला नाही. मग कोण हलवते?"

"आपोआप कसं हालेल सरकार? मीच येथून हालवत आहे. बघा ना. ह्या दोन दोऱ्या धोटयाला आहेत. एक पाळण्याची आणि दुसरी पंख्याची." कोष्टी म्हणाला.

"कल्पक आहेस." मंत्री म्हणाले. "आपल्या राजाला अशाच एका चतुर माणसाची गरज आहे. त्यांच्यावर आलेले संकट तू सोडवू शकशील." असे सांगून मंत्र्यांनी वर्तुळाचे वर्णन केले. ते प्रत्यक्ष पाहिल्या शिवाय मी काय सांगणार?" कोष्टी म्हणाला.

मंत्र्यांनी बोलविल्याबरोबर त्यानें दोन गोटघा घेतल्या आणि निघाला.

दरबारांत पोहोंचल्या बरोबर त्यानें प्रथम राजाला मुजरा केला. नंतर वर्तुळ काढून दूताकडे पाहिले. स्मित करून गोटघा त्याच्याकडे फेकल्या. दूताने आपल्या खिशातून मूठभर जोंधळे काढून जमिनीवर फेंकले. लगेच बाहेर जाऊन एक कोंबडा पकडून आणून कोष्टयानें त्या दाण्यावर सोडला भराभर कोंबडयाने सर्व दाणे टिपले आणि वर मान करून दूताकडें पाहूं लागला.

एकक्षण ही तेथें न थांबता दूत पळून गेला.

"हे काय गौडबंगाल आहे?" राजानें विचारले.

कोष्टी हंसत हंसत म्हणाला–"हे कोडेच आहे. शेजारच्या राजानें ह्या दूताकरवी निरोप पाठविला कि, आम्ही तुमच्या राज्याला घेरणार आहो. बोला तुम्हीं हार मानता का युद्ध करता. मी त्या गोटघा टाकून विचारले कि, काय हा पोरखेळ आहे? त्यावर धोन्याच्या रूपाने त्याने सैनिक सोडण्याची धमकी दिली. मी कोंबडयाला सोडून आम्ही सर्व सैनिकांना मारून टाकूं असे भासविले. एक ही सैनिक जिवंत सोडणार नाहीं. हेच उत्तर घेऊन तो दूत येथून निघून गेला.

"शाबास! खरोखरच तू बुद्धिमान आहेस. अशीच बुद्धि राज्यतंत्राला पाहिजे. तुला मी येथेच ठेवून घेऊन माझा मुख्य मंत्री करतो." राजा उत्साहाने म्हणाला.

"असं कसं सरकार! प्रत्येकानं आपली पायरी ओळखून रहाव. माझ काम मला पुरे आहे." असे म्हणून कोष्टी निघून गेला.











# कंजुस माणसाची तिर्थयात्रा

शेठ गोविंदनारायण एक नंबरचा कंजुस होता. तसे पाहिले तर त्याच्यापाशी अफाट पैसा अडका व घरदार होते. परंतु त्याला एक पैसाही स्वतःचा तिर्थकरीता खर्च करणे आवडत नव्हते. एकही पैसा खर्च न होता त्याना तिर्थयात्रा करावयाची होती. त्यासाठी त्याने एक युक्ति केली. त्याने स्वतः मुका व बहिरा आहोत हे एका कार्डबोर्डवर लिहिले व तो गळ्यात अडकवला व एका पायाने लंगडत-तो तिर्थयात्रेस निघाला.

भीक मागत मागत तो एका तिर्थक्षेत्री जाऊन पोहोचला. आणि तेथे भीक मागु लागला. तितक्यात त्याच्याच गावचे दोघेजण एक राधेश्याम व कृष्णशर्मा तेथून जात होते.

गोविंदनारायणला अशा अवस्थेत पाहून राधेश्याम कृष्णशर्माला म्हणाला–"अरेरे ह्या बिचाऱ्या गोविंदनारायणला समजले सुद्धा नसेल की, आपला गाव पुराच्या पाण्यात बुडाला आहे. आणि ह्याला जर सांगायचे झाले तर बिचारा बहिरा झाल्यामुळे ऐकूही शकणार नाही."

ते ऐकताच गोविंदनारायण आश्चर्यचकित झाला. आणि तो एकदम विसरुन गेला की. आपण बहिऱ्या व मुक्याचे सोंग घेतले आहे. आणि झटक्यात बोलला–"काय म्हणालात ? आपला गाव पाण्यात बुडाला आहे. म्हणजे माझे घर दार सर्व गेले ?"

गोविंदनारायणला अपंग समजून भीक देणारे लोक म्हणाले–"अरे दुष्टा, तू लोकांना धोका देत होतास काय ? असे म्हणत त्यानी त्याला खुप मारले.

गोविंदनारायणला सर्वजण मारत असलेले पाहून राधेश्याम जोरजोरात हसू लागला आणि दूर निघून गेला. आता गोविंदनारायणला स्पष्ट समजले की, आपल्याला चांगला धडा मिळावा म्हणून राधेश्यामने हे मुद्दामच केले आहे. अशा तऱ्हेने त्याची तिर्थयात्रा संपली.





# मध शोधणारा ससाणा

आफ्रिकेतील डोंगराळ प्रदेशात दोन भाऊ रहात होते. ते दोघेही जंगलात हिंडून शिकार करून आपापल्या कुटुंबाचा उदर-निर्वाह करीत.

एके दिवशीं ते दोघेही धनुष्य बाण खांद्या-वर टाकून जंगलात शिकारीला निघाले. जंगलांत थोड्या दूरपर्यंत पायरस्ता होता. परंतु त्या घनदाट जंगलात खूप आत जावयाचे झाले तर पायवाट सुद्धा नव्हती. तेव्हां ते झाडेझुडपे बाजूस सारीत आत काही शिकार मिळते कां पहाण्यासाठी निघाले.

थोडे आत चालून गेले तोच त्यांना काही मातीचे घडे पालथे ठेवलेले दिसले. ते पहाताच धाकटा भाऊ मोठ्या भावाला म्हणाला–"दादा, हे रे काय आहे? ह्या अशा निर्जन जागी हे घडे कसे ?"

"अरे बाबा, त्याला हात लावू नकोस. त्यामधे कोणी तरी मंत्रतंत्र किंवा जादूटोणा वगैरे केला असेल. काय जाणो आपण फुकटचे संकटात पडू. मोठा धाकट्याला समजावत म्हणाला. परंतु धाकट्याला फार उत्सुकता लागली. तसा तो धाडसी पण होता. त्याला वाटले–"ह्या घड्याच्या आत नक्की काय आहे ते पहावे."

ह्यानंतर तो एक एक घडा उचलून निट पारखून उलट ठेऊ लागला. ते पाहून मोठा भाऊ घाबरून मागें सरकला. धाकट्याने अशा प्रकारे अनेक घडे उलटे करुन ठेवले परंतु सारे रिकामे होते. शेवटचा घडा उलटा केला तेव्हां मात्र एक बुटकी म्हातारी झटक्यात बाहेर पडली.

त्या म्हातारीने आपल्याला मुक्त कर-णाऱ्या लहान मुलाकडे दुर्लक्ष करून आप-ल्यापासून घाबरून दूर असलेल्या मोठ्याकडे तिरस्काराने पहात म्हटले–"अरे तू काय भागूबाईसारखा मारक्या म्हशीसारखा टक



लावून पहातो आहेस? अरे मी तर तुला काही करणार नाही तू माझ्याबरोबर चल.

परंतु मोठा भाऊ निश्चल उभा राहीला. "अरे दुष्टा, मूर्खा अशा शिव्या गाळ करीत तीने लहान भाऊ उभा होता तिकडे वळून पाहिले व त्याला म्हटले आता तू तरी माझ्याबरोबर चल. तो धैर्याने तिच्याबरोबर चालू लागला. दोघेही जरा दूरवर चालत गेले. तेथे एके ठिकाणी म्हातारी थांबली व लहान भावाच्या हातात एक कुन्हाड देते म्हणाली–"तू माझ्यासाठी हे झाड तोड."

छोट्या भावाने तिचे म्हणणे मान्य केले व त्या झाडावर कुन्हाडीने एक घाव मारला त्याबरोबर एक गाय चटकन् बाहेर पडली. अशा प्रकारे छोट्याच्या प्रत्येक घावा गणिक गाय, घोडी, बकरी ससा असे प्राणी एका पाठोपाठ बाहेर पडले. त्याच्या सभोवताली जनावरांचा कळपच झाला.

"ऐक, हे सारे प्राणी तुझे आहेत. तू ह्या सर्वांना हांकून घरी घेऊन जा. मी आता येथेच रहाते." म्हातारी म्हणाली.

धाकट्याने म्हातारीचे अत्यंत आभार मानले व तो ते सारे प्राणी हांकीत मोठा भाऊ जेथे उभा होता तेथे घेऊन आला व त्याला म्हणाला–"अरे दादा, हे बघ त्या म्हातारीने मला काय काय दिले? तुला तिने बोलावले तर तू काही तिच्याबरोबर गेला नाहीस." असे म्हणून त्या म्हातारी बरोबर गेल्यानंतर आपण काय काय केले ते सारे वर्णन करून सांगितले. नंतर दोघे मिळून ती जनावरे हांकीत घराकडे निघाले.

उन्हाळ्याचे दिवस होते. त्यामुळे त्यांना खूप तहान लागली होती. त्यांची जनावरे सुद्धा तहानेने तडफडू लागली.

थोडे पुढे गेले नाहीत तोच छोटा भाऊ जोरात ओरडला–"अरे दादा, ते बघ तेथे झळीत पाणी आहे." त्याच्या पायवाटेमधे एका बाजूला एका दरीत उतरणारी जागा होती. तेथून पाण्याच्या एक झरा खळखळत वहात होता. परंतु त्या पाण्यापर्यंत पोहचावयाचे झाले तर उतरण्यासारखी वाट नव्हती. तो डोंगराचा सरळ सुळका होता–"छोट्या मी ह्या दोरीच्या सहाय्याने खाली उतरतो व पाणी पिऊन वर येतो!" मोठा भाऊ धाकट्या भावाला म्हणाला.

छोट्याने मोठ्या भावाच्या सांगण्या-प्रमाणे केले. मोठा भाऊ दोरीने दरीत उतरला व पाणी पिऊन स्वतःची तहान भागवून ऐटीत वर चढून आला.

"दादा, आता तू मला उतरव ना! मी पण पाणी पिऊन वर येतो." छोटा म्हणाला.

मोठ्या भावाने धाकट्या भावाला दोरीने उतरवले. परंतु त्यानंतर ती खूप जनावरे पाहून त्याची बुद्धी फिरली त्याच्या मनात दुष्ट विचार आला व त्याने दोरी सरळ खाली सोडून दिली, त्याचे सारे प्राणी घेऊन एकटाच घरी आला व म्हणाला–"बाबा, हे बघा, एका म्हाताऱ्या बाईने मला हे सारे प्राणी दिले.

"ओहो, वा छान! अरे पण छोटा कुठे आहे?" वडिलांनी काळजी युक्त स्वरात विचारले.

"काय म्हणता? तो अजून घरी आला नाही. तो फार दूर चालू शकला नाही. म्हणून तो तर दुपारीच घरी जाण्यास निघाला होता. त्यानंतर मी काही त्याला पाहिले नाही." मोठ्या भावाने आव आणीत सांगितले.



त्या दिवशी रात्र उलटली तरी छोटा घरी परत आला नाही. आई वडिलांनी विचार केला की बहुदा तो शिकार मिळविण्यासाठी खूप दूर निघून गेला असेल नंतर येईल असा विचार करून ते निश्चित बसले.

दुसऱ्या दिवशी गावातल्या बायका पाणी भरण्यासाठी नदिवर गेल्या. तेव्हां त्यानां ससाण्याचा कूकू आवाज ऐकू आला. त्या गावातली एक पद्धत होती की, जर कां ससाणा ओरडू लागला तर तो ससाणा बरोबर मघाचे पोळे दाखवे.

त्यामुळे त्या बायका धावत पळत आपल्या घरी आल्या व सांगु लागल्या

"चला चला लवकर मध दाखवणारा ससाणा आला आहे.

ते समजताच त्या दोन्ही मुलांचे वडील व काही गांवकरी आपापल्या घरातून बाहेर पडले व त्या ससाण्याचा मागोवा घेत जाऊ लागले. तो पक्षी त्यानां खूप दूरवर घेऊन गेला. कोठेंही थांबला नाही. त्यामुळे त्या मुलांचे वडील व दोन-चार लोकन त्याच्या पाठोपाठ बऱ्याच दूरपर्यंत गेले.

मध शोधणारा ससाणा शेवटी त्या दरीत उतरला. त्या दरीत जरी मधाचे पोळे असले तरी ते काढता येण्याची शक्यता नव्हती. त्या मुलाच्या वडीलांनी दरीत डोकावून पाहिले तेव्हां त्यानां तो पक्षी तर दिसलाच नाही परंतु एक अस्पष्ट माणूस मात्र दिसला. त्याचबरोबर त्याचा अस्पष्टसा आवाज सुद्धा ऐकू आला तो आवाज ऐकताच त्या मुलाचे वडिल जोरजोरात ओरडले– "अहो तो माझा धाकटा मुलगा आहे. बहुदा पाय घसरून दरीत पडला असावा.

त्यानंतर सर्वांनी मिळून त्याला एका दोरीच्या सहाय्याने वर काढले वर येताच धाकट्याने सारी कहाणी आपल्या वडिलांना सांगितली. ती ऐकून त्यांना खूप दुःख झाले व म्हणाले–"बाळा मी कधी मनातही आणले नव्हते की, तुझा मोठा भाऊ असे नीच कार्य करेल तुझा तर त्याने विश्वास-घात केला आहे. ह्या मध शोधणाऱ्या ससाण्याच्या कृपेने तू वांचलास नाहीतर तुझे काय हाल झाले असते देवजाणे.

बाकी सर्वलोक म्हणू लागले–"तुझ्या मोठ्या भावाला तर असा मारून झोडून वटणीवर आणावयास पाहिजे म्हणजे त्याची अक्कल ठिकाणावर येईल.

परंतु कशी काय जाणो ही गोष्ट मोठ्या भावाला समजली की, आपला धाकट भाऊ दरीतून वाचून बाहेर आला. मग काय धाकटा भाऊ व वडील घरी परत यायच्या आत तो घर सोडून निघून गेला त्यानंतर त्याचा कोठेही शोध लागला नाही.





## पेंग्विनचे अंडे

किंग पेंग्विन पक्षी आपल्या पायाच्या मधे असलेल्या पिशवीसारख्या भागात फक्त एकच अंडे उबवू शकतो सर्वत्र जर —४०° से तपमान असले तरी तो अंडे उबविण्यासाठी +४०° से तपमान हा पक्षी स्वतःच्या शरिरापासुन तयार करु शकतो म्हणजे ह्याचा अर्थ हा पक्षी ८०° से तपमान उत्पन्न करु शकतो.



## कल्पना

लोकांना वाटते की जर का विंचू जाळ्यात अडकला तर तो स्वतःला चावून आत्महत्या करतो. परंतु ही गोष्ट खरी नाही. सर्व विषारी प्राण्यांप्रमाणे विंचवाचे विष सुद्धा त्याला काही एक प्रकारचे हानी-कारक नसते.



## भूऱ्या अस्वलाचे खाणे

भूरे अस्वल आपल्या आहारासाठी जवळ-जवळ ७०% झाडेझुडपे ह्यावरच गुजराण करते. ह्या शाकाहारी अन्ना बरोबर ते छोटे छोटे किडे उंदीर, पक्षी, खारी, हरीणे, इ. प्राण्यांना पकडून



# चांदोबा

मार्च 1987



## अनुक्रमणिका





एक प्रत : २-५०

वार्षिक वर्गणी : ३०-००

## चांदोबातील नवलाई

### प्रचंड शरीराचा शार्कमासा



लांग आर्यलंड येथील किनाऱ्यावर काही वर्षापूर्वी एका मासेमाऱ्याने एक अत्यंत प्रचंड शरीराचा शार्कमासा पकडला होता. ह्या प्रचंड शरीराच्या माशाचे वजन १,५७० कि.ग्राम होते.

### जमिनीच्या भूगर्भातीलहादरे–भुकंप

ओरिगान येथे रहाणारी ३४ वर्षाची श्री. चार्लटकिंग हिनेजरने सरकारी अधिकाऱ्यांना अशी सुचना फोनवर दिली की माझे डोके भयंकर दुखते आहे. तर सरकारी अधिकाऱ्यांच्या तावडतोब लक्षात येई आता नक्कीच भुकंप होणार आहे आणि तावडतोब काहीतरी उचित प्रबंध करावयास पाहिजे उद्याप पर्यंत असे सहा वेळ घडले ह्यावर डॉक्टरांचे असे मत आहे की, ह्या छोटया भुकंपापूर्वी श्रीमती चार्लट प्रभावित होत असावी.





### तरंगणारी कार

कॅलिफोर्निया येथील एका संस्थेने अशा एका मोटारीचे निर्माण केले आहे की, ती फक्त रस्त्यावरच नाहीतर पाण्यावर सुद्धा सुलभतेने चालू शकेल.

### बर्फाळ प्रदेशातील चिते

आता जवळजवळ नष्ट झालेले बर्फाळ प्रदेशातील चिते सध्या फुलू घाटीत पहाण्यास मिळतात. ह्यांची चामडी मोठ्या किंमतीला विकली जातात. त्याकारणाने शिकाऱ्यापासून ह्यांच्या बछड्याचे संरक्षण करण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न करण्यात येत आहेत.



# रजी

चक्रवर्ती पुरुरव राजाचा मुलगा रजी हा मोठा पराक्रमी होतो. त्याने एवढे यश प्राप्त केले की, त्याची तुलना अद्याप पर्यंत कोणशीही करता आली नाही. तो मोठा वीर होता.

एकदा देव व दानव ह्यांच्यात भयंकर युद्ध माजले. तेव्हा देवतांनी ब्रह्माकडे जात म्हटले–"तात्, सांगा ह्या युद्धामधे कोणाचा जय होईल ?"

"रजी ज्या पक्षात असेल तो पक्ष जिंकेल" ब्रह्माने उत्तर दिले.

ब्रह्माने सांगितलेली ही गोष्ट कशी तरी राक्षसांच्या कानावर गेली. राक्षस रजीकडे जात म्हणाले–"आपण राक्षस पक्षामधे रहावे ?"

रजीने आपल्या अटी बोलून दाखवित म्हटले–"तुम्ही जर का विजय प्राप्त झाल्यानंतर तुमच्या राज्याचा राजा म्हणून मला मान्य कराला तर मी तुम्हांला युद्धात तुमच्या बाजूने मदत करण्यास तयार आहे. त्या गोष्टीला राक्षस तयार झाले नाहीत. व तेथून निघून गेले. ह्यानंतर देवतांनी रजीला भेटून आपले मनोगत बोलून दाखविले. व विजय प्राप्ती नंतर त्याला आपला राजा करण्याची मान्यता दिली.

देव व दानवाचे युद्ध सुरू झाले. रजीच्या नेतृत्वाने देवाना जय मिळाला. त्यावेळी इंद्र रजीकडे जात त्याला प्रणाम करीत आपली कृतज्ञता प्रकट करीत म्हणाला–"पितृश्री, आपल्या मुलाबाळांचे संरक्षण करण्यासारखे तुम्ही आमचे रक्षण केलेत.

"देवता बनलेले लोक तुम्ही मला पिता समान मानत आहात. तेव्हां वडीलांचे राज्य मुलांनाच मिळत असते. परंतु मुलांचे राज्य पित्याला मिळू शकत नाही ना? त्यामुळे तुम्ही लोक तुमच्या राज्यावर राज्य करा." हंसत रजी त्यांना म्हणाला.





# अतिसावध

दामोदरपुरात एक यतिराज नावाचा माणूस होता. त्याचे आईवडील तो लहान असतानांच निवर्तले म्हणून त्याच्या पालन पोषणाचे काम त्याच्या आजीवर येऊन पडले. तिने फार प्रेमाने सांभाळ करून त्याला लहानाचा मोठा केला. पुढे त्याला चांगली नोकरीही मिळाली. त्याला वडिलोपार्जित थोडी जमीन आणि घर होते.

'कोणतीही वस्तू फालतू नसते' असे त्याच्या आजीने त्याला शिकविले होते. त्यामुळे तो सर्व वस्तु नीट सांभाळून ठेवे. त्याला लोक अतिसावध म्हणत.

शेजारच्या गावांतील विमल नावाच्या एका मुलीशी त्याचे लग्न झाले. नवराबायकोंचे असते त्याप्रमाणे त्या दोघांचे एकमेकांवर फार प्रेम होते. पण विमलाला त्याचा अतिसावधपणा आवडला नाही.

दुकानदाराला पैसे देताना तो दहावेळा मोजून पाहून देत असे. रात्री झोपण्यापूर्वी दारे खिडक्यांच्या कड्या नीट लावल्या आहेत ना! हे पहात असे. काही वस्तू बाहेर तर राहिल्या नाहीत ना! म्हणून घराभोवती दोनचार चक्रा मारे.

ह्यां शिवाय त्याची आणखी एक सवय होती. कोणची ही वस्तु कामाची नाही म्हणून तो कधी टाकून देत नसे. सामान आणलेले कागद, पिशव्या त्याला बांधलेले दोरे. सुतळीचे तुकडे, काथ्याचे दोर, लाकडाच्या पट्टया लोखंडाचे तुकडे वगैरे सर्व काही तो जमवून एका खोलीत साठवून ठेवीत असे. अशा आडगळीनी त्याचे घर भरलेले असे.

ही सगळी आडगळ पाहून विमलाला अतिशय वैताग आला. एक दिवस तीने फेकण्याची तयारीही केली. ऐवढ्यांत

स्वर्णलता आगाशे



यतिराजाने घरांत प्रवेश केला. ते दृष्य पाहून एकदम विमलावर कडाडला–"हे काय चालवल आहेस? फेकून कशाला देतेस हे सारं. राहील पडून हे सर्व एका कोपऱ्यात त्याच्याशी तुला काय करायच आहे. उर्गाच काही ह्या वस्तू मी बाळगून ठेवल्या नाहीत येतील कधी तरी कामाला.

विमलाने विचारले–"अहो केव्हां तरी कामाला येईल ह्यातला एखादा सुतळीचा तुकडा नाही तर कागदाची पिशवी. त्याच्या साठी ही सारी आडगळ घरांत कशाला बाळगायला हवी."

यतिराजाने अशा अविर्भावाने तिच्याकडे पाहिले जणू काही ती अगदी वेडी खुळी आहे आणि खसकन् ओरडून म्हणाला– "ऐक, मी कशाला ह्या वस्तु राखून ठेविल्या आहेत ते. ह्या जगांमध्यें एकही अशी वस्तू नाही कि जी बेकार आहे. आणि हीच गोष्ट माझ्या आजीने मला लहानपणापासून शिकवली आहे. तिच म्हणणे असे कि वेळ सांगून येत नाही कोणच्या वस्तूची केव्हां गरज भासेल सांगता येत नाही. म्हणून सर्व वस्तू संग्रही असू द्याव्यात.

त्यावर सुद्धा विमलाने जरा रागानेच त्याच्याकडे पाहून विचारले कि त्यासाठी एवढ्या साऱ्या कचऱ्याची काय जरूर आहे. काही निवडक वस्तू ठेवा.

विमलाला पटत नाही असे पाहून यतिराज तिला समजावून सांगू लागला म्हणाला–"अस पाहां, आपण सामान विकत घेतो. तेव्हां त्याचा कागद किंवा पिशवी आणि त्याला बांधलेला दोरा ह्या सगळ्या सकट पैसे देऊन विकत घेतो आणि हे जर आपण फेकून दिल तर आपणच आपला पैसा फुकट फेकून दिल्या सारखे नाही कां होत?" अशा तऱ्हेने जवळ जवळअर्धातास त्याने आपल्या बायकोला समजावण्याचा प्रयत्न केला.

यतिराजाच्या विचारांचे तिला हंसू आले. पण काय करणार? काही महिनं असेच गेले. पण त्यातील एकाही वस्तूची कधी गरज पडली नाही. कचरा मात्र वाढत चालला.

एकदा विमलची एक जुनी मैत्रीण तिला भेटायला आली. मैत्रीणीचा आदर सत्कार झाल्यावर मैत्रीण म्हणाली–"तुझ घर तरी पाहू पुन्हां केव्हां येईन कोणाला माहीत" तिच्या इच्छे खातर विमलाने आपले सर्व घर तिला दाखवले. त्यात ती आडगळीची खोली पण तिने दाखवली. सर्व पाहिल्यावर मैत्रीण म्हणाली–"लग्नाच्या अगोदर तू मारे साफसफाईवर सर्वांना उपदेश करीत होतीस. त्याचे महत्व सांगत होतीस आणि इथे पहाते तर काय तुझ्याघरी तर आडगळीचे गोदामच भरलेले आहे. म्हणजे एकूण लोका सांगे कां?"

विमलाला मनांतल्या मनात हंसू आले. ती म्हणाली–"होय ग! रोज साफ करीन म्हणते पण आळसामुळे चालढकल करीत राहून जाते." तिने आपल्या नवऱ्याचे वैगुण्य न दाखवता सर्व दोष आपल्यावरच घेतला.

विमलाने त्या दिवशी आपल्या नवऱ्याला मैत्रिणीने घट्टा आणि मारलेला टोमणा सर्व काही वर्णन करून सांगितले आणि त्याच्याशी खूप भांडली.

रागाने लाललाल होऊन यतिराज ओरडून म्हणाला–"मी काय वेडाबीडा



आहे म्हणून ह्या सर्व वस्तू जमवून ठेवल्या आहेत अस समजतेस की काय? पडल्या असूंदेत की सर्व त्या खोलीत तुला काय त्रास होतोय त्यापासून. तू पाहातच रहा एक दिवस ह्यांची गरज पडेलच.

विमलाला रामेश नावाचा एक लहान भाऊ होता. हुषार होता. एकदा तो आपल्या ताईला भेटायला आला होता. विमलाने त्याला आपल्या घरांतील आडगळ दाखवून त्यांच्या त्या अतिसावध स्वभावाचे वर्णन करून सांगितले. अडगळ काढण्याचे नाव काढले कि कसा संतापतो हे सर्व त्याला सांगितले आणि म्हणाली की काही तरी करून त्याची फालतू वस्तूजमवण्याची सवय

गेली पाहिजे. मी सांगून कंटाळले. आता तू तरी काही प्रयत्न करून पहा.

थोडा विचार करून रामेश म्हणाला—"मला एक उपाय सुचतो आहे. जरा धाडसी आहे. बघ कबूल असशील तर." असे म्हणून त्याने आपली युक्ति सांगितली. जरा कचरतच पण आपल्या भावावर विसंबून तिने कबूल केले.

रात्री जवणे ओटोपल्यावर विमलाने रामेशला पुढील पडवीत अंथरूण घालून दिले आणि ती दोघे आंत झोपली. सवयी प्रमाणे यतीराजने दारे खिडक्या पाहून घेतल्या आणि मग झोपला.

अर्ध्या रात्री परसदाराशी काही तरी खटखटल्याचा आवाज आला त्या सरशी यतिराज उठला. त्याने विमलाला पण जागे केले तेवढ्यात डोळ्यावर काळीपट्टी आडकवलेला एक डाकू उडी मारून आंत आला समोर पडलेली एक रिकामी बाटली घेऊन त्याने भिंतीवर जोराने आपटली आणि त्यातला एक आणकुचिदार तुकडा हातात धरून यतीराज पुढें धरला.

यतिराज घाबरून ओरडणार तेवढ्यात तो डाकू ओरडला—"हं ओरडशील तर खबरदार. हाल मुकाट्याने त्या खांबा-पर्यंत."

यतिराज भरभर कांपतच खांबाजवळ गेला. त्याच्या पाठोपाठ विमला पण गेली. डाकूने त्या कचऱ्यामधून शोधून दोर काथ्या गोळा करून घेऊन आला आणि





# चित्रकार-महान

माधव शर्मा एक उत्तम आणि प्रख्यात चित्रकार होता. संस्थानिक, तसेच श्रीमंत शेट सावकार लोक बरीच किंमत देऊन त्याची चित्रें विकत घेत असत.

एकदा माधवशर्माने दोन बैलांच्या झुंजीचे चित्र काढले. ते चित्र इतके सुंदर झाले होते कि ते पाहून त्याचे सर्व चित्रकार मित्र त्याची तारीफ करूं लागले.

आपल्या स्तुतीने माधवशर्मा अगदी मोहून गेला. त्या धुंदीत त्याने आपल्या सर्व कलाकार मित्रांना मोठी मेजवानी दिली. त्याने ते बैलांच्या झुंजीचे चित्र एका नवीन रेशमी कापडावर शिवले. सुंदरशा चंदनाच्या फ्रेम मध्यें बसविले आणि भिंती-वर टांगून ठेवले.

माधवशर्माला वाटले आपल्या गावांत ह्या महान कृतिची केवढीशी किंमत होईल? त्यापेक्षा आपण राजधानीत जाऊन राज-दरबारांत राजापुढें ह्याचे प्रदर्शन केले तर केवढी प्रशंसा होईल! बस. हा विचार मनांत येताक्षणींच त्याचा निश्चय झाला आणि आपल्या काही कलाकार मित्रांना बरोबर घेऊन तो राजधानीला निघाला.

वाटेंत त्यांना एक गांव लागले. तेथे माधवशर्माचा एक मित्र म्हणाला—"शर्माजी तुमच ते झुंजीचं चित्र ह्या खेड्यांतील लोकांना दाखवा. त्यांना ते खूप आवडेल. ते कौतुक करतील."

माधवशर्मानें लगेंच आपल्या चित्रांच्या पेटीतून ते बैलांच्या झुंजीचे चित्र बाहेर काढले. ते चित्र गांवकऱ्यांना दाखवून म्हणाला—"माझ्या जवळ बरीच सुंदर सुंदर चित्रें आहेत. परंतु तुम्हांला ती नाही आवडणार. हे पहा हे चित्र तुम्हाला आवडेल. हे तुमच्या ओळखीचे आहे. पहा ह्या बैलांच्या डोळ्यांत, त्यांच्या पवित्र्यांत

"सर्व तर तू चोरून नेत आहेस. म्हणायला काही सुद्धा ह्या कचऱ्याशिवाय ठेवले नाहीस. त्यांत आमच्या सकट आमचे घर जाळण्यात काय अर्थ आहे? देवाच्या कृपेसाठी तेवढी तरी आमच्यावर दया कर."

ती माझी संवय आहे. मी ती कधीही मोडणार नाही." असे म्हणून डाकूने साराकचरा एकत्र जमवून त्याला आग लावून दिली. आणि आल्या वाटेने आपले सामान घेऊन गेला.

आग पाहून दोघेही घाबरून जोराने ओरडले. तेवढ्यांतच रामेश धापा टाकीत चोराने पळवलेली गाठोडी घेऊन आंत आला. आग पाहिल्या बरोबर गाठोडी तशीच जमिनीवर टाकून तो सैंपाकघरांत पळाला. दोन घागरी पाणी आणून अगोदर त्या आगीवर ओतले. आग विजल्यावर मेहुण्याला म्हणाला—"चोर ही गाठोडी घेऊन पळत होता. मग मी पाठलाग केल्याबरोबर ती टाकून तो पळून गेला."

बोलतां बोलतां त्यांच्या दोऱ्या सोडून त्याना मोकळे केले. विमलाचा क्रोध उफाळून आला. ती रागाने म्हणाली—"इतक्या दिवस जमवलेल्या साऱ्या वस्तु कशा आज कामाला आल्या. छान, आज जर रामेश इथ नसता तर आपली सुद्धां राखच होणार होती." "आता तरी ह्यापुढें कचऱ्याचा मोह सोडा."

"होय, ह्या चोराने चांगलेच आंजन घातले माझ्या डोळ्यात. पण मला आश्चर्य वाटताय मी रात्रीं सर्व कड्या नीट लावल्या होत्या झोपण्यापूर्वी. मग चोर आंत आला कसा?" यतिराजाने विचारले.

"दिवाळीत लावलेल्या फुलबाज्यांच्या काड्या नाहीत का तिकडे? दाराच्या फटीतून घुसवून घुसवून त्याने दाराची कडी काढली. त्या पहा पडल्या आहेत दाराशी." त्या दाखवीत विमला म्हणाली.

तेव्हां पासून यतिराजची कचरा जमवायची संवय कमी झाली. विमलालाही त्यामुळे फार आनंद झाला.





# चित्रकार-महान

माधव शर्मा एक उत्तम आणि प्रख्यात चित्रकार होता. संस्थानिक, तसेच श्रीमंत शेट सावकार लोक बरीच किंमत देऊन त्याची चित्रें विकत घेत असत.

एकदा माधवशर्माने दोन बैलांच्या झुंजीचे चित्र काढले. ते चित्र इतके सुंदर झाले होते कि ते पाहून त्याचे सर्व चित्रकार मित्र त्याची तारीफ करूं लागले.

आपल्या स्तुतीने माधवशर्मा अगदी मोहून गेला. त्या धुंदीत त्याने आपल्या सर्व कलाकार मित्रांना मोठी मेजवानी दिली. त्याने ते बैलांच्या झुंजीचे चित्र एका नवीन रेशमी कापडावर शिवले. सुंदरशा चंदनाच्या फ्रेम मध्यें बसविले आणि भिंतीबर टांगून ठेवले.

माधवशर्माला वाटले आपल्या गावांत ह्या महान कृतिची केवढीशी किंमत होईल? त्यापेक्षा आपण राजधानीत जाऊन राजदरबारांत राजापुढें ह्याचे प्रदर्शन केले तर केवढी प्रशंसा होईल! बस. हा विचार मनांत येताक्षणीच त्याचा निश्चय झाला आणि आपल्या काही कलाकार मित्रांना बरोबर घेऊन तो राजधानीला निघाला.

वाटेंत त्यांना एक गांव लागले. तेथें माधवशर्मांचा एक मित्र म्हणाला—"शर्माजी तुमच ते झुंजीचं चित्र ह्या खेडयांतील लोकांना दाखवा. त्यांना ते खूप आवडेल. ते कौतुक करतील."

माधवशर्मानें लगेंच आपल्या चित्रांच्या पेटीतून ते बैलांच्या झुंजीचे चित्र बाहेर काढले. ते चित्र गांवकऱ्यांना दाखवून म्हणाला—"माझ्या जवळ बरीच सुंदर सुंदर चित्रें आहेत. परंतु तुम्हांला ती नाही आवडणार. हे पहा हे चित्र तुम्हाला आवडेल. हे तुमच्या ओळखीचे आहे. पहा ह्या बैलांच्या डोळ्यांत, त्यांच्या पवित्र्यांत

त्याच्या कृतीत त्यांच्या सर्व अंगअंगात त्यांचे भाव कसे तंतोतंत उमटलेले आहेत."

चित्र गावकऱ्यांना दाखवून त्या विषयी त्यांचे मत पाहण्यासाठीं तो मोठ्या उत्सुकतेने त्यांच्याकडे पाहूं लागला. सर्व-जण चित्र पाहून फक्त एकमेकांकडे पहात गप्प उभे राहिले. इतक्यांत एक तरुण शेतकरी मोठमोठ्याने हंसू लागला. ते पाहून माधवशर्माला राग आला. परंतु त्याच्या अज्ञानाची कीव केल्यासारखे दाखवून तो म्हणाला–"अरे अडाण्या, तुला चित्रकलेतील कांही ज्ञान आहे कां? उगीच कशाला असे मोठ्याने हसत सुटला आहेस. पहा ही ह्यां सांडांची झुंज?"

"हो तर! अगदी वास्तवापेक्षा जास्त स्वाभाविक उमटलं आहे." त्या मुलाने व्यंग करून उत्तर दिले.

माधवशर्मांचा एक मित्र मध्येंच म्हणाला–"उगीच हंसतोस काय चिडवल्यासारखे. हे एक फार मोठे नामांकित कलाकार आहेत. ह्यांची चित्रे मोठेमोठे जमीनदार श्रीमंत, शेट सावकार, फार मोठी किंमत देऊन विकत घेतात. ह्यांचे नांव आहे माधवशर्मा समजलास?"

तो तरुण शेतकरी म्हणाला–"आपण शहरी माणसे बैलांची झुंज पाहिल्याशिवाय नुसत्या कल्पनेनी चित्र काढले असणार. आम्ही बैलांची झुंज नेहमी लावतो आणि पहातो. आहो दोन सांड डोकी खाली घालून, शिंगे रोखून, एकमेकावर धावून जातात तेव्हां त्यांच्या शेपट्या उगारलेल्या चाबकाप्रमाणे हवेत हलत राहतात. नाही तर आपल्या चित्रांतल्या शेपट्या. पहा भित्र्या कुत्र्यांच्या शेपटी प्रमाणें मागच्या दोन पायांत लोंबत्या दाखविल्या आहेत."

आत्ता पर्यंत गप्प उभे राहिलेले शेतकरी एकदम खदखदून मोठ्यानें हंसू लागले आणि एकमेकाच्या पाठीवर थापामारून व्यंगपूर्ण माधवशर्माकडे पाहूं लागले.

बिचारा माधवशर्मा सुंदर चित्रातील व्यंग पाहून हिरमुसला आणि चित्र निट ठेवून दिले आणि सर्वांनी ते गांव सोडले.





# अग्नि द्वीप

[९]

[राजकुमारी कांतिमतीने चित्रसेनला सांगितले की, माझे वडील कपिलपुरच्या किल्ल्यात बंदीवासात आहेत. चित्रसेन आपल्या सैन्यानिशी तेथे पोहोचला. त्याने पाहिले दोन भयंकर पक्षी किल्ल्यावर पहारा करीत आहेत. अमरपाल म्हणाला त्या भयंकर पक्षांना भिववण्या-साठी प्रत्येकाने हातात पेटती मशाल धरून त्यांना दाखविली पाहिजे. पुढे वाचा......]

अमरपालच्या बोलण्यावर चित्रसेनचा विश्वास बसला. त्याच दिवशी पहाटे अमरपारपालने त्या भयंकर पक्षांच्या झोपड्यांना आगी लावल्या होत्या. व त्या साऱ्या पक्षांचा सर्वनाश केला होता. परंतु उग्राक्षच्या मनात उगाच त्या पक्षांची भीती बसली होती.

"जळत्या मशाली दाखवून ते पक्षी काय आपल्यावर हल्ला केल्याशिवायच पळून जातील? काय ही गोष्ट सत्य आहे?" उग्राक्षाने अत्यानंदाने विचारले.

"अरे मशाली कोठे आहेत?" अमरपाल जोरात ओरडला. तेलात बुडवून काढलेल्या मोठ मोठ्या मशालीसह काही सैनिक पुढे आले.

अमरपाल त्यांना चित्रसेनला दाखवित म्हणाला–"महाराज, आपण तावडतोब आज्ञा कराल तर, हे लोक आपापल्या



मशाली पेटवून किल्ल्याला चारी बाजूंनी घेरा घालतील. त्याच्या बरोबर उरलेले सैनिक हल्ला करतील."

"अरे ऐका!" असे म्हणत उग्राक्षने आपल्या राक्षस साथीदारांकडे वळून पहात टाळ्या वाजविल्या. "हो, हो सरदार! आम्ही सर्वजण एकदम तयार आहोत फक्त आज्ञा करा." असे म्हणत राक्षस वीर त्याच्या चारी बाजूला पसरले.

"तुमच्या लोकांपैकी काही बलदंड तरुणांनी मोठमोठी झाडे तोडून त्याने किल्ल्याचे दार फोडा. बाकी सर्वांनी कुदळ फावडी घेऊन किल्ल्याच्या भिंती तोडा." उग्राक्षाने आपल्या अनुयायांना आज्ञा करीत म्हटले. नंतर चित्रसेनला म्हणाला–"महाराज आपण फक्त किल्ल्याच्या प्रवेश द्वारावरच हल्ला करण्यापेक्षा किल्ल्याच्या चारी बाजूंनी एकदम हल्ला करून किल्ल्यात घुसणे उत्तम होईल. अशा परिस्थितीत किल्ल्यातील व तटावरील शत्रु सैनिक आपल्याशी एकदम हल्ला करण्यास सामोरे येणार नाहीत. आता...... त्या भयंकर पक्ष्यांच्या हल्ल्यापासून आपल्याला वाचविण्याची जबाबदारी अमरपालाची आहे!"

"उग्राक्षा, तू बिलकुल चिंता करू नको. तुझे रक्षण करण्याची जबाबदारी माझी." अमरपालने आपल्या साथीदारांना संकेत करीत म्हटले.

"तुझ्या सारखा भित्रा पळपुटचा माणूस काय ह्या महाराक्षसाचे रक्षण करणार आहे?" असे म्हणत उग्राक्ष तोंड वेंगाडत फिदी फिदी हसत सुटला. व त्याने त्याच अविर्भावात आपली गदा उंच उगारली.

"उग्राक्ष, थोडा थांब!" कांतीमती आज्ञेच्या सुरात बोलली. "तुम्ही इथे एकमेकांशी भांडण उकरीत बसलात तर तिथे कैदेत अडकलेल्या माझ्या वडिलांचे काय? ते तर संकटात अडकलेले आहेत." नंतर चित्रसेनकडे वळून पहात म्हणाली–



"महाराज, आपण विसलात काय?" तुम्ही मला मदत करण्याचे वचन दिले आहेत.

"हो हो" असे म्हणत चित्रसेनने डोके हलवले. व उग्राक्षाला म्हणाला–"उग्राक्षा ह्यात कोणतीही शंका करण्याचे कारण नाही की, तू राक्षसांचा नेता आहेस. तुला तुझा शूरपणा अमरपाल पुढे दाखवायचा नाही त्या किल्ल्यात रहाणाऱ्या शत्रु सैन्यापुढे दाखवायचा आहे व त्या भयंकर पक्षांना."

चित्रसेनच्या तोंडचे ते बोलणे ऐकून उग्राक्ष आपला राक्षसी अविर्भाव दाखवित म्हणाला–"अरे माझ्या दासानों, पहाता काय आहात! माझ्या आज्ञेचे पालन करा." उग्राक्षची आज्ञा मिळताच राक्षस सैनिकांनीं मोठ मोठे वृक्ष मुळासकट उखडून काढले त्याच्या फांद्या व पाने खुडून टाकली. व ते आपापल्या खांद्यावर घेऊन ते जोरजोरात गर्जना करीत किल्ल्याची दारे फोडण्यासाठी निघाले. त्याचवेळी त्यांच्या पाठोपाठ चित्रसेनाचे सैनिक व काही लोक जळत्या मशाली घेऊन पळत पळत निघाले.

त्यानंतर काहीं वेळाने किल्ल्याच्या जवळ बराच गडबड कोलाहल गोंधळ ऐकू येऊ लागला. इकडे कांतिमती व चित्रसेन आपल्या सैन्याला उत्तेजित करीत घोड्यावर स्वार होऊन पळू लागले.



चित्रसेन आणि उग्राक्ष व त्यांचे सैनिक किल्ल्याच्या द्वारापाशी येऊन पोहोचले. तेव्हां अकस्मात तटापलीकडून त्यांच्यावर बाणांचा वर्षाव होऊ लागला. इकडून चित्रसेनाचे सैनिक सुद्धा त्यांच्यावर बाण सोडू लागले. तेवढ्या धामधुमीत काही सैनिक द्वाराशी पोहोचले. आणि आपल्या खांद्यावर वाहून आणलेल्या वृक्षांच्या मोठमोठ्या ओंडक्यानी दार बडवू लागले. काही सैनिक आपल्या कुदळीने किल्ल्याच्या भिंती फोडू लागले.

अशा परिस्थितीत अचानक ढगांच्या गडगडाटासारखा भयंकर आवाज दुमदुमला. सर्वजण बावचळून इकडे तिकडे टकामका



पाहू लागले. तितक्यात झंझावाताप्रमाणें दोन भयंकर पक्षी विद्युत वेगानें त्या सैनिकांपाशी येऊ लागले. तेव्हां अमरपालने आपल्या हातातील जळती मशाल उंच दिसेल अशी धरली व पक्षांना संबोधून आपल्या सैन्याला चेतावणीच्या सुरात म्हणाला—"तुम्ही कोणीही घाबरून जाऊ नका. पक्षांना बरोबर लागतील अशा मशाली पक्षी जवळ आले की त्यांच्यावर बरोबर टाका." तसे म्हणताच अनेक मशाली पक्षांच्या रोखाने उंच उडाल्या.

भयंकर पक्षी मोठमोठ्याने किंकाळया फोडत सैनिकांवर हल्ला करण्याच्या उलट भीतीने आकाशांत उंच उडू लागले. त्यांच्या पाठीवर स्वार झालेले व्याघ्रचर्मधारी लोक आपल्या खंजिराने त्यांच्या मानेवर भोसकून त्यांना सैनिकांवर हल्ला करण्यासाठी उत्तेजित करीत होते. खाली पेटत्या मशाली पाहून ते त्यांच्या काबूत राहीले नाहीत. त्यातील एक पक्षी स्वतःला होणाऱ्या आघाताने खवळून गेला. व त्याने आपले पखं फडफडवले त्याने तो स्वार झालेला व्याघ्रचर्मधारी निसटून किंकाळी फोडून खाली उभे असलेल्या शत्रुसैन्यामधे येऊन पडला. चित्रसेनाचे सैनिक अत्यानंदाने गर्जना करू लागले. पहाता पहाता दोन्ही भयंकर पक्षी आकाशात उंच उडाले व अदृश्य होऊन गेले.

त्या भयंकर पक्ष्यांच्या मुळे शूर बनलेले नागवर्माचे सैनिक ते पक्षी अदृश्य होताच आपले धैर्य घालवून बसले. आणि भीतीने थरथर कांपत किल्ल्याच्या तटावरुन खाली उड्या मारून राजमहालाच्या दिशेने पळून जावू लागले. त्या बुर्जावरून येणारा बाणांचा वर्षाव थांबताच चित्रसेनाच्या सैनिकांनी किल्ल्याच्या दरवाजापर्यंत जाऊन काही क्षणातच ते द्वार फोडून टाकले. तेवढ्यामध काही राक्षसांनी किल्ल्याच्या भिंतीला एका ठिकाणी मोठे भगदाड पाडले व ते एक एक करीत किल्ल्याच्या आत घुसले.



ह्यानंतर मोठी लढाई न होताच राज-महालावर चित्रसेनाचा अधिकार झाला. नागवर्माच्या ज्या ज्या सैनीकांनी मोठ्या हट्टाने राक्षस सैन्याशी हल्ला केला ते सर्व त्यांच्या हाती मरण पावले.

अशा प्रकारे किल्ला व राजमहाल आपोआप चित्रसेनाच्या हाती आला. परंतु त्यांना अजून शोध लागला नाही की, राजा वीरसिंहला कैद करून कोठे डांबून ठेवले आहे. चित्रसेनाच्या मनांत आता एक शंका येऊ लागली की, काहीशत्रु लोक गुप्ततेने राजा वीरसिंहला किल्ल्यातून कोठेतरी बाहेर घेऊन गेले असावेत. राजकुमारी कांतिमतीने त्या सैनिकांना असा उपाय सांगितला की आपले वडील राजमहलातील कोणत्यातरी अंधार कोठडीत डांबून ठेवलेले आहेत. तेव्हां त्यांच्या चांगला शोध करावा भूगर्भात कोठेतरी ते असतील.

राजकुमारीची आज्ञा मान्य करून राक्षस सुद्धा राजमहालातील तळघरात तिच्या वडीलांचा शोध करू लागले. तेवढ्यात त्यांना एका अंधार कोठडीतून कण्हण्याचा आवाज ऐकू आला. तेव्हां काही सैनिक पेटत्या मशाली घेऊन आत निघाले. तेथे भयंकर काळोख होता. आत जाणे अत्यंत मुष्किल होते. आतील खोलीला लोखंडीगजांचे दार होते ते कुलूप लावून बंद केलेले होते. त्यांनी हातातील मशाल त्या सळयांमधून घुसवली व त्या उजेडात चौफेर पाहू लागले तेव्हां एका कोपऱ्यात भिंतीला सटून बसलेली एक मानवाकृती त्यांना अस्पष्ट दिसली.

"अरे हे तर महाराज वीरसिंहच आहेत." एक सैनिक जोरात किंचाळला. दुसऱ्याक्षणी राजमहालाच्या चारी बाजुंनी सैनिक व राक्षस तेथे येऊन पोहोचले. परंतु कोणालाही आत प्रवेश करता आला नाही. सर्वांत प्रथम त्या लोखंडी सळया असलेले दाराचे कुलूप तोडणे भाग होते.

सैनिकांची गडबड व गोंगाट ऐकून चित्रसेन व कांतिमती तेथे येऊन पोहोचले.



त्यांना सुद्धा त्या मशालीच्या उजेडात एक अस्पष्ट माणूस दृष्टीस पडला. त्याच बरोबर थोडा कण्हण्याचा आवाज सुद्धा ऐकू आला.

"अरे तुम्ही इथे काय गंमत पहात बसलात? आधी ते कुलूप तोडा." चित्रसेनने आज्ञा केली.

सैनिकांनी कुऱ्हाड आणली व ते कुलूप तोडण्याचा प्रयत्न करू लागले. परंतु नारळाच्या आकाराच्या त्या कुलूपाला खूप गंज लागला होता. त्यामुळे त्यावर कुऱ्हा-डीच्या प्रहाराचा काहीही परिणाम झाला नाही. फक्त खण्खण् असा आवाज तेवढा होवू लागला. त्याच सुमारास एक सैनिक धांपा टाकीत तेथे आला व म्हणाला—"महाराज, कुलूपाला तर गंज लागलेला आहे. चावी मिळाली तर उत्तम काम होईल."

"त्या किल्लीच्या शोधासाठी तू काय त्या राजद्रोही नागवर्माच्या आश्रयाला जाणार की काय?" असे म्हणत चित्रसेन त्या सैनिकाच्या हातातील कुऱ्हाड घ्यायला पुढे सरसावला. तेव्हां मोठमोठ्याने ओरडत उग्राक्ष पुढे आला. त्याला पहाताच कांति-मती त्याला म्हणाली—"उग्राक्षा, माझ्या वडीलांना त्या दुष्ट नागवर्माने ह्याच अंधार कोठडीत बंद करून ठेवले आहे. तू ताबड-



तोब हे कुलूप तोडून आम्हाला मदत करून त्यांना मुक्त कर."

"हात्तिच्या त्यात एवढे काय मोठे आहे!" असे म्हणत उग्राक्ष समोरच्या सैनिकांना बाजूला सारीत पुढे आला. ते कुलूप हातात घेऊन त्याने जोरात खेचले. परंतु ते काही निघाले नाही. तेव्हां त्याने ते लोखंडी गज दोन्ही हातांनी घट्ट पकडले व ते उखडून काढण्याचा प्रयत्न केला. दाराचे लोखंडी गज करकर करीत उपटता आले परंतु कुलूप काही तुटले नाही.

"नागवर्मा व त्याचे अनुयायी काही विचित्रच प्राणी वाटतात बुवा असे वाटते की, खिडक्याच्या गजा पेक्षाही चांगले

भक्कम कुलूप लावले आहे." असे म्हणत उग्राक्षाने मोठ्या सावधतेने ते लोखंडी गज हातात धरले व ते दोन्ही बाजूला वांकवले ते मेणबत्ती वाकवावी त्याप्रमाणे तावडतोब वांकले गेले. अशा प्रकारे दोन्ही गजाच्या मधुन एका सैनिकांनी मशाली सह आत प्रवेश केला. तेव्हां त्याला हातपायात साखळदंडाने करकचून बांधलेले वीरसिंह दृष्टीस पडले.

वीरसिंहराजाच्या तोंडावर एक कापड बांधले होते व ते मोठ्या कष्टाने कण्हत होते.

आपल्या वडीलांना अशा स्थितित पाहून कांतिमती अत्यंत विकल झाली. "बाबा" असे म्हणत त्याच्यापाशी धावत गेली. चित्रसेनने सुद्धा कांतिमती बरोबर त्या कोठडीत प्रवेश केला व वीरसिंहच्या तोंडाला बांधलेले कापड त्याने सोडवले. तितक्यामधे उग्राक्षाने त्यांच्या हातापायाला बांधलेले साखळदंड तोडून काढले.

"बाळे, मी तर ह्या कोठडीत बंद झाल्यानंतर विचारही केला नव्हता की, आता ह्या जन्मी तरी तुला पुन्हा पाहू शकेन." असे म्हणत ते भिंतीजवळ लुडकले तितक्यात एका सैनिकांने धांवत जाऊन महाराजांना बसण्यास एक आसन आणले. दुसऱ्याने पिण्यासाठी पेल्यात पाणी आणले.

वीरसिंहनी थोडं पाणी पिऊन आपली अस्वस्थता घालवली नंतर आसनावर बसत कांतिमतीला म्हणाले–"मुली, तो द्रोही नागवर्मा जिवंत आहे कां मेला आहे! कां कैदेत आहे?"

कांतिमती उत्तर देणार होती परंतु संकोचाने तिने चित्रसेनाकडे आपली दृष्टी वळवली तेव्हां चित्रसेन वीरसिंहना म्हणाला-"महाराज, माझे नांव चित्रसेन आहे. बहुदा तुम्ही माझे व माझ्या राज्य विषयी नांव ऐकले असावेत ह्या राक्षसाचे नाव उग्राक्ष आहे. हा माझा सेवक आहे. नागवर्मा माझ्या वडीलांच्या धवलगिरी राज्यावर हल्ला करण्यासाठी गेला आहे. जर कां शक्य झाले तर रस्त्यातच गाठून त्यांचा संहार करण्यासाठी मी माझे मोठे सैन्य व सेनापती आधीच पुढे पाठविले आहेत. (क्रमश:)



# प्राणांची किंमत

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणें मौनपणें स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, ह्या भयंकर अशा स्मशानात कोल्हे ओरडत आहेत. घुबडे आवाज काढीत आहेत परंतु तू जरा देखिल न घाबरता जे श्रम करीत आहेस. ते प्रशंसनीयच म्हटले पाहिजेत. तुला माहित आहे का की जो कोणी प्रयत्न सिद्धीसाठी कार्य करतो. तो जर कां केदारनाथ प्रमाणे विवेकशिल व व्यवहारी नसला तर त्याचे फळ केव्हांही त्याला मिळत नाहीत. त्याच्या अभावापायी सर्व प्रयत्न फुकट जातात. ह्याचे उदाहरण म्हणून तुला केदारनाथची गोष्ट सांगतो." लक्ष देऊन ऐक असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



चंद्रपुरचा राजा चंद्रसिंह ह्याला एकुलती एक मुलगी होती. तिचे नाव कुमद होते. ती एकाएकी एका भयंकर रोगाने आजारी पडली. राजवैद्यांनी अनेक तऱ्हेचे उपचार केले. कोणाच्याही औषधाचा राजकुमारीला गुण आला नाही. इतर अनेक देशांतूनही वैद्यांना बोलावण्यात आले. परंतु कोणालाही रोगाचे निदान करता आले नाही.

अशा परिस्थितीमुळे राजा अतिशय निराश झाला की आता मुलीला जगवणे कसे शक्य आहे. त्या विचारात मग्न असतांना राजाचा मंत्री तेथे आला व सल्ला देत म्हणाला–"आपण अशा तऱ्हेची राज्यात दवंडी पिटवा की. राजकुमारी कुमुदला जो कोणी रोगमुक्त करेल त्याच्या बरोबर तिचा विवाह करण्यात येईल व त्याला अर्धे राज्य बक्षीस देण्यात येईल."

राजाने मंत्र्याच्या सल्ल्यानुसार फक्त स्वतःच्या राज्यातच नाही तर इतर अनेक राज्यातूनही अशा तऱ्हेची दवंडी पिटवली. तेव्हां ती ऐकून अनेक वैद्य चंदनपुरला आले. काही लोकांनी तर रोगाचे निदान करून त्यावर औषधोपचार केला परंतु राजकुमारीची तब्बेत न सुधारता झाल्या-कारणाने ते सर्व आपापल्या गावी निराशेने निघून गेले.

राजकुमारीची तब्बेत दिवसेंदिवस ढासळतच चालली. त्यामुळे राजा चंद्रसिंह भयंकर अस्वस्थ झाला. तेवढ्या अवधीत केदारनाथ नावाचा एक तरुण वैद्य चंदनपुरला आला व राजकुमारीला पाहून त्याने तिची नाडी तपासली. व रोग कसला ह्याचे खोल निरिक्षण केले.

त्यानंतर त्याने राजाचे दर्शन घेतले व म्हटले–"महाराज, मी राजकुमारीला रोगमुक्त करून निरोगी करू शकतो. परंतु ह्या रोगावर उपचार करावयाचे झाले तर एक विशिष्ट प्रकारची वनस्पती आवश्यक असते. ती वनस्पती नागपर्वताच्या जवळपासच असलेल्या जंगलात मिळू शकते तेव्हां तुम्ही मला त्या जंगलातून ती मुळी आणण्याची परवानगी द्या."

त्यावर राजाने त्याला मोठ्या आनंदाने तिकडे जाण्याची परवानगी दिली. केदारनाथ जंगलात गेला व त्याने जंगलात सर्वत्र त्या वनस्पतीचा शोध केला. बऱ्याच प्रयत्नाअंती त्याला एका जागी ती वनस्पती आढळली.

तो ती वनस्पती मोठ्या काळजीपूर्वक सांभाळून घेऊन राजधानीला यावयास निघाला. तो राजमहाला जवळील राजोद्यानात येऊन पोहोचला. तितक्यात त्याला बागेत काम करीत असलेला एक म्हातारा माळी खोकत खोकत खाली कण्हत पडलेला दिसला. तेवढ्यात आजुबाजुच्या कामगार लोकांनी त्याच्या भोवताली गर्दी केली. वैद्यांनी त्याची नाडी तपासून पाहिली. व एक क्षणात त्याला समजले की, काही क्षणातच तो मरण पावणार आहे. कारण आश्चर्याची गोष्ट म्हणजे जो रोग राजकुमारीला झाला होता तोच ह्या म्हाताऱ्या माळ्याला सुद्धा झाला होता. तेव्हां केदारनाथने मागचापुढचा अजिबात विचार केला नाही व स्वतः जवळील वनस्पती बाहेर काढली जी राजकुमारीसाठी जंगलातून आणली होती. ती त्याने थोडी वाटली व पाण्यात मिसळून म्हाताऱ्याला दिली.

अर्ध्यातासाने म्हाताऱ्या माळ्याने डोळे उघडले व तो उठून बसला. व आपले





प्राण वांचविलेल्या केदारनाथला हात जोडून नमस्कार करीत म्हणाला—"बाळ, चिरंजिवी बनून दिर्घायुषी हो!"

ही गोष्ट काही क्षणातच राजमहालात जाऊन पोहोचली. केदारनाथने असा विचार केला. की राजकुमारीसाठी आणलेली औषधीवनस्पती तर खर्च होऊन गेली. आतादुसरी आणण्यासाठी पुन्हां जंगलात जावयास पाहिजे. परंतु ह्याखेपेस ती मिळविण्यासाठी जवळपास दोन, तीन आठवडे तरी लागतील. तेव्हां त्यापूर्वी राजाला सर्व गोष्ट सविस्तर सांगणे बरोबर होईल असा विचार करून तो राजाला भेटावयास गेला.

राजा चंद्रसिंहने केदारनाथचे सर्व बोलणे ऐकले. व अत्यंत संतापाने त्याला रागावीत म्हटले—"अरे दुष्ट! तुला माहित होते की, राजकुमारी मरणान्ती तडफडत आहे. अशा स्थितीत राजकुमारी साठी आणलेली औषधी वनस्पती तू त्या म्हाताऱ्या माळ्या-साठी खर्च करून त्याचे प्राण वांचविलेस राजकुमारीच्या प्राणापेक्षा त्या म्हाताऱ्या माळ्याचे प्राण काय जास्त किंमतीचे आहेत. त्यातून तुला हे सुद्धा महित होते की हि औषधी वनस्पती फक्त एका माण-साला च उपयोगी पडते. तरी सुद्धा तू त्याच्यासाठी त्या औषधाचा उपयोग करून टाकलास. आता तू जर पुन्हां जंगलात ती औषधी वनस्पती आणण्यासाठी गेलास तर तेवढ्या अवधीत राजकुमारीच्या प्राणाला धोका पोहचणार तेव्हां तू केलेला हा घोर गुन्हां आहे." ह्याला आता तावडतोब फांसावर चढवा.

राजाची आज्ञा पाळून सेवकांनी ताबड-तोब त्याचे हात बांधले व त्याला वधस्तंभाकडे नेले. तेव्हां केदारनाथने निवेदन केले—"प्रभू! आपण घाइगर्दीने असा निर्णय देऊ नका. मी एका आठवडयाच्या आत त्या औषधी वनस्पतीचा शोध काढतो. तेवढ्या अवधीत राजकुमारी-च्या जीवाला कसलाही धोका संभवत



नाही मी माझ्या गुरुची शपथ घेऊन वचन देतो.

केदारनाथने केलेल्या विनंतीनुसार सुद्धा राजाचा राग शांत झाला नाही. सेवक त्याच्या गळयात फासाची दोरी अडकविण्यासाठी उभे राहिले. तितक्यात तो म्हातारा माळी धावत धावत तेथे येऊन पोहोचला व राजाच्या पायावर लोटांगण घालीत कळवळत म्हणाला—"महाराज, आपण म्हटल्याप्रमाणे माझ्या प्राणांची कांहीच किंमत नाही. परंतु एवढया लहान वयाच्या वैद्याच्या प्राणांची किंमत कित्येक पटीनें जास्त मोल्यवान आहे. त्याला सोडून देऊन मला फांसावर चढवा."

त्यावर केदारनाथ मोठ्या कष्टाने म्हणाला—"ह्या म्हाताऱ्याचे प्राण फांसावर चढविण्यासाठी मी वांचविले नाहीत! प्रभू! आपण चांगला विचार करून मला ती औषती वनस्पती मिळवून राजकुमारीचे प्राण वांचविण्यासाठी संधी द्या."

राजा डळमळू लागला व विचार करू लागला की काय निर्णय घ्यावा तेव्हां मंत्र्यानी राजाला सल्ला दिला की, एकवेळ केदारनाथला संधी द्यावी. तेव्हां राजाने मंत्र्यांचा सल्ला मानला केदारनाथला फांसाच्या मेढीवरून खाली उतरवले.



ह्यानंतर केदारनाथ जंगलात गेला व त्याने ती औषधी मुळी शोधून काढली व राजाला दिलेल्या वचनानुसार त्याने राज-कुमारीवर औषधोपचार सुरू केला. दिर्घ-कालापासून त्रस्त करणारा रोग दोन दिवसाच्या आत निघून गेला. एका आठ-वडयाने राजकुमारी आपल्या महालात हिंडूफिरू व हंसू खिदळू लागली.

राजकुमारीला निरोगी पाहून राजाला फार आनंद झाला. त्यांनी केदारनाथला अर्धेराज्य व त्याच बरोबर राजकुमारी बरोबर त्याचे लग्न लावून देण्याचा निश्चय केला व त्याला बोलावून आणण्यासाठी पालखी पाठवून दिली.

चौकशीअंती त्यांना समजले की केदारनाथ सूर्योदयापूर्वीच निघून गेला आहे.

येथर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, ह्यावरून तर सिद्ध होते की, केदारनाथ वैद्यकी विद्येमध्ये असाधारण आहे. कारण कित्येक ठिकाणहून वैद्य येऊन राजकुमारीची चिकित्सा करू शकले नाहीत. परंतु तशा रोगाचे निवारण केदारनाथने केवळ एका औषधी वनस्पतीने करून दाखविले. अशी व्यक्ति तर फार मोठी ज्ञानी असावी. ह्यात शंका करण्याचे तर कारणच उरत नाही. तेव्हां अर्धे राज्य व राजकुमारी ह्यांचा त्याग करून टाकणे हे आश्चर्यकारक वाटत नाही कां? त्यांने असा तर विचार केला नसेल की अशा प्रकारे सत्कार करून घेण्याची आपल्याला जरूर नाही. ह्या शंकेचे समाधानकारक उत्तर माहित असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

त्यावर विक्रमादित्य म्हणाला–" एक तर गोष्ट स्पष्टच आहे. की, केदारनाथने स्वार्थ बुद्धीने प्रेरित होऊन राजकुमारीवर उपचार केला नाही. जर कां त्यांचा मनात स्वार्थ असता तर एवढ्या परिश्रमाने आण-लेली औषधी वनस्पती त्यांने एका शुल्लक माळ्यावर खर्च केली नसती. एका वैद्याच्या रूपाने त्याला कोणाच्याही जिवांची किंमत जास्त मोल्यवान वाटत होती इथे तर हा प्रश्न अप्रासांगिक आहे परंतु राजा चंद्रसिंह अत्यंत स्वार्थी होता. त्याला प्राणाची किंमत करता येत नव्हती. त्यामुळे त्यांनी माळ्याच्या प्राणांची किंमत शुल्लक मानली. आणि केदारनाथला फांशीची शिक्षा फर्मावली. अशा स्वार्थी राजाचा जावईहून परिश्रमानी प्राप्त केलेली वैद्यकीय शिक्षेला तिलांजली द्यावी लागेल. म्हणून केदारनाथ आपले कार्य व हेतू संपल्या बरोबर राजाचा निरोप सुद्धा न घेता गुपचुप तेथून निघून गेला.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# पावसाचे ढग

त्रिगर्तदेशातील सारे लोक शेतकरी होते. तो देश नेहमी धन-धान्यांनी सदा फुललेला असे. तेथील जनता सुद्धा सुखी व संपन्न होती. त्याना सदा पावसावर अवलंबून रहावे लागे.

तसे पाहिले तर त्रिगर्त येथील जनता अनेक देवीदेवतांची पुजा अर्चा करीत. परंतु वरुण देव व पावसाचे ढग ह्यांची कधीच आराधना करीत नसत. आकाशाकडे पाहून हात जोडून कधी कृतज्ञता सुद्धा प्रकट करीत नसत. त्यामुळे वरुण देव प्रजेवर अत्यंत असंतुष्ट होते. स्वतः मेघांना बोलावून असा निर्णय घेतला की, ह्यापुढे त्रिगर्त देशावर कोणीही एक थेंबही पाडू द्यायचा नाही.

ह्याचा परिणाम शेवटी व्हायचा तोच झाला. त्यावर्षी पावसाळ्याच्या दिवसांत पाण्याचा एक थेंबही भूमीवर पडला नाही. सर्व लोक डोळे फाडफाडून आकाशाकडे पाहू लागले. परंतु पावसाचा एक ढग देखील त्यांच्या दृष्टीस पडला नाही. सर्व प्रजा व्याकूळ झाली. त्यांना तसे दुःखी पाहून मेघांना अत्यंत आनंद झाला. परंतु अचानक त्या मेघांच्या आनंदाला विरजण पडले. एक ढगाचा तुकडा कोणालाही न सांगता संवरता त्रिगर्त देशात गेला व थोडा पाऊस पाडून गुपचूप परत आला.

त्रिगर्त देशातील जनता संतुष्ट झाली व निश्चित होऊन म्हणू लागली–"अरे वा! चला, आता तरी पावसाला सुरवात झाली एकदाची व प्रत्येक शेतकऱ्यांने आपल्याला शेतात बी पेरले.

तेवढ्यामधे त्या मेघ खंडाला इतर मेघांनी मिळून खूप उलट सुलट बोलून धमकावले व म्हटले–"अरे मूर्खा, तू हे काय केलेंस? शेवटी तुझा उद्देश तरी काय आहे? आम्ही सर्वांनी मिळून एक निर्णय

घेतला होता. की त्रिगर्त देशात पाण्याचा एक थेंबही न पाडता जनतेला दुःखी कष्टी करायचे अशा परीस्थितीत तू मुकाट पाऊस पाडून आलास तुझी अक्कल कोठे गेली?''

''तुम्ही सुद्धा नंबर एकचे बुद्धु निघालात मी जाऊन थोडीशी रिमझीम करून आलो कारण की त्रिगर्त देशातील लोकांनी पेरण्यासाठी म्हणून जे काय थोडे फार धान्य वाचवले होते त्यांनी पेरून टाकावे. हे काय तुमच्या डोक्यात आलेच नाही का?'' लहान मेघ म्हणाला.

ह्यानंतर त्रिगर्तची प्रजा कशा तऱ्हेचे हाल भोगते आहे हे पहाण्यासाठी मोठा मेघ मोठ्या आनंदाने त्रिगर्त देशाच्या बाजुला निघाला. तेवढ्या अवधीत त्रिगर्तच्या लोकांत त्राही त्राही माजली होती. थोड्याफार वर्षावाने जे काय बी. उरले होते ते शेतकऱ्यानी मातींत पेरून टाकले होते. परंतु त्यानंतर पावसाचा एकही थेंब पडला नाही. ते सारे आकाशात पाहू लागले व वरुणदेवाला भाकू लागले.

त्या देशातील लोकांची ती अवस्था पाहून मोठ्या ढगाला फार वाईट वाटू लागले. तो छोट्या मेघखंडाला रागावून म्हणाला—''तू मोठ्यांना विचारल्या शिवाय अशी खट्याळ कामे करू नकोस.'' नंतर सर्व मेघांनी मिळून त्रिगर्त देशावर मुसळधार पाऊस पाडला व तेथून निघून गेले.

आपली प्रार्थना ऐकून आपल्या देशात पाऊस पडला हे पाहून त्रिगर्त देशातील सर्व शेतकरी न चुकता वरुण देव व पावसाची सतत पुजा अर्चना करू लागले. ह्यानंतर पुन्हां कधीही त्या देशात दुष्काळ पडला नाही. तो देश सुजलाम् सुफलाम् बनला.

परंतु ह्या पाठीमागची गोष्ट मोठ्या ढगाच्या डोक्यात शिरली नाही की ह्या साऱ्याचे मुळ कारण छोटा ढग आहे. त्याने जे काही खोडकर काम केले. ते सरते शेवटी एक कल्याणकारी सिद्ध झाले. परंतु छोटा बिचारा मेघखण्ड ही गोष्ट समजू शकला नाही की. आपण अप्रात्यक्षिक एक महान कार्यच केले आहे.





भारतातील अद्भुत स्थळे:

## चित्तौडचा किल्ला

राजस्थानात पांचशे फूट उंचावरील एका डोंगरावर सातशे एकर क्षेत्रफळ असलेला चित्तौडचा किल्ला अत्यंत प्रसिद्ध व ऐतिहासीक महत्व असलेला आहे. अनेक राजवंशाचे निवासस्थान असलेल्या ह्या किल्ल्यात पुराण पुरुष भीमसेन ह्याने सुद्धा काही काळासाठी आपले निवास स्थान बनवले होते.

ऐतिहासिक दृष्टीकोनातून पाहिले तर आपल्याला असे समजते की, चित्रांगद नावाच्या मौर्य राजाने येथे सर्वप्रथम आपली राजधानी बनवली होती. त्यांनीच ह्या पर्वताला सुद्धा चित्रकुट असे नाव दिले. तेच काहीकाळाने चित्तौड बनले परंतु त्या राजाने केलेला किल्ला काही काळानंतर नष्ट झाला.





आठव्या शतकात हा प्रदेश मेवाडचा राज्यकारभार करणाऱ्या रावळ वंशाची राजधानी बनला. तेराव्या शतकात राणा रतनसिंहने मेवाडचा राज्यकारभार केला. त्यांची पत्नी पद्मिनी जगातील सर्वश्रेष्ट सुंदरी म्हणुन प्रसिद्ध होती. त्या राणीला कैद करण्यासाठी दिल्लीच्या सुलतान अल्लाउद्दीन खिलजीने चित्तौड किल्ल्यावर हल्ला करून तो घेरला.



अल्लाउद्दीन खिल्जीने हजारो प्रयत्न करून सुद्धा त्याला तो किल्ला हस्तगत करता आला नाही. डोंगरमाथ्यावर आपला तळ ठोकून त्याने पद्मिनीचे प्रतिबिंब आरश्यात तरी पहावे ह्या उद्देशाने रतनसिंहाकडे विनवणी केली. रतनसिंहाने त्या विनंतीला, मान्यता दिली. व त्याला निरोप द्यावा ह्या कारणाने तो किल्ला उतरून खाली आला त्याने त्या संधीचा फायदा घेऊन रतनसिंहला बंदी केले.

ह्यानंतर सुलतान खिल्जीने पद्मिनीकडे असा निरोप पाठविला की तू तावडतोब माझ्याकडे ये नाहीतर राजा रतन-सिंहला आम्ही ठार करू. तेव्हां राणी पद्मिनीने सुल्तानाकडे आपला असा निरोप कळवला की, मी माझ्या सातशे मैत्रिणींच्या समवेत आपल्या दर्शनास येत आहे. ते ऐकून खिल्जी अत्यंत आनंदीत झाला. व राणी पद्मिनीची डोळ्यात तेल घालून वाट पाहू लागला तिकडे चित्तौड हून पालख्या निघाल्या.





अल्लाउद्दीन खिलजीने आपला तळ जेथे ठोकला होता. तेथे येऊन पोहोचल्या पालख्यांमधून एकूण १४०० सैनिक आपापल्या तलवारी उगारीत बाहेर आले. पालख्या उचलणारे भोई सुद्धा सैनिकच होते मग काय? दुसऱ्या क्षणात दोन्ही शत्रूंच्यात भयंकर युद्ध सुरू झाले. त्या लढाईत खिलजीचे अनेक सैनिक ठार झाले. व राजा रतनसिंहला कैदेतून मुक्त करण्यात आले. खिलजी तेथून पळून गेला.

अपमानानी चिडलेला खिल्जी दिल्लीला पोहोचला. त्यानंतर त्याने कशाही प्रकारे चित्तौडच्या किल्ल्यावर हल्ला करून तो हस्तगत करण्याचा दृढ संकल्प केला. आणि जवळपास एका वर्षाच्या आत एक अती प्रचंड सैन्य घेऊन तो चित्तौडवर चालून गेला. राजपुत सैनिक प्राण पणाला लावून लढले याचवेळी राणी पद्मिनीने व इतर रजपुत स्त्रियांनी चिता पेटवून आत्मसमर्पण केले.





सुंदर अप्रतिम काव्यसुमने रचणारी सुप्रसिद्ध कृष्णाची भक्त मीराबाई हिने चित्तौडचा राजा भोज ह्याच्या बरोबर विवाह केला. राजाने मीरा-बाईसाठी एक अतिसुंदर असे कृष्णाचे देऊळ बांधून दिले. कृष्णाच्या मुर्ती समोर बसून मीराबाई आपली काव्ये म्हणत तन्मय होऊन जाई.

लहान वयाच्या युवराजाला ठार मारण्यासाठी काही हल्यारे किल्ल्यात शिरले. त्यावेळी दाई पन्नाने आपल्या मुलाला युवराज बनवून त्यांला दाख-विले व खऱ्या युवराजला गुप्ततेने दुसऱ्याठिकाणी पोहोचवले व आपल्या मुलाचा बळी देऊन राजकुमाराला वाचविले.





ह्यावेळी चित्तौडचा किल्ला मोडकळीस आलेला आहे. तरी सुद्धा तेथे असलेल्या वस्तु शोभा आणतात तेथे असलेला सर्वांत सुंदर व अद्भुत असा निर्मिलेले १४४८ मध्ये महाराणा कुम्भाने निर्माण केलेला विजयस्तंभ व किर्ती स्तंभ आहे. सुलतान कुतुबुद्दीन शाहवर विजय प्राप्त करण्याच्या उद्देशाने स्मारकाच्या रुपाने ह्या स्तंभांचे निर्माण केलेले आहे.

येथील अत्यंत विशाल असा महाराणा कुम्भाचा महाल मोठ्या काळजीपूर्वक तयार केलेला आहे. ह्या किल्ल्याच्या आंत वेगवेगळ्या गावांना पोहोचण्या-साठी भुयारे खोदलेले भूगर्भमार्ग आहेत. येथील महालाच्या तळ घरामधेच राणी पद्मिनीने आपल्या प्राणांची आहुती दिली होती.





येथे अत्यंत प्राचिन देवळापैकी अत्यंत मुख्य म्हणजे कालीमातेचे देऊळ आहे. ह्याठिकाणी अधिष्ठात्री देवी कालीमातेचा महत्व आहे काही लोकांचे मत आहे की, प्रारंभीच्या काळी हे सूर्याचे देऊळ असावे.



# मातीचे सोने

एका शेतकऱ्याला एकुलता एक मुलगा होता. तो लहान असतानाच आईच्या प्रेमाला पारखा झाला. काहीं दिवसांनी शेतकरी आजारी पडला, जेव्हां त्याला वाटले की आता आपले मरण जवळ आले. तेव्हां त्याने आपल्या मुलाला जवळ बोलावुन घेतले आणि म्हटले—"बाळा, मी निर्धन होतो. त्यामुळे मी काही इस्टेट ठेवू शकलो नाही. परंतु मी मनापासून तुला आशीर्वाद देतो की तू जरी जमिनीला शिवलास तरी त्याचे सोने बनेल.

आपल्या वडिलांच्या मृत्युनंतर मुलाने आपल्या आईवडिलांची श्रद्धा स्मरण समोर ठेवले व तो खूप काबाडकष्ट करू लागला. परंतु त्याच्या श्रमांचे फळ त्याला उत्तम तऱ्हेने लाभले. थोडयाच काळात तो एका द्राक्षाच्या बागेचा मालक झाला. आजूबाजूच्या सर्व बागांपेक्षा त्याच्या बागेला त्याला जास्त कमाई मिळू लागली.

काही वर्षांने त्याने अनेक फळांच्या बागा खरेदी केल्या. मासेमारी साठी नावा खरेदी केऱ्या. तेलाच्या घाणी विकत घेतल्या तेल व मासेमारीत सुद्धा त्याला भरपुर फायदा होऊ लागला. लवकरच तो शहरातील सर्व श्रीमंत लोकात गणला जाऊ लागला. तो कोणताही कामधंदा किंवा व्यापार करो त्यात त्याला भरपुर फायदा मिळे तो धन-संपत्ती बरोबर एका अलिशान घरात राहू लागला. व एका सुंदर तरुणीशी लग्न करून तो स्वत:चे आयुष्य अत्यंत ऐषआरामात घालवू लागला.

परंतु एक दिवस त्याच्या मनांत आपल्या धन संपत्तीच्या बाबतीत एक शंका निर्माण झाली. ती त्याने आपल्या एका जिवश्च-कंठश्च मित्राजवळ बोलून दाखवित म्हटले—

रत्ना पारखे



"अरे हेबघ, मला माझ्या शक्तिसामर्थ्याच्या पलिकडे सौभाग्य प्राप्त झाले आहे. त्यामुळे जर ह्यावर विचार केला तर मला एक प्रकारची भीती वाटते की, इतक्या सुलभतेने प्राप्त झालेली हि लक्ष्मी एका क्षणातही नाहीशी होऊ शकेल. त्यामुळे माझ्यावर जेष्टा देवीचा कोप होऊ शकतो. त्यामुळे तिला संतुष्ट करण्यासाठी मी असे काहीतरी काम करावे म्हणतो की त्या कामामुळे माझे नुकसान होईल तू मला चांगल्या विचारा-अंती सल्ला दे.

तेव्हां मित्राने स्वत:चे डोके लढवले व त्याला विचारले–"मित्रा, सांग खजूर कोठे जास्त होतात?"

"कैरोला त्या मुलाने झटक्यात म्हटले."

"तर मग विचार कसला करतोस! एक काम कर तुला येथे जितका म्हणून खजूर मिळत असेल तितका जास्तीत जास्त किंमत देऊन खरेदी कर आणि तो उंटावर लादून कैरोला नेऊन कमीत कमी किंमतीत विक. तुझे त्यात भरपूर नुकसान होईल." मित्राने समजावित म्हटले:

ही गोष्ट त्याला मोठी छान वाटली. दुसऱ्याच दिवशी त्यांनी खजुराच्या व्यापाऱ्याच्या कडून जेवढा खजूर मिळेल तेवढा जास्तीत जास्त किंमत देऊन खरेदी केला. नंतर तो सारा उंटावर लादून कैरोला विकावयास निघाला.

बऱ्याच दिवसाने वाळवंटातून प्रवास केल्यानंतर तो इजिप्तला येऊन पोहोचला. आणि एक गोष्ट पाहून तो आश्चर्याने चकित होऊन निश्चल उभा राहून पहात राहीला. त्याच वेळी एका पांढऱ्या शुभ्र घोडयावर बसून मित्र देशचा सुलतान त्याच्या बाजुलाच येत असलेला दिसला त्याच्या बरोबर त्याचा सारा परिवार व सैनिक होते. सर्व सैनिकांच्या हातात चाळणी होत्या.

गरीब शेतकऱ्याच्या मुलाने सुलतानाला सलाम करीत म्हटले–"हुजूर, काय झाले हे सारे सैनिक आपापल्या हातात चाळणी घेऊन का येत आहेत?

त्यावर सुलतान म्हणाला–"काय सांगू? आज पहाटे मी ह्या घोडयावर बसून फेरफटका मारण्यास निघालो होतो लग्नाप्रसंगीची अंगठी कुठे तरी निसटून ह्या वाळूत पडली. ती अंगठी मला माझ्या प्राणापेक्षा प्रिय अशी आहे. त्यामुळे ती मिळत नाही तोपर्यंत ह्या साऱ्या प्रदेशातील वाळू मी चाळून काढणार आहे.

सुलतानाने त्याला विचारले–"तू कोणत्या कामासाठी कैरोला जात आहेस?"

"कैरोमध्ये खजूर विकायला जात आहे उंटावर लादलेल्या खजूराच्या टोपल्याकडे अंगुलीनिर्देश करीत." तो म्हणाला.

सुलतान त्यावर चकित होऊन म्हणाला–"तू कैरोला जाऊन खजूर विकणार? गमंतच करतोस इथे दिवसाला एका खजुराच्या झाडाचे सुद्धा खजूर काढून संपत नाहीत तू आपला माल कैरोला घेऊन जाऊन विकणार? तुझे फार नुकसान होईल पहा!"

सुलतानाचे बोलणे ऐकून त्याचा सारा परिवार खदखदून हसू लागला. तो म्हणाला–"तुम्ही तर मला भीतीच दाखवत आहात. परंतु मला तर एका गोष्टीचे भय वाटते माझे नुकसान नक्की होवो. माझ्या वडिलांनी मरतेसमयी मला आशीर्वाद देत म्हटले–"बाळ तू मातीला जरी स्पर्श केलास तरी ते सोने होऊन जाईल असे म्हणत त्यांनी खाली वाकून मुठभर वाळू हातात घेतली. त्यानंतर उघडली वाळू सारी खाली पडली व फक्त अंगठी तीच काय त्याच्या हातात राहीली.

"अरे अरे हिच तर अंगठी मी हरवली होती." सुलतान अतिशयांनदाने एकदम किंचाळला. सुलतानाने त्या शेतकरी मुलाच्या नशिबाची खूप वाखाणणी केली आणि आपली एवढी प्राणप्रीय अंगठी इतक्या सुलभतेने मिळालेली पाहून त्या मुलाला अत्यंत किंमती भेटी बक्षीस दिल्या.

अशा प्रकारे शेतकऱ्याचा मुलगा जास्तीच फायदा मिळवून परत घरी आला.



# कंजुस प्रकारचा खेळ

एका गावात गोविंद नावाचा एक गृहस्थ रहात होता. तो एक नंबरचा कंजुस होता. तसा तो खूप श्रीमंत होता परंतु त्याच्या हातून एक कवडीं देखील सुटत नसे. स्वत: प्रमाणेच तो स्वत:च्या मुलाला देखिल कंजुस प्रकारचे धडे देई. एका सणाच्या दिवशी गोविंदने आपला मुलगा गोपीनाथ ह्याला नवीन कपडे शिवण्याचा विचार केला. परंतु त्याने आपला शिंपी धर्मदासाकडून कपडे फुकट कसे शिवून मिळतील यासाठी एक योजना केली. त्यासाठी त्याने आपला मुलगा गोपीनाथला समजावून सांगितले परंतु सणाच्या दिवशी आपल्या मुलाने जुनेच कपडे नेसलेले पाहून त्याला अत्यंत आश्चर्य वाटले त्याने मुलाला विचारले–"बाळा, शिवायला दिलेले कपडे आणले नाहीस कां ?"

"शिंपी धर्मदासने शिलाई दिल्याशिवाय कपडे देणार नाही म्हणून सांगितले." गोपीनाथ म्हणाला. मग तू सांगितले नाहीस कां ? की धाकट्या भावाने शिलाईचे पैसे रस्त्यात कुठेतरी पाडले व हरवले." गोविंदने थोड्या रागातच म्हणाला.

"बाबा, मी तर तसेच त्या शिंप्याला सांगितले. तेव्हां तो शिंपी म्हणाला. जो पर्यंत तू पैसे न हरविण्या एवढा मोठा होशील. तो पर्यंत मी थांबायला तयार आहे. तेव्हां पैसे देऊन कपडे घेऊन जा." गोपीनाथ म्हणाला. गोविंदला समजण्यास वेळ लागला नाही तेव्हां त्याने गोपीनाथच्या हाती पैसे देऊन शिवायला दिलेले कपडे आणण्यास त्याला शिंप्याकडे पाठविले.





# उत्तर रामायण

रावण वरुण लोकांतून लंकेला येण्यासाठीं पुष्पक विमानांत बसून निघाला आणि वाटेंत जेवढ्या म्हणून सुंदर मुली त्याच्या नजरेस पडल्या त्या सर्वांना विमानांत बसवून लंकेत घेऊन आला. त्या मुली आक्रोशाने रावणाला शाप देत होत्या.

रावणाने लंकेत प्रवेश केला मात्र त्याची बहीण शूर्पणखा आक्रोश करीत छाती बडवीत त्याच्या समोर आली आणि दु:खा-तिशयानें त्याला म्हणाली–"दादा तूं हे काय केलेस रे ? बाकीच्या कालकेयांच्या बरोबर माझ्या यजमानांचाही वध केलास? आपल्या मेहुण्यावर हात उचलताना तुझे हात तुटून कसे रे नाही पडले ? हाय रे हाय ! मला तू विधवा करून टाकलेस."

शूर्पणखेचा विलाप ऐकून रावण ही दु:खी झाला तो म्हणाला–"जे झालं. ते कांही परत येत नाहीं मी कांहीं मुद्दाम केले नाही. मी एकदा युद्ध करूं लागलो म्हणजे माझ्यावर खून चढतो मी तुला सर्व व्यवस्था करून खराच्या स्वाधीन करतो तो तुझी सर्व प्रकारे काळजी घेईल. मी त्याला चौदा हजार राक्षस सेनेची तैनात देतो आणि त्याच्या बरोबर दूषणलाही पाठवून देतो. सर्व दंडकारण्याचा अधिकार देतो तेथे तुम्ही सुखानें रहा.

रावणानी सांगितल्याप्रमाणें खरोखरीच सर्व व्यवस्था करून खर आणि दूषणा बरोबर शूर्पणखेला दंडकारण्यांत पाठवून दिले. तेथे ते सुखासमाधानानें राहू लागले.



रावण विमानांत बसून पर्यटनास निघाला तो निकुंभिल वनांत येऊन पोहोंचला तेथे त्याला पुत्र मेघनाद भेटला. त्याला पाहून रावणाला फार आनंद झाला. प्रेमाने कवटाळून त्याला विचारले कि, तो येथे कशासाठी आला आहे.

राक्षस गुरु शुक्राचार्य पुढें होऊन म्हणाले–"अरे तुझ्या सुपुत्राने सात यज्ञ करण्याचा संकल्प केला. त्या प्रमाणे त्याने अग्निष्टोम, अश्वमेध, राजसूय गोमेध, वैष्णव आदि पार पाडले. त्या शिवाय अतिशय कठीण असा महेश्वर यज्ञ सुद्धा संपूर्ण करून श्री शंकराला प्रसन्न करून घेतले. त्याच्याकडून 'इच्छा गमनवाला रथ' 'सर्वत्र अंधकार करणारी माया' 'महाशक्तिशाली धनुष्यबाण' हे सर्व वरदान म्हणून मिळविले आणि आता तो शवटचा यज्ञ करण्याच्या तयारीत आहे."

शुक्राचार्यांने दिलेली माहिती रावणाने ऐकून घेतली. पण त्याला ते कृत्य आवडले नाही. तो म्हणाला–"हे तुझे काम ठीक झाले नाही. तुम्ही आपले शत्रु असलेल्या देवादिकांना इंद्राला संतुष्ट करण्यासाठी फार मोठें धन खर्च केले आहेत. असे म्हणून मेघनादाला तो आपल्या बरोबर घऊन गेला."

रावणाला पाहिल्या बरोबर विभीषणाने एक दु:खद बातमी सांगितली कि मधु नावाच्या एका राक्षसाने कुंभीनसला घरांत कोणी नाहीं असे पाहून पळवून नेले. माल्यवंत म्हणून रावणाच्या आईचे काका होते. त्यांची नात कुंभीनस मुलीची मुलगी, नात्याने रावणाची बहीण होती म्हणून ती रावणाकडे राहात असे. ज्या वेळी तिला पळवले त्या वेळी रावण दिग्-विजयाला गेला होता. कुंभकर्ण झोपला होता आणि विभीषण पाण्यांत उभे राहून तपश्चर्या करीत होता.

रावणाने अनेक कन्यांचे अपहरण करून त्यांना अंत:पुरात बंद करून ठेवले होते. परंतु आपल्या बहिणीला पळवून नेल्याच्या बातमीने तो क्रुद्ध झाला. त्याने रावणाला झोपेतून उठवले. सर्व राक्षसांना आणि मधु राक्षसाचे घर जे मधुपुरी होते त्यावर चढाई करण्यास सज्ज होऊन निघाला. आपला भाऊ रावण भले मोठे राक्षस सैन्य घेऊन आपल्या पतीला मारण्यासाठी येत आहे म्हणून कुंभीनस घाबरून गेली.

बहिणीला घाबरलेली पाहून रावण म्हणाला–"घाबरूं नकोस मी त्याला मारीत नाही पण मला सांग तो सध्या कुठें आहे? त्याला माझ्याबरोबर घेऊन जाईन."

"मी सांगते तुझा निरोप त्याला." म्हणून कुंभीनस आपल्या नवऱ्याकडे मधु-राक्षसाकडे गेली व म्हणाली–"माझा भाऊ देवांशी युद्ध करायला निघाला आहे. तो तुलाही बरोबर घेऊन जाणार तूं जा."

रावण आपल्या सर्व सैन्यासह आपला मेहुणा मधुराक्षस त्याच्या नगरीत येऊन पोहोंचला. मधुराक्षसाने मोठ्या थाटानें त्याचे स्वागत केले. प्रेमाने आतिथ्य केले. रावणाने एक दिवस राहून तेथे विश्रांती घेतली. आगि दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे पुढील मुक्कामास निघाला.

त्या रात्री चंद्राचे शुभ्र चांदणे बाजूला पसरले होते. पर्वतावरील वृक्षलतामधून किन्नरांच्या वृंदगायनाचें मधुर स्वर ऐकू येत होते. कुबेराच्या



प्रासादांतून अप्सरांच्या नृत्य गायनाचे स्वरझंकार मन मोहून टाकीत होते. फुलांचा सुगंध सर्वत्र दरवळत होता.

अशा कामोद्दीपक वातावरणातून अप्सरांची अधिनायिका झालेली रंभागाढ झोपलेल्या रावणाच्या सैन्या मधून त्या दिशेने पुढें चालली होती. ती अलंकारांनी नटलेली होती. ती जणु लक्ष्मीच प्रति भासत होती. तीलापाहून रावण आपल्या आसनावरून उठला. तिच्या जवळ जाऊन उभा राहिला. तिचा हात धरून त्याने तिला विचारले–"ह्या अशा वेळी इतकी नटून थटून तू कोणाकडे चालली आहेस? ती भाग्यवान व्यक्ति कोण आहे? तो जो



कोणी असेल त्याच्यापेक्षां मी कोणत्याही बाबतीत कमी नाहीं. तिन्हीं जगांत माझी बरोबरी करणारा तुला सांपडणार नाहीं तू घाईने दुसरीकडे कशाला जातेस?"

रावणाचे बोलणें ऐकून रंभा भयभीत झाली आणि आश्चर्य प्रगटकरून म्हणाली– "मला कोणी छेडूलागले किंवा त्रास देऊं-लागले तर आपण माझे रक्षण करायचे ते सोडून हे असले भलते विचार आपल्या मनांत कसे आले? नात्याने मी आपली सून लागते आपला पुतण्या आहेना नलकुबेर तो माझी वाट बघत बसला असेल. त्याच्यावर मी प्रेम करते. त्याच्या शिवाय दुसरा कोणी माझ्या मनात भरत नाही."

रावणाने तिच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष दिले नाहीं अप्सराच ती. त्याने आपली इच्छा पूर्णकेली. अपमानित आणि लज्जित झालेली रंभा फार दुःखी कष्टी होऊन नलकुबेराच्याकडे गेली. त्याचे पाय पकडून ती रडली. आणि रावणाने केलेले सविस्तर वर्णन त्याला सांगितले.

रंभेच्या अपमानाची गोष्ट ऐकून नलकुबेराला अतिशय राग आला. त्याने पाण्याला स्पर्श करून रावणाला शापदिला.

"ह्या पुढें केव्हांही रावणाने कोण्या स्त्रीचा हात धरला आणि तिच्या इच्छेच्या विरुद्ध तिच्यावर बलात्कार करुं लागला तर त्याच्या डोक्याचे हजार तुकडे होतील."

रावणाविषयी ही शापवाणी जेव्हां त्याच्या अंतःपुरातील जबरदस्तीनें पळवून आणलेल्या बायकांनी ऐकली तेव्हां त्यांना हायसे वाटले.

दुसरे दिवशी रावणाने आपल्या सैन्यासह स्वर्गाची वाट धरली. त्याच्या सैन्याने स्वर्गाला चारी बाजूने घेरुन टाकले. स्वर्गाला घेरल्याची बातमी जेव्हां इंद्राला समजली तेव्हा त्याने सर्व देवांना त्वरेने आपापले सैन्य घेऊन युद्धास सज्ज होण्या-विषयी निरोप पाठविले. आणि आपणस्वतः विष्णूकडे गेला. त्याच्या चरणाशी निवेदन केले–"देवाधिदेवा, रावण आपले राक्षसांचे





सर्व सैन्य घेऊन आला आहे. त्यानें चारी-बाजूने स्वर्गाला घेरले आहे. आणि स्वर्गावर स्वारी केली आहे. आपण आपले चक्र घेऊन माझ्या मदतीला येऊन रावणाशी युद्ध करावे असें मला वाटते."

"ह्या वेळी मी रावणाबरोबर युद्ध करायला येणार नाहीं. तो ह्या युद्धांत मरणार पण नाही. अजून त्याच्या मृत्यूची घटका भरली नाही. तू असा भीतोस कशाला? भिण्याचे कांहीं कारण नाही. ह्या वेळी तुलाच युद्ध केले पाहिजे." असे सांगून विष्णूने त्याला पाठवून दिले.

देव आणि दानव यांच्यामध्यें भयंकर युद्ध सुरु झाले. रावणाच्या सेनेचे सेनापतित्व रावणाने आपल्या आजोबाकडे दिले होते. ह्या युद्धांत सेनापति सुमाली-रावणाचे आजोबा-वसुच्या हातून मारला गेला. देवांनी निकराचे हल्ले करून राक्षस सैन्याला जरजर करून सोडले जवळजवळ नव्वद टक्के राक्षस ह्या युद्धांत मारले गेले. आपल्या पराक्रमानें इंद्राने रावणाला जिवंत पकडून बंदी केले.

हे वर्तमान इंद्रजिताला समजले. त्याने नुकत्याच मिळविलेल्या आपल्या माया अस्त्राचा उपयोग केला. अदृश्य रुपाने युद्ध सुरू केले. मग इंद्राला बंदी केले. आणि दृष्य रुपाने येऊन आपल्या पित्याला सोडवून घेतले. युद्धाच्या विजयाची पताका फडकावून रावणाला म्हणाला–"युद्ध संपले आपण जिंकलो तुम्ही बंधमुक्त झालांत. हे पहा इंद्राला बांधून आणले आहे.

युद्ध संपल्यावर रावण सर्व लवाजम्यासह लंकेला परत आला. बरोबर मेघनाद आणि कैद केलेला इंद्रही पण होता

इंद्राला रावणाच्या कैदेतून सोडवून आणण्यासाठी सर्व देवाकडे गेले. ब्रह्मदेव सर्व देवांना बरोबर घेऊन रावणाच्या दरबारांत गेला. प्रसन्नचित्ताने तो रावणाला म्हणाला–"रावणा, तुझा मुलगा मेघनाद अचाट पराक्रमी आहे. त्याने ह्या युद्धांत प्रत्यक्ष इंद्राचाही पराभव केला आहे.



त्याला जिंकणं कांही सोपी गोष्ट नाहीं म्हणून ह्या पुढे तो इंद्रजित ह्या नावाने ओळखला जाऊं लागेल. तो अजेय होईल. त्याच्याच मदतीनें तू हे युद्ध जिंकले आहेस. आता तू इंद्राला सोडून दे."

"आजोबा, इंद्राला सोडा म्हणतां पण त्याच्या बद्दल कांही तरी मिळाल्याशिवाय कसे त्याला सोडायचे? त्या बद्दल मला अमरत्व द्या." इंद्रजित म्हणाला.

"कोणत्याही प्राण्याला पूर्णपणे अमर होता येत नाहीं बाबा. समजलं?"

"असं असेल तर सोडा नका देऊं अमरत्व मी तुम्हाला संतुष्ट करण्यासाठी नित्य नेमाने मंत्रोच्चारासह हविस देऊन अग्निची अर्चना करीन जेव्हां मी युद्धाला निघेन तेव्हां घोडे जुंपलेला रथ अग्नितून यावा. जो पर्यंत मी त्या रथावर आरूढ असेन तो पर्यंत मला अमरत्व असावे. असा वर मला द्या. मी अग्निची अर्चना करीत असतां ती पूर्ण होण्याच्या अगोदरच जर मला मरण आले तर येऊदे." इंद्रजितने आपली इच्छारूपी अट ब्रह्मदेवाला सांगितली.

ब्रह्मदेवाने 'तथास्तु' म्हटले. त्यानंतर इंद्रजिताने इंद्राला बंधनातून मोकळे केले. इंद्राला सोडल्यामुळे सर्व देव आनंदाने स्वर्ग लोकांत निघून गेले.

रावण नेहमी मदोन्मत्त होऊन पृथ्वीवर संचार करीत असे त्यांचे ही सविस्तर वर्णन अगस्ति ऋषींनी श्रीरामचंद्राला सांगितले. असेच एकदां रावणाला वाटले आपण कार्तवीर्य सहस्त्रार्जुनाचे नगर महिष्मति जावे. तेथे त्याला समजले त्या दिवशी सहस्त्रार्जुन आपल्या बायकांना घेऊन नर्मदा नदीमध्यें विहार करावयाला गेला आहे. तेथे रावणही जाऊन पोहोचला.

रावण शिवभक्त त्याने नर्मदानदीत स्नान केले आणि शिव पूजनाला बसला. तो नेहमी आपल्या जवळ एक सोन्याचे शिवलिंग ठेवे. त्याने ते बाहेर काढले. वाळूचा एक लहानसा ढीग करून त्यावर





त्याची स्थापना केली. त्याची षोडशोपचारे पूजा करून भक्तिभावाने नाचू लागला.

नर्मदानदी पूर्वेकडून पश्चिमेकडे वहात येते आणि पश्चिम सागराला मिळते. रावणाने पाहिले कि नदीचे पाणी उसळत उसळत काठाकडे भरून येत आहे. थोडया वेळाने पाहतो तर त्याच्या पूजेची फुले पाण्यात वाहून चालली आहेत आणि ती सुद्धा पश्चिमे कडून पूर्वेकडे उलटया दिशेने नदी अशी पश्चिमे कडून पूर्वेकडे कशीकाय वाहू लागली सर्वजण आश्चर्याने पाहूं लागले. त्याने टिचकी वाजवून शुक-सारणांना बोलावून नदी उलट दिशेने कां वाहात आहे हे पाहून येण्यास सांगितले.

शुक-सारणांनी जाऊन पाहिले. कार्तवीर्य आपल्या बायकांच्याबरोबर नदीमध्ये विहार करत असल्याचे त्याना दिसले आणि पाहिले कि त्याने आपल्या सहस्त्र बाहूनी आणि प्रचंडदेहाने पाणी आडवून ठेवले आहे. ते पाणी उलट दिशेने येत आहे. रावणाकडे परत येऊन शुकसारणांनी सांगितले कि वृक्षा सारखा एक मानव नदीत आडवा पडला आहे. त्यामुळे पाणी आडवले जाऊन उलटे वाहात आहे. त्याचे वर्णन ऐकल्यावर रावणाने अंदाज केला कि हा नक्की कार्तवीर्य सहस्त्रार्जून असला पाहिजे तो आपल्या सैन्यासह त्याच्याशी युद्धास निघाला. रावणाने कार्तवीर्याच्या मंत्र्याकरवी निरोप पाठविला कि त्याने कार्तवीर्याला युद्धाचे आव्हान केले आहे.

कार्तवीर्याचे मंत्री म्हणाले—"अरे युद्धाला ही कोणची वेळ शोधून काढली आहेस? राजा आत्ता आपल्या स्त्रियांच्या बरोबर जलविहार करतो आहे. तो कसा आत्ता युद्धाला येणार? उद्या ये" रावणाला ते पटले नाही. त्याने तेव्हांच युद्ध झाले पाहिजे म्हणून हट्ट धरला व युद्धास प्रवृत्त झाला. कार्तवीर्याच्या मंत्र्यांनी आव्हान स्वीकारले म्हणाले—"प्रथम आमच्या बरोबर युद्ध होऊ दे. मग आमच्या राजाच्या बरोबर." दोन्ही सैन्यामध्ये युद्ध आरंभ झाले.

रावणाच्या राक्षस सैन्याने कार्तवीर्याच्या बऱ्याच माणसांचा वध केला. काहींना खाऊन टाकले. आरडा ओरडा करून हल्ला सुरू केला. कोलाहल ऐकून कार्तवीर्याच्या बायका घाबरून गेल्या. त्यांना अभय देऊन कार्तवीर्य नदीच्या बाहेर आला एक मोठी गदा हातात घेऊन आपल्या पांचशे हातानी ती फिरवत तो युद्धभूमी जवळ आला प्रहस्त हातांत भले मोठे मुसळ घेऊन आला. कार्तवीर्या समोर त्याला आडवून उभा राहिला.

प्रहस्ताने मुसळ कार्तवीर्याकडे भिरकावले पण त्याने ते आपल्या गदेने तोडून टाकले. आणि त्याचा पाठलाग करून त्याच्यावर गदेचा प्रहार केला. त्या बरोबर प्रहस्त खाली कोसळला. प्रहस्ताला पडलेला पाहिल्यावर मारीच, शुक, सारण धूम्रक्ष, महोदर आदि राक्षस पळून गेले.

ह्यानंतर कार्तवीर्य आणि रावणाचे गदा युद्ध सुरू झाले. दोघांनी एक दुसऱ्यावर गदेचा प्रहार करण्यास सुरवात केली. दोघेही पर्वताप्रमाणे अचल उभे होते. शेवटी कार्तवीर्याने रावणाच्या छातीवर जोराने गदेचा प्रहार केला. गदेचे तुकडे तुकडे झाले पण रावण तो घाव सहन करू शकला नाही. बेशुद्ध होऊन खाली पडला. कार्तवीर्याने त्याचे हात पाय दोराने बांधले आणि आपल्या नगरीत घेऊन गेला. रावण बंदी झाल्याचा समाचार स्वर्गात पुलस्त्याला समजला. लगोलग तो महिष्मति नगरात येऊन पोहोचला. कार्तवीर्याने भक्तिभावाने त्याचे स्वागत केले. हात जोडून आगमनाचे कारण विचारले.

"माझा हा नातू सर्वांना जिंकून आजिंक्य झाला. त्याला सुद्धां तू जिंकले आहेस. कोणच्या शब्दात तुझ्या पराक्रमाचे आणि यशाचे वर्णन करूं! तू ह्याला सोडून दे. एवढेच माझे सांगणे आहे." काहीही न बोलता. जरा सुद्धा विरोध न करता, कार्तवीर्याने त्याचे बंधन सोडले, अग्नीदेवा साक्ष ठेवून मैत्री केली. आणि त्याला वस्त्रा-भूषणाची भेंट देऊन सत्काराने पाठवून दिले.





# मार्गदर्शन

राम आणि कृष्ण सुमारे वीस बावीस वर्षांचे दोघे भाऊ भाऊ शहरांत परीक्षा देऊन पदवी घेऊन आपल्या गांवी येऊन राहिले. बापाजवळ थोडी जमीन-जायदाद असल्यामुळे खाण्यापिण्याचा प्रश्न नव्हता. ते दोघे मुलगे खाऊन पिऊन रोज एकाद्या देवळाच्या कट्टयावर बसून चकाट्या पिटत कधीकधी मित्र भेटल्यास जुगार सुद्धां खेळत असत. त्यांनी नोकरीचा कधी विचारच केला नाही.

एक दिवस त्यांच्या वडीलांनी त्यांची कान उघाडणी केली आणि त्यांना नोकरी शोधण्यासाठी प्रयत्न करण्यास सांगितले. रामाने थोडा विचार केला आणि आपल्या भावाला म्हणाला–"कृष्णा ह्या दिसांत नोकऱ्या कुठल्या मिळतायत आणि मिळालीच तर ती टिकून ठेवण कां सोप आहे? एक काम करत जाऊं या."

"कसल काम रे." कृष्णाने विचारले.

"आपण रोजच्या सारखेच जेऊन खाऊन घराबाहेंर पडायचं. लांब दुसऱ्या गांवाच्या वाटेवर कुठे तरी आरामशीर जागा पाहून बसायचं. वेळ घालवायचा झोपायचं आणि संध्याकाळी घरी परतायचं. घरी जेवण तर तयारच असत. बरं आहे कि नाही? कशी वाटते युक्ति?"

आपल्या मोठ्या भावाची सूचना धाकट्या भावाला पसंत पडली.

ठरवल्याप्रमाणे दुसरे दिवशी दोघे भाऊ जेऊन खाऊन नोकरी शोधाला म्हणून घराबाहेर पडले. गांवाबाहेर गेल्यावर दुसऱ्या गावाला जाणारी एक पाऊल वाट त्यांना दिसली. त्या वाटेवर एक मोठे पिंपळाचे झाड त्यांना दिसले ते दोघे त्या झाडाजवळ गेले. त्यांना बरी वाटली ही जागा. राम म्हणाला–"बरी आहे रे



ही जागा. पालापाचोळा झाडून खडे काढून टाकले कि छान आहे इथे बसायला."

"तू म्हणतोस तसच करूं या." कृष्ण म्हणाला. आणि दोघे ही पिंपळाखालील जागा साफ करूं लागले. त्यांच्याच गावची तुळशीबाई त्या रस्त्याने घरी परत येत होती. त्यांना पाहून ती म्हणाली–"आश्चर्यंच आहे रोज त्या पडक्या देवळाच्या कट्ट्या-वर बसून चकाटच्या पिटणारे तुम्हीं आज येथें हे काय करीत आहात व बाकीचे टोळ भैरव कुठें आहेत ?"

तुळशी सुखवस्तू होती. तिच्याघरी सर्व व्यवस्थित होते. पण तिचा स्वभाव थोडा विचित्र होता. म्हणून तिला सर्व गांवकरी खुळचट म्हणत असत.

"आम्ही आपल्या गांवाच्या हितासाठी सुखासाठीं श्रमदान करीत आहोत. आम्ही येथें एक देऊळ बांधण्याचा विचार करीत आहो, काकू." राम कुचेष्टेनी म्हणाला.

"इथे कोणाचे देऊळ माहीत आहे ?" राम आणि कृष्णानें चेष्टा केली.

"असं ?" तुळशी म्हणाली. "फार छान फार छान. तुमचा विचार फार चांगला आहे. ह्या देवळासाठी तुम्हाला वर्गणी गोळा करावी लागेल नाही ? त्याचा मी मुहूर्त करते. ह्या घ्या माझ्या दोन बांगड्या त्या कामासाठी. हो काम अगदी झटपट झालं पाहिजे. नाहीतर पाडाल आपलं रेंगाळत" असे म्हणून तिने आपल्या दोन बांगड्या काढून पिंपळाच्या बुंधाशी ठेवल्या. आणि आपल्या वाटेला लागली.

उन्हामध्यें दिसणारी त्या बांगड्यांची चमक पाहून दोघा भावांचे डोळे चमकले. राम म्हणाला–"काय चमक आहे. मला वाटतं ह्या बांगड्यांची कमीत कमी चार पांच हजार रुपये तरी किंमत येईल. चल आपण शहरांत जाऊन विकू."

"हे काम तावडतोब झाले पाहिजे. ही बाई आपल्या बाबांना जाऊन सांगले आणि ते धावत पळत येतील. आत्ताच येथून निघून जाऊ या. म्हणजे बाबानी विचार-ल्यावर आपल्याला काही माहीत नाही. म्हणून सांगता येईल. त्या बावळीवर कोण विश्वास करील." कृष्ण म्हणाला.

क्षणाचाही विलंब न करतां दोघे भाऊ शहराकडे निघाले. तेथें पोहोंचता पोहोंचता दुपार झाली. थोडे हिंडल्यावर त्यांना एक सोनाराचे दुकान उघडे दिसले. तेव्हां राम कृष्णाला म्हणाला–"अरे, आपल्याला आजची सोन्याची किंमत कुठे माहीत आहे. अगोदर ती जाणून घेतली पाहिजे. नाहीं तर हे सोनार बसवतील आपल्या डोक्यावर. म्हणून तूं असं कर दुकानांत जा आणि जणू आपल्याला बांगड्या विकत घ्यायच्या आहेत अशा आविर्भावाने सोन्याची किंमत पाहून घे. मग आपण ह्या बांगड्या विकायच्या आहेत म्हणून दाखवू या. मी समोरच तिथे कट्ट्यावर बसतो." असे म्हणुन राम कट्ट्यावर जाऊन बसला.

कृष्ण दुकानांत शिरला दुपारची वेळ असल्यानें सर्व कारकून, नोकर जेवणासाठी निघून गेले होते. एकटा मालक बसला होता. कृष्णाने बांगड्यांची चौकशी केल्या-वर मालकाने चार पांच जोड त्याच्यापुढें टाकले आणि म्हणाला–"तुम्ही जोडी पसंत करा मग मी सांगतो. हो त्यांच्या वजनावर नक्षीवर किंमत अवलंबून असते."

तेवढ्यांत एक श्रीमंत दिसणारा माणूस दुकानांत शिरला आणि म्हणाला–"मला





अगदी नव्या फॅशनच्या सांखळ्या दाखवा. दहा हजारा पर्यंतच्या तरी असाव्यात."

दुकानदाराने निरनिराळ्या तऱ्हेचे हार आणून प्रत्येकाचे वैशिष्ठच सांगू लागला. तेवढ्यांत कृष्णाने त्यांच्या जवळ असलेल्या बांगडी सारखी बांगडी काढून त्याची किंमत विचारली. बांगडी हातात घेऊन दुकानदार किंमत सांगणार तेवढ्यात तो श्रीमंत माणूस गरजला–"हे काय हे? माझ्याशी सौदा करत असतांना मध्यें मध्यें दुसऱ्याशी काय बोलता? हे मी आजच नवीन अनुभवत आहे. मी कोणत्याही दुकानांत शिरलो तरी दुकानदार प्रथम माझेच काम बघतात. हा माझा अपमान आहे. मी हे मुळीच सहन करणार नाही. असे म्हणून तो झटकन दुकानाबाहेर पडला.

एक मोठे गिऱ्हाइक गेले म्हणून दुकानदाराला फार वाईट वाटले. त्याने माळा पेटीत ठेवतां ठेवतां पाहिले दुकानदार त्या बरोबर तेथून जात असलेले दोन शिपाई आंत आले.

गोंधळून जाऊन कृष्णा बाहेर जाण्याच्या विचारांत होता. पण शिपायांनी त्याला पकडून विचारले तो काय घेण्यासाठीं आला होता. कृष्णाच्या तोडून शब्दच फुटेनात तेव्हां दुकानदार म्हणाला–"मी ह्या बांगड्यांची किंमत सांगू लागलो तेवढ्यांत रागाचे सोंग करून माझा बारा हजाराचा माल घेऊन पळाला तो बदमाश."

"अरे हे दोघे आपसांत मिळालेले असणार. थांब प्रथम ह्याचीतपासणी करूं दे." शिपायांनी त्याची तपासणी केली. त्यांना एक पैसाही मिळाला नाहीं. तेव्हा शिपाई म्हणाले–"पैसाशिवाय बांगड्या मिळतात काय? कुठे आहे तुझा तो साथीदार? काय नांव त्याचे?"

रडकुंडीस येऊन कृष्णा म्हणाला–"आम्हाला तुळशी काकूच्या बांगड्या विकायच्या होत्या म्हणून मी किंमत विचारायला आलो होतो तेवढयात तो उपटसुंबा आला आणि माळ घेऊन पळाला.





मी त्याला मुळीच ओळखत नाही. तुम्ही माझ्या भावाला विचारा. तो समोर बसला आहे. असे म्हणून त्याने बाहेर पाहिले. दुकानांतील गडबड ऐकून घाबरून राम शेजारच्या गल्लीतून पलीकडच्या मोठ्या रस्त्याला लागला होता.

"कुठे आहे तुझा भाऊ? खोटा चोर ह्या लहान वयांत हे सारे धंदे कोठून शिकलास? चल चावडीवर मुकाट्याने तेथे घेतो हजेरी चांगली." असे म्हणून त्याला शिपाई चावडीवर घेऊन गेले.

मोठ्या रस्त्याला लागल्यावर रामाने एका गाडीला थांबवले त्यांत बसला पण त्यांत एकजण बसला होता. तो म्हणाला–"अरे तुला कुठें जायचे हे तर गाडीवानाला सांगितलेच नाहीस. कुठे नेणार तो."

रामाने खोटेच सांगितले कि त्याच्या आत्याची प्रकृति बरी नाही. तिला औषध पाणी करण्यासाठी बांगड्या विकून पैसे आणायला तो शहरांत आला होता. त्याने बांगड्या गाडीतल्या माणसास दाखवल्या.

बांगड्या पाहून तो म्हणाला–"मला काय मूर्ख समजलास का काय? ह्या काही खऱ्या बांगड्या नाहीत मुलाम्याच्या आहेत. असे म्हणून त्याने त्या शेजारच्या गटारांत फेकून दिल्या.

"अरे, माझ्या बांगड्या गटारांत फेकणारा तू कोण रे? असतील त्या नकली. तुला काय त्याचे?" असे म्हणून तो त्याच्यावर तुटून पडला. दोघांच्या मारा मारींत गाडी कोलमडली गाडीवान खाली पडला. गाडीतील दोघांनी बाहेर उड्या मारल्या.

त्याच रस्त्याने कृष्णाला चावडीत नेत होते. कृष्णा शिपायांना म्हणाला–"तो पहा त्यानेच दुकानांतून हार पळवला आणि त्याच्याजवळ उभा आहे तो माझा भाऊ राम."

शिपायांनी त्या माणसाची झडती घेतली तर खरोखरच तो चोरी गेलेला हार त्यांना मिळाला. शिपायांनी दोघांनाही

पकडले आणी चावडीवर नेत असतां म्हणाले—"ह्या हाराच्या पैशावरूनच तुमचे भांडण झालेले दिसताय. तिथेही मिळालेच आहात तर."

सर्वजण कोतवाल चावडीवर पोहो-चल्यावर शिपायांनी कोतवालाला त्यांना माहिती सांगितली. कोतवालाने रामाला आणि कृष्णाला विचारले तेव्हां त्यांनी सर्व हकीकत अथपासून इतिपर्यंत सांगितली. त्याचा जाब विचारण्यासाठी त्यांच्या आई वडीलांना आणि तुळशीबाईला बोलावण्यांत आले. कोतवालाने तुळशींबाईला विचारले तर ती म्हणाली—"हो मीच माझ्या मुलाम्याच्या बांगडया त्यांना काढून दिल्या. मला पाहायचे होते ही नुसती चकाटया पिटणारी भडकणारी मुले खरच देऊळ बांधतायत कां पिंपळाखाली बसून आणखी काय करतात ते."

सर्वांच्या एकंदर सांगण्यावरून राम कृष्णा निर्दोष सुटले व शिपायांनी चोराला पकडून नेले.

तुळशीबाई वडिलांच्या समोरच राम-कृष्णांना म्हणाली—"तुम्ही खोटे बोलून माझी चेष्टा केलीत म्हणूनच मीही पण खोटया बांगडया देऊन तुमची फजीती केली. शिकलेले तुम्ही बापाच्या पैशांवर मजा मारता त्याला फसवून. लाज नाही वाटत तुम्हाला? तुम्ही एवढी पिंपळाखालची जागा साफकरून देऊळ बांधायला निघालात. आता मी सांगते. आपल्या गांवात देवळे पुष्कळ आहेत. त्या पेक्षा तुम्ही दोघे शिकलेले येथे एक मुलांची शाळा सुरू करा. तुम्ही दोघे झटून ती नीट चालवा. त्यासाठी मी तुम्हाला माझ्या खऱ्या सोन्याच्या बांगडया देते."

अपमानाने दोघेही भाऊ मनांत अगदी वरमले. त्यांनी खरोखरच मुलांची शाळा चालविण्याचे ठरविले. शेवटी खटपट करून कष्ट करून त्यांनी तुळशीबाईच्या नावाने शाळा सुरू केली. ते पाहून त्यांचे आई वडीलांना आनंद झाला. तुळशीबाईला आपल्या रागाचे सार्थक वाटले आणि गांवकऱ्यांचाही फायदा झाला.






विशालदेशच्या राजा कीर्तिसेनला प्रियंवदा नावाची एकुलती एक मुलगी होती. ती अत्यंत लावण्यवती होती. तिने राजगुरूंपासून राजकुमारीला आवश्यक असलेले सारे ज्ञान प्राप्त करून घेतले होते. परंतु तिचा जेव्हां जन्म झाला त्यावेळी राजदरबारी ज्योतिषानी तिची जन्म कुंडली करून तिच्या भविष्याच्या बाबतीत काही विचित्र प्रकारच्या गोष्टी राजाराणीला सांगितल्या होत्या.

त्या अशा होत्या एक ती एका सामान्य माणसांशी लग्न करेल व तिला सांप चावण्याची भीती आहे

राजा कीर्तिसेनचा ज्योतिषावर अत्यंत गाढ विश्वास होता राजदरबारी ज्योतिषी अत्यंत निष्णात होते व आत्ता पर्यंत त्यांनी सांगितलेल्या साऱ्या गोष्टी तंतोतंत खऱ्या ठरल्या होत्या. तेव्हां राजा व राणीने आपल्या मुलीला त्या दोन्ही गोष्टींपासून वाचविण्यासाठी उपयुक्त योजना आखण्यास सुरवात केली. ती लग्नाचे वय होईपर्यंत आपल्या मैत्रिणी व गुरुदेव ह्यांना सोडून दुसऱ्या कोणासही पाहू शकणार नाही ह्याची व्यवस्था राजवाडयात करण्यात आली.

प्रियंवदाची काळजी अशा प्रकारे घेण्यात येऊ लागली. तिला जेव्हां सोळावे वर्ष लागले. तेव्हां राजा तिच्यासाठी उपयुक्त वर शोधण्याच्या कामाला लागला. त्याला असे वाटत होते. समस्त विद्यामध्ये प्राविण्य मिळवलेला मुलगा आपला जावई व्हावयास पाहिजे.

एका पौर्णिमेच्या रात्री प्रियंवदा एकटीच राजोद्यानात फिरावयास निघाली. इकडे तिकडे फिरत असतांना अचानक एका झाडापाठीमागून एक काळा नागसांप



फुसफुसत बाहेर पडला. परंतु प्रियंवदाचे तिकडे लक्ष नव्हते. ती चमेलीच्या फुलांच्या वासात धुंद होऊन गेली होती. तिने हातातील फुले वास घेऊन बाजूला फेकली. ती बरोबर त्या नागसापाच्या डोक्यावर पडली. त्याने तावडतोब फणा विस्फारून फुसफुस असा ध्वनी काढला तो ऐकून राजकुमारी इकडे तिकडे पाहू लागली तेव्हां तिला समोर एक काळा नागसाप फणा उभारून बसलेला दिसला. तिच्या अंगाला कापरे भरले.. नागाने पुन्हां आपला फणा काढून राजकुमारीकडे पाहिले आणि तिच्या रोखाने सरसर् करीत निघाला. राजकुमारीने पळण्याचा विचार मनात आणला परंतु तिला जमले नाही. व ती किंचाळून ओरडली.

दुसऱ्या क्षणी तो आवाज ऐकून राजाचा एक सेवक धावत तेथे येऊन पोहोचला व नागाला खेचून शेपटी पकडली व हवेत गरगर फिरवून त्याला आपटून मारले.

राजकुमारीने स्वतःला सांवरले व ती त्या नोकराकडे विस्मयाने पाहू लागली. तो एक तरुण मुलगा होता. दिसायला रूपवान सुंदर होता. राजकुमारीने अद्याप पावेतो अशा सुंदर दिसणाऱ्या तरुणाला कधी पाहिलेले नव्हते. त्याच बरोबर तिला एक गोष्ट समजली नाही की आपण किंकाळी फोडता क्षणी हा तरुण नोकर इथे धावत कसा काय आला!

प्रियंवदाने त्याला विचारले—"सांग, तू कोण आहेस?"

"राजकुमारी, मी आपला सेवक आहे. ह्या राजोद्यानाचा पहारेकरी." त्याने उत्तर देत म्हटले. राजकुमारीने त्याला कधीही पाहिले नव्हते परंतु त्या सेवकाने लांबून राजकुमारीला बरेचदा पाहिले होते.

"तू नेमक्यावेळी येऊन माझे प्राण वाचविलेस सांग तुला काय हवे आहे?" राजकुमारीने त्या तरुण सेवकाला विचारले.

"राजकुमारी, माझी काही इच्छा नाही!" पहारेकरी म्हणाला.



"ह्या जगात कोणत्याही गोष्टीची अभिलाषा बाळगणारा असत नाही. तू संकोच करू नको. तुझ्या मनांत जे येईल ती गोष्ट स्पष्टपणे सांगून टाक." प्रियंवदा पुन्हां म्हणाली.

"माणसाच्या मनांत स्वर्ग व देव हे दोन्ही पहाण्याची फार इच्छा असते. परंतु त्या कामनांची कोणीतरी आत्तापर्यंत पूर्ती करू शकला आहे कां?" पहारेकऱ्याने विचारले.

"पण काय तुझी तशी काही इच्छा नाही कां की मी ती पूर्ण करू शकेन?" प्रियंवदा म्हणाली.

"तू तर माझ्या कामनांची पूर्ती करशिल परंतु ती तू करणार नाहीस. आणि ती इच्छा मान्य करावयास तयार झालीस तर मला त्या गोष्टीला नकार द्यावा लागेल." तो म्हणाला.

"सांग, अशी तुझी इच्छा तरी काय आहे?" त्याचे बोलणे ऐकून आश्चर्यकरीत तिने त्याला विचारले.

"राजकुमारी, माझे तुमच्यावर प्रेम आहे. परंतु आपला विवाह होणे अशक्य कारण राजाला जर ह्या गोष्टीचा सुगावा लागला तर ते माझी मान एका झटक्यात कापून टाकतील. पण खरोखरी मी तुमच्यावर माझ्या प्राणापेक्षा जास्त प्रेम



करतो. जर मी जिवंत राहिलो तर रोजच्या रोज तुम्हांला पाहू तरी शकेन." राजसेवक म्हणाला.

त्या नोकराची इच्छा ऐकून तिला अत्यंत आश्चर्य वाटले, ती विचार करू लागली. की त्या नोकराने तर खरी गोष्ट सांगितली. त्याच्या बरोबर लग्न होणे हे असंभव आहे. त्यामुळे आपण तर त्याच्या इच्छा पूर्ण करू शकणार नाही. आणि ही गोष्ट जर कां आपल्या वडिलांना समजली तर ते फक्त संतापणार नाहीत तर त्या सेवकाची मान छाटून टाकतील. तेव्हां ह्याला उपाय काय? प्रियंवदा चिंतामग्न होत म्हणाली—"आज पर्यंत मी मला फार मोठी



समजत होते. पण व्यर्थ माझ्यावर उपकार करणाऱ्याची परतफेड सुद्धा मला करता येत नाही. मला क्षमा कर."

"राजकुमारी तुम्ही माझी क्षमा मागण्यासाठी मी तुमच्यावर काही उपकार केले असतील तर नां! मी तर आपला सेवक आहे. आपले रक्षण करणे हे तर माझे कर्तव्य आहे." नोकर म्हणाला.

ह्यानंतर मोठ्या कष्टाने राजकुमारी राजोद्यानातून अंतपुरात परत आली. त्याचवेळी कीर्तिसेन राजा राणीला एकांतात काहीतरी सांगत होता. तिच्या लक्षात आले की आपले आईवडील आपल्या संबंधीच बोलत आहेत. म्हणून ती तेथील एका पडद्याच्या आडोशाला लपून त्यांचा संवाद ऐकू लागली.

"प्रियंवदाचा विवाह होणे म्हणजे एक कठीण कार्य आहे." राजा म्हणाला.

"होय हो! मला तर समजेनासे झाले? तिची जन्मकुंडली पाहिली तर तिचा विवाह एका सामान्य व्यक्तिशी होणार हें नक्की. आपल्या दरबारी ज्योतिषांची भविष्यवाणी अद्यापखोटी ठरली नाही." राणी म्हणाली.

आपल्या आईवडिलांचा संवाद ऐकून प्रियंवदाला एका गोष्टीचा उलगडा झाला की, आपली जन्मकुंडली पाहून राजदरबारी ज्योतिषाने आपला विवाह एका सामान्य व्यक्तिशी होणार हे सांगितले ते राजाराणीला अजिबात पसंत नव्हते.

आता आपण उपवर झालो आहोत आणि उद्यानात तर एका सामान्य व्यक्तिनें सापांच्या दंशापासून आपले संरक्षण करून आपले प्राण बांचविले आहेत व त्या व्यक्तिने आपल्याशी विवाह करण्याची इच्छा बोलून दाखविली आहे. म्हणजे एका अर्थानें ज्योतिषाने केलेले भविष्य ह्या गोष्टीपर्यंत तरी सर्व बरोबर चाललेले आहे.

प्रियंवदा दिवसभर ह्याच एका विचारात गुंग होती. जर कां आपल्या जन्मकुंडलीत असे लिहिले असेल की, आपला विवाह एका सामान्य व्यक्तिशी होणार तर एका अर्थी ही गोष्ट खरी ठरणारीच वाटते तेव्हां आपल्यावर उपकार करणाऱ्या व्यक्तिशी विवाह केला तर ह्यात गैर वाटण्यासारखे असे काय आहे? प्रियंवदाने ठरवले की, ह्या राजसेवकाशी विवाह करणें जास्त चांगले पण आता ही गोष्ट आईवडीलांच्या कानांवर कशा तऱ्हेने घालावयाची?"

प्रियंवदा असा विचार करीत असतांनाच त्या वेळी राजदरबारी ज्योतिषी तेथ आले. तेव्हां राजाराणीने ज्योतिषाबरोबर बराच वेळ काही गुप्तगू केल व त्यांचा निर्णय ऐकून ती भयंकर घाबरली.

त्या तिघांची योजना अशा तऱ्हेची होती की कोणत्यातरी एका साधारण माणसाला पकडून आणून त्याच्याशी राजकुमारीचा विवाह लावून द्यावयाचा लग्न झाल्यानंतर त्या व्यक्तिवर विषप्रयोग करून त्याला ठार मारावयाचे व नंतर पुन्हां राजकुमारीचे लग्न एक उत्तम राजकुमाराशी मोठ्या थाटामाटात लावून द्यावयाचे.

आता प्रियंवदाला एका गोष्टीचा उलगडा झाला. की जर कां एका बागेच्या पहारेकऱ्याबरोबर आपला विवाह झाला तर तो आईवडिलांना मान्य होईल परंतु आपले लग्न लागल्या बरोबर ते त्याला ठार मारून टाकतील ह्यापेक्षा मोठे पाप ते काय असू शकेल?"

त्याच दिवशी सायंकाळी प्रियंवदा एकटीच राजोद्यानात गेली व त्या पहारेकऱ्याला बोलावून घेऊन म्हणाली– "अहो, मी तुम्हांला तुमचे नांव विचारणें विसरून गेले सांगा."

"माझे नाव विजय आहे." त्या तरुण पहारेकऱ्याने म्हटले.

झटक्यात प्रियंवदा त्याला म्हणाली–"हे बघ, विजय आपण दोघे विवाह करू."

"राजकुमारी मी हे असे करू शकत नाही मला भय वाटते." विजय म्हणाला.

"मी तुला अशी एक गोष्ट सांगेन की त्यांपासून अजिबात काही संकट उभे रहाणार नाही." प्रियंवदा म्हणाली.



# ज्योतिषाची निवड

पुष्पपुर राज दरबारातील ज्योतिषाची जागा रिकामी होती व राजाने त्या पदाकरीता एका प्रसिद्ध ज्योतिषाला देण्याचे योजले होते. परंतु त्यासाठी राज्यातील काही प्रतिष्ठीत प्रसिद्ध ज्योतिषांना सुद्धा बोलावण्यात आले. काहींची परिक्षा घेण्यात आली. त्यांच्यापैकीं पांच पंडीत श्रेष्ठ विद्वान म्हणून निवडले.

राजाने त्या पांच जणांपैकी एकेकाला बोलावून विचारले–"सांगा, आपल्या जन्मकुंडली प्रमाणे आपण दरबारी ज्योतिषी बनण्याची कामना करता ?"

त्यावर पांचीही पंडीत ज्योतिषांनी उत्तर देत म्हटले–"असाच तर आमच्या कुंडलीत योग आहे म्हणून तर इथे आलो."

राजाला गहन प्रश्न पडला की, ह्या पांच पंडितांपैकी कोणातरी एकाला राजदरबारी ज्योतिषाच्या जागेकरीता निवडावयाचे म्हणजे चौघांचे भविष्य-खोट सिद्ध व्हावयास पाहिजे ह्याचा अर्थ ते ज्योतिषशास्त्रात म्हणजे पंडीत नाहीत तेव्हां ह्यातील श्रेष्ठ ज्योतिषी कोण ?

मंत्र्याने राजाच्या मनातील खळबळ जाणून म्हटले–"आपण ह्या मधील कोणाही एकाला दरबारी ज्योतिषी म्हणून नियुक्त करा. त्यानंतर मी आपल्या शंकाचे समाधान करतो.

राजाने रामशास्त्रीला नियुक्त केले व त्याची सुचना त्यांनी मंत्र्याला दिली.

त्यावर मंत्र्याने इतक्यात उत्तर देत म्हटले–"महाराज, ह्या पांचही ज्योतिषाच्या मधे रामशास्त्री ज्योतिषशास्त्रात निष्णात पंडीत आहे.

"ह्या गोष्टीला कोणते प्रमाण" राजाने विचारले.

"होणाऱ्या ह्या पांच ज्योतिषांपैकी रामशास्त्रीचे ज्योतिषच खरे सिद्ध झाले" मंत्री मंदहास्य करीत म्हणाले.







## वजनाच्या दुप्पट आहार

जन्म घेतल्या बरोबर एका महिन्याच्या आत किवीच्या पिल्लाचे वजन जवळपास ३४० ग्रॅम असते. तो पक्षी २४ तासाच्या आत जवळजवळ ८०० किडे खातो म्हणजे ह्याचा अर्थ तो स्वतःच्या शरीराच्या वजनाच्या तिप्पट वजनाच्या किड्यांना पकडून खातो.

## खोल नदी

चिन देशातील यांगूट्से नदी ही जगातील सर्व नद्यामधे जास्त खोल नदी आहे. खडकाळ पर्वतातून वहात येत असलेली नदी हिची खोली ६०० फूट आहे



## राक्षस माश्या



२२ इंच लांब पंख असलेल्या राक्षसी माश्या ३०० मिलीयन वर्षांपूर्वी जमिनीच्या वरवर भागावर उडत. सर्वात प्रथम पक्षी जन्मापूर्वी १५० मिलियन वर्षांपूर्वी ह्या माश्या होत्या.












# चांदोबा

ऑक्टोबर 1987



## अनुक्रमणिका






एक प्रत : २-५०

वार्षिक वर्गणी : ३०-००


# चांदोबा


संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी


आपल्या देशाच्या कानाकोपऱ्यांतून वसलेल्या गावांतल्या लोकांच्या समस्या काय असतात व त्या कशा प्रकारे दूर करता येतील—या गोष्टी समजून घेण्याची संधी राजधानींत राहून शासन करणाऱ्या अधिकाऱ्यांना क्वचितच मिळते. अधिकारी या बाबतीतलें आपले कर्तव्य विसरून जातात व त्यामुळे काय परिणाम होतात याचें ज्ञान आपल्याला "राज-दर्शन" या गोष्टीद्वारे होऊं शकेल.

### अमर वाणी

**उत्तमः क्लेशविक्षोभं, क्षमः शोढुं न हीतरः ।**
**मणिरेव महाशाणघर्षणं, न तु मृत्कणः ।।**

[केवल उत्तम व्यक्तीच संकटे, हानि आणि दुःखाला धैर्याने तोंड देऊ शकतात. सामान्य माणसांना हे शक्य नाहीं. धारेच्या दगडावर केवल हिराच टिकू शकतो, मातीचे ढेकूळ नाहीं.]





वर्ष : ३७ ऑक्टोबर १९८७ अंक : ४

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००

## चांदोबातील



### उडणाऱ्या आगगाड्या

हवेतून चालणाऱ्या आगगाड्यांचा उपयोग जपानमध्ये केला जाणार आहे. या गाड्यांना हवेत उडण्याकरता पंख किंवा प्रॉपेलर सारखी यांत्रिक साधने लावलेली नसतील. केवळ चुंबकीय शक्तिच्या आधारानेच या गाड्या चालतील.

### ३००० वर्षांपूर्वी लंगर

तमिळ विश्वविद्यालयाशी संबंधित, अर्न्तागत पुरातत्त्व शाखेच्या सदस्यांना मन्नार खाडीच्या पलीकडील भागात नुकताच एक लंगर सापडला आहे. जवळ जवळ एक टन वजनाच्या या लंगराचा उपयोग नाविक लोक ३००० वर्षांपूर्वी करीत असत असे समजते.





### उडणाऱ्या अज्ञात तबकड्या

चीनच्या सेंट्रल श्चुवन प्रांतात बदामी रंगाच्या तबकड्या आकाशांत उडताना दिसल्या. वीस पेक्षाही अधिक लोकांनी ४० मिनिटेपर्यंत हे दृश्य मोठ्या आश्चर्याने पाहिले.

### किल्ल्यात सापडलेल्या सुवर्णमुद्रा

तिरुपति जवळच्या चंद्रगिरी नावाच्या किल्ल्यात १२ वर्षाचा एक मुलगा जमीन खोदत असताना त्याला सुवर्णमुद्रांनी भरलेला हंडा सापडला. त्याने तावडतोब ही बातमी पोलीस स्टेशनला कळवली. ही नाणी विजयनगर साम्राज्य काळातील आहेत असे समजते.













# कंथ

कण्व मुनींचा पुत्र कंथ याने गोमतीच्या तीरावर तपस्या सुरु केली. कंथाच्या कठोर तपस्येत विघ्न आणण्यासाठी इन्द्राने प्रमलोचना नावाचा एका अप्सरेस पाठवून दिले. तिच्या सौंदर्याने मोहित होऊन कंथाने तिच्याशी विवाह केला.

अप्सरेच्या सहवासात दिवस, महिने, वर्षे भराभर उडून गेली. विलासमय जीवनात कंथाला आपल्या जप-तपाचे पूर्णतः विस्मरण झाले.

एके दिवशी संध्याकाळी कंथ एका टेकडीवर एकटाच बसून सूर्यास्ताचे दृश्य अनिमेष नेत्रांनीं पहात होता. अचानक त्याला आठवण झाली की ही तर संध्यावंदनाची व ध्यानाची वेळ! तो लगबगीने उठला व ध्यानाला बसण्यासाठी मृगाजीन शोधू लागला. त्याचवेळी प्रमलोचनाही तेथे येऊन पोचली व कंथाची धडपड पाहून खळखळून हसू लागली. कंथाने आश्चर्याने विचारले, "तुझ्या हसण्याचें कारण काय?"

"आज शेकडो वर्षांनीं तुम्हाला जप-तपाची आठवण आली!" अप्सरेने म्हटले.

"शेकडो वर्षे?" कंथाने चकित होऊन विचारले.

होय. आपण जप-तप सोडून माझ्याशी विवाह केला; त्याला नऊशे वर्षे, सहा महिने आणि तीन दिवस इतका काळ लोटला." हसून तिने म्हटले.

कंथानें शरमेने मान खाली घातली आपला अमूल्य ठेवा नाहीसा झाल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला आणि तेथल्या एक प्रसन्न वनात जाऊन तो पुन्हा ध्यानमग्न झाला.

यानंतर मात्र कोणत्याही भौतिक सुखाला बळी न पडता कंथाने तपःसामर्थ्याने सिद्धि प्राप्त केली.





# राज-दर्शन

रामगिरिचा श्रीपति केवल नावाचाच 'श्री-पति' (श्रीमंत) होता. चार-पाच घरी लहान-मोठी कामे करून जे काही मिळेल त्यात तो आपला उदर-निर्वाह करीत असे.

त्याच गावचा शिवनाथ नावाचा एक कलाकार राजधानीत जाऊन आपल्या कलेचे प्रदर्शन करून परत आला. जाताना तो अगदी सामान्य माणूस होता आणि परतला तो एकदम धनवान् बनून!

हे पाहून श्रीपतिला आश्चर्य वाटले आणि शिवनाथला भेटून त्याने राजाबद्दल चौकशी केली.

शिवनाथ मोठ्या प्रसन्नतेने म्हणाला– "आपल्या देशाचा राजा म्हणजे साक्षात अवतारी पुरुष आहे. महाराज हातात खड्ग घेऊन उभे ठाकले म्हणजे मदांध राक्षसही त्यांच्यापुढून पळून जातात, त्यांच्या ऐश्वर्य-संपन्नतेत कुबेरही मागे पडेल आणि त्यांच्या दानशूरतेपुढे शिबी, बली, आणि कर्ण सुद्धा फिके पडतील! सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपल्या प्रजेच्या. कल्याणाशिवाय दुसरा कोणताही विचार त्यांच्या मनात येत नाही."

श्रीपतीला वाटलं–शिवनाथची जन्म-कुंडली एकाच दिवसांत बदलून टाकणाऱ्या राजाविषयीच्या या सर्व गोष्टी खऱ्याच असल्या पाहिजेत. नंतर तो याबाबतीत अनेक लोकांशी बोलला. त्यामुळे लोकांकडून त्याला राजाबद्दल आणखीही अनेक चांगल्या गोष्टी कळल्या.

महाराज प्रजेसाठी अनेक कल्याणकारी कामे करीत आहेत. ज्या प्रदेशात पिकांचे नुकसान झाले किंवा जेथे पिके आलीच नाहीत, तेथील दुष्काळपीडितांना धान्य फुकट वाटले जाते. गोर-गरीबाच्या झोपड्या दुरुस्त करून दिल्या जातात.



त्यांच्या अडचणींची राजा सतत चौकशी करीत असतो आणि त्या दूर करीत असतो. देशांतील गरिबी दूर करण्याचा त्यांनी विडाच उचलला आहे.

दुसऱ्यांच्या आश्रयावर जगणारा श्रीपति आतापर्यंत या गोष्टीत अनभिज्ञ होता, परंतु या बातम्या कळल्यानंतर मात्र त्याच्या मनात राजाला भेटायची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. बास, त्या दिवसापासून श्रीपति आपल्या प्रवासासाठी पैसे जमवू लागला—यासाठी तो कधीकधी उपासही करी.

एक वर्षानंतर अखेर एक दिवशी खांद्यावर छोटेसं गाठोडं घेतलेला श्रीपति राजधानीत हजर झाला. त्याने पहारेकऱ्यांना राजाची भेट घडवण्याबद्दल विनवले. पण पहारेकरी हंसून म्हणाले—"महाराज तुझ्यासारख्या लोकांना भेटण्यासाठी आपला वेळ खर्चू लागले तर राज्यशासनाचे बारा वाजतील!"

"मी फक्त एकदा त्यांचे केवल दर्शनच घेईन, त्यांच्याकडे मला कांहीं मागायचे नाहीं" श्रीपति म्हणला.

तरीसुद्धा पहारेकऱ्यांनी त्याला राजमहालात जाऊ दिले नाही. निराश होऊन श्रीपति तेथून परत निघाला. त्याची ही विचित्र परिस्थिती पाहून एक नागरीक त्याला म्हणाला—"तू घाईत आपल्या गावी निघून जाऊ नकोस. तू रोज महालात सोडण्यासाठी या पहारेकऱ्यांची याचना करत रहा. केव्हा न केव्हा तरी तुला यश मिळेलच."

हे ऐकून श्रीपतीने निश्चय केला की राजदर्शन झाल्याशिवाय आतां आपल्या गावाकडे परतायचेच नाही.

परंतु त्याच रात्री त्याच्यापुढे एक कठीण समस्या उभी राहिली—आपल्या गांवात असताना कोणत्याही घराच्या कट्ट्यावर झोपून तो रात्र काढत असे. आता इथे राजधानीत काय करावे? कोणत्याही गल्लीत शिरले तरी तेथील पहारेकरी कुणा अज्ञात माणसाला गल्लीत झोपू देईनात! श्रीपतिने त्यांना आपली अडचण सांगितली.

"अनोळखी माणसांना आम्ही घरांच्या कट्ट्यावर झोंपू दिले तर आमच्या पहारा करण्याला कांहीं अर्थंच उरत नाही. तुझ्यासारख्यांना राहण्यासाठी धर्मशाळा, खाणावळी आहेत. परंतु आत्ता मध्यरात्री तिथे प्रवेश मिळणेंही कठीण! कोणत्याही वेळी आश्रय देणारी धर्मशाळा नगराच्या प्रवेशद्वारी आहे. तू आता तेथेच जा." एका पहारेकऱ्याने त्याला सांगितले.

त्या धर्मशाळेकडे जाण्याचा रस्ता विचारून श्रीपति चालू लागला. परंतु गल्ल्या पार करता करता तो रस्ता चुकला आणि आणखी इकडे-तिकडे चकरा मारून तो एका मैदानात पोचला.

इथेच थोडासा आराम करावा असा विचार तो करतो आहे तोंच कुठूनसा एक माणूस तिथे टपकला! त्याने विचारले—"तू कोण आहेस? अर्ध्या रात्री इथे काय करीत आहेस?"

श्रीपतीने त्याला आपला सर्व वृत्तान्त सांगितला. तो आगंतुक माणूस म्हणाला—"राजाचे दर्शन घेण्यासाठी तू इतक्या कष्टाने इथे आलास. परंतु आत्ता तू जसा भटकत आहेस ते पहातां मला तुझा संशय



येतो आहे—तू चोर असावास! तुझं गाठोड उघडून दाखव पाहूं."

थोडा सुद्धा संकोच न करता श्रीपतीने गाठोड त्याच्यासमोर उघडलं. गाठोड्यात चांगल्या श्रीमंतांनी वापरावेत असे किमती कपडे आणि चमकणारे जोडे होते.

त्या माणसाने श्रीपतीच्या जुन्या-पुराण्या फाटक्या कपड्यांतल्या अवताराकडे निरखून पहात कठोर शब्दात विचारले—"तू नक्कीच हे चोरून आणले आहेस. या वस्तु तुझ्या असूच शकत नाहीत."

"एक वर्षभर मेहनत करून, भूक मारूनही मी पैसे जमवले आणि त्यांतूनच मी हे सर्व घेतले. मी कुठेही



चोरी केली नाही." दीन स्वराने श्रीपती म्हणाला.

"मग हे कपडे अन् जोडे तू घातले का नाहीस?" त्या व्यक्तिने पुन्हां विचारले.

"राजाच्या दर्शनासाठी मी हे सुरक्षित ठेवलेत. पहारेकरी महालात जायची परवानगी देतील तर मी पटकन हे कपडे चढवून आत जाईन."

"अगोदरपासून तू हे का घालू शकत नाहीस?" त्या माणसाने आश्चर्याने विचारले.

"आधीपासून घालून कपडे चुरगळून गेले असते." श्रीपती म्हणाला.

"तू राजाला भेटू इच्छितोस, परंतु राजा ती नाकारत आहे, अशा परिस्थितीत आता तुला या किंमती कपड्यांचा काय उपयोग? तू नक्कीच काहीतरी लपवत आहेस."

श्रीपती थोडा वेळ मान खाली घालून गप्प राहिला, नंतर म्हणाला–"या देशाचा राजा अवतारी पुरुष आहे. प्रजेच्या कल्याणसाठी तो अनेक उपयुक्त गोष्टी करीत आहे. त्यांना माहित असणाऱ्या सर्व प्रकारच्या गरीबांसाठी निरनिराळे कायदे करून त्यांना मदत करतो. पण माझ्या-सारख्या कांही गरीबांची माहिती त्यांना नाही. अशा परिस्थितीत मला पाहिल्यावर त्यांना दुःख वाटेल. मी त्यांना दिसलो तरी त्यांना माझी गरीबी कळू नये–अशी माझी इच्छा आहे. म्हणूनच मी ही वस्त्रे गाठोड्यात घेऊन आलो आहे."

"पण आता तर तुला जे घडू नये असे वाटत होते ते घडले आहे. तू मला असाच दिसला आहेस. मीच या देशाचा राजा!" त्या व्यक्तीने म्हटले.

"प्रभु! आपण महाराज? माझा जन्म धन्य झाला. माझा माझ्या भाग्यावर विश्वासच बसत नाही...पण आपण...मध्य-रात्री या नगरात पायी का फिरत आहात?"

"प्रजेचे माझ्या बाबतीत काय मत आहे हे कळावे म्हणून मी पुष्कळदा वेष बदलून शहरात फिरतो. आज तुला भेटून मला फार आनंद झाला. तुला उद्या पहारेकरी महालात सोडतील. तू जरूर येऊन मला भेट. तुला चांगलीशी भेट देऊन मी तुझी गरीबी दूर करीन."

यावर श्रीपती काहीही बोलला नाही. राजा त्याला म्हणाला–"मी स्वतःच तुझी गरीबी पाहिली आहे. पण माझ्या मंत्री अन् दरबारी लोकांनीही ती पहावी अशी माझी इच्छा आहे. म्हणूनच मी तुझी ही मौल्यवान वस्त्रे बरोबर घेऊन जातो." हे बोलत बोलत राजा ते गाठोड घेऊन निघून गेला.

दुसऱ्या दिवशी राजाने दरबारात श्रीपतीची खूप वाट पाहिली, पण तो आलाच नाही. पहारेकऱ्या कडूनही असे कळले की तो तिकडे फिरकलाच नाही. शेवटी राजाने शिपाई पाठवून त्याला शोधून आणले.

श्रीपती विनयपूर्वक म्हणाला–"प्रभु, मी मुद्दाम आपल्या दर्शनासाठी इथे येऊ इच्छित होतो, पण त्यापूर्वीच मला आपले दर्शन मिळाले. मला फार आनंद झाला. आपल्याकडून भेट वस्तूंची मला अपेक्षा नाही. माझी वस्त्रे आपणाकडे आहेत, पण आतां आपलं दर्शन घडल्यानंतर मला त्यांची गरज नाही. तेव्हां ती परत मिळवण्यासाठी आपणाकडे येण्याचं मला कारणच नव्हतं." म्हणून आपण बोलावून सुद्धा मी आज आलो नाहीं.

"तुझ्या वर्तनावरून मी ओळखले की तुझ्यात स्वार्थाचा लवलेश नाही. तुझ्यामुळे मला माझ्या शासनातील कांहीं चुका समजून आल्या आणि हे ही कळून चुकले की जनता व मी यांच्या परस्परसंबंधात माझेच पहारेकरी कशी बाधा आणतात! आणि यासाठीच मी तुझे अभिनंदन करतो." असे म्हणून चांगला नजराणा देऊन राजाने श्रीपतीची पाठवणी केली.

यानंतर श्रीपतीची गरीबी संपली आणि त्याबरोबर हळूहळू संपूर्ण राज्यांतील गरीबीचेही उच्चाटन केले गेले.












# नशीबाची परीक्षा

सोमनाथपुरला ईश्वरवर्मा नावाचे एक जमीनदार होते. त्यांच्या कचेरीत कामासाठी एका कारकुनाची जरूरी होती. ही बातमी कळताच त्या जागेसाठी पंधरा तरुण जमीनदाराकडे येऊन पोचले.

जमीनदार त्यांना म्हणाला–"या जागेसाठी इतकी जणं याल अशी माझी अपेक्षा नव्हती. ठीक आहे, आता ऐका–झाकण लावून बन्द केलेली दहा भांडी आता तुमच्या पुढे ठेवली जातील. त्यापैकी एका भांड्यात एक सोन्याचे नाणे असेल. जो ते भांड बरोबर ओळखील त्याला ही नोकरी मिळेल. पाहूं या, नशीब कोणाच्या गळयात माळ घालतंय."

थोड्याच वेळात नोकरांनी या तरुणांसमोर थोड्या अंतरावर दहा झाकलेले घडे आणून ठेवले. त्याच्या पुढील बाजूला एक पडदा लावलेला होता. पडद्यामागे खुर्चीवर जमीनदार येऊन बसला. कोणी कोणता घडा उघडून बघितला हे पडद्यापलीकडे असणाऱ्यांपैकी कोणालाच कळणार नव्हते. केवल जमीनदारच ते पाहू शकत होता.

यानंतर एकेकजण पडद्यामागे जाऊ लागला. प्रत्येकाने कोणता तरी एक घडा निवडून उघडून पाहिला. कोणलाच नाणें मिळाले नाही. या प्रकारे चौदाजण हात हलवत परत आले.

परंतु नोकरीच्या आशेने आलेला रामरतन नावाचा एक युवक मात्र हा सर्व प्रकार उद्विग्नतेने पहात दूर उभा होता.

तो मनातल्या मनात म्हणाला–हा सर्व प्रकार काही विलक्षण दिसतो आहे. अशा प्रकारे नशीब आजमावून कारकून निवडणे योग्य आहे का? मानसाची योग्यता पाहण्याची ही कसली अजब रीत!

जमीनदाराने त्याच्याकडे निरखून पहात म्हटले–"तूही नोकरीं पहायलाच आलेला आहेस ना? मग तू असा नुसता पहात काय उभा राहिलास? तूही आपलं नशीब आजमावून पहा नं."

यावर रामरतन म्हणाला–"महाराज, या दहा घड्यांपैकी एकात नाणे ठेवून आमचं नशीब आजमावायचं याचा अर्थ असा की–दहा वेळा प्रयत्न केल्यास एकदा नक्की संधी आहे. आपण ज्या नशीबाची गोष्ट बोलत आहात ते बहुधा कोणाच्याच नशिबी नाही. यामुळेच आपल्यासारखा अनुभवी माणूस अशा प्रकारे नशीबाची परीक्षा करवून आपला कारकून निवडेल यावर माझा विश्वास नाही."

यावर हसून जमीनदाराने विचारले–"तर तुला काय वाटत, मी हे सर्व गंमत म्हणून केलं आहे?"

"महाराज, मला असे वाटते की नोकरीसाठी आलेल्या उमेदवारांच्या बुद्धीची व स्वभावाची परीक्षा करण्यासाठीच आपण हा प्रकार घडवून आणला. माझ्या मते या एकाही घड्यात नाणे नाही! आपण खरोखरीच काही काम देत असाल तर मी करीन, परंतु अशा प्रकारे नशीबावर विश्वास ठेऊन काही मी इथे आलो नाही." रामरतनने उत्तर दिले.

"म्हणजे तू घड्यांतून नाणे काढायचा प्रयत्न करणार नाहीस असेच ना?" जमीनदाराने विचारले.

"माफ करा. असल्या नशीबावर माझा विश्वास नाही." रामरतनने स्पष्टच सांगितले.

हे ऐकून जमीनदार खूष होऊन म्हणाला–"तुझा स्पष्टवक्तेपणा मला फार आवडला. तुझ्या धीटपणाची ही मी दाद देतो. खरोखरच यापैकी एकाही भांड्यात नाणे नाही. मी ही परीक्षा अशा विश्वासाने ठेवली की तुमच्यापैकी कोणीतरी असल्या नशीबापेक्षा स्वतःच्या बुद्धिबळावर विश्वास ठेवणारा निघेल. तेव्हा आता उद्यापासूनच तू कामाला लाग."



# औषधाचा परिणाम

नवविवाहित दांपत्य–मंगलनाथ आणि गौरी यांनी गांवाच्या शेवटाला असलेलें एक घर भाड्यानें घेतले आणि गृहस्थाश्रमाचा ओनामा केला. ते दोघेही असे सूर्यवंशी की सूर्य चांगला वर आल्याशिवाय ते झोपेतून जागेच होत नसत. आणि शेतीच्या कामावर जाणे मंगलनाथला शक्य होत नसे.

एके दिवशी आपली ही समस्या मंगलनाथने आपला मित्र रंगनाथ याला सांगितली. रंगनाथने सल्ला दिला–"इथे एक वैद्य 'चलपती' आहे. त्याला जाऊन भेट. तो कांही औषध देईल."

चलपतीने हकीकत ऐकून घेऊन गोळ्यांची एक पुडी मंगलनाथच्या हातावर ठेवत म्हटले–"या गोळ्या तुम्ही दोघंही झोपण्यापूर्वी घ्या. दोघेही सूर्योदयापूर्वी असे धडपडून उठाल की जसे कांही तुम्हाला कोणी पाठीवर थापट्या मारून उठवत आहे."

त्या रात्री मंगलनाथ आणि गौरी गोळ्या घेऊन झोपले. ते जेव्हा जागे झाले तेव्हा अजून सूर्योदयाला अवकाश आहे असें त्यांच्या लक्षात आले. अंग अजून जड वाटत असलं तरी दोघेही प्रसन्नतेने उठून सकाळच्या उद्योगाला लागले. स्नान वगैरे उरकून सकाळी लवकरच मंगलनाथ घराबाहेर पडला.

वाटेत त्याला रंगनाथ भेटला. त्याने एकदम मंगलनाथला विचारले–"अरे होतास कुठे दोन दिवस तू ? कुठे दिसला नाहीस तो ? गावाला वगैरे गेला होतास काय ?"

यावर खरे काय घडले ते लक्षात घेऊन मंगलनाथला स्वतःचीच लाज वाटली.






[१६]

[व्याघ्रचर्मधारी, उग्रदत्त व त्याचे मित्र रुद्र-अरुद्र यांच्यासह त्या भयानक पक्ष्यांवर बसून अग्निद्वीपाकडे निघाले. आकाशांत त्यांना अस्वल चर्मधाऱ्यांशी सामना द्यावा लागला. उग्रदत्त ज्यावर बसला होता तो पक्षी एका पहाडावर उतरला. यानंतर काही अस्वल-चर्मधारी उग्रदत्ताला बरोबर घेऊन एका गुप्त भुयारांतून जाऊ लागले......पुढे वाचा.]

अस्वल-चर्मधारी भुयाराचे दार बंद दाखवील." असे म्हणून एकाने आपण केल्याबरोबर आत गडद अंधार पांघरलेल्या कातड्यातून एक लखलखणारा

ाकी दोघांनी

पसरला. उग्रदत्ताने पुढे जाण्यासाठी टाकलेले मणी काढला. त्याबरोबर

घसरले. परंतु एका
त्याचा खांदा पकडून
डू दिले नाही. "घाई
बीस पायऱ्या उतरल्यावर
ा तळाशी पोचू. पहा,
ता हा प्रकाश रस्ता

आपापले मणी काढून त्यांच्या प्रकाशात ते पायऱ्या उतरू लागले. चर्मधाऱ्यांच्या हातांतले ते दिव्य मणी (हिरे) पाहून उग्रदत्ताला आश्चर्य वाटले. अंधारात रस्ता पहाण्यासाठी मशाल, किंवा मेण-बत्यांचा उपयोग करणेही यांना माहीत

पाऊल एकदम
अस्वलचर्मधाऱ्यां
त्याला खाली
करू नको. आता
आपण भुयाराच्
आपल्याला आ













नसावे, म्हणून त्या ऐवजी हे लोक अमोल रत्नांचा उपयोग करीत असावे–असे त्याला वाटले.

"या द्वीपावर तेल मिळत नाही का? उजेडासाठी या रत्नांशिवाय दुसरे काही साधनच नाही काय?" उग्रदत्ताने विचारले.

"तेल? ही काय चीज आहे बुवा? हां, इथे गुलाम म्हणून आलेल्या तुझ्या देशांतल्या लोकाकडून मी हे नाव ऐकले खरे! आणि प्रकाशासाठीं तेलाचा उपयोग कसा करतात? दिवा नांवाची एक वस्तु ही तुम्ही लोक वापरता. आम्ही प्रकाशासाठी तेल वापरीत नाहीं. रत्ने म्हणजेच आमचे दिवे!" एकजण म्हणाला.

उग्रदत्ताने विचार केला–हे द्वीप विचित्रच असले पाहिजे. इतक्यात त्याला व्याघ्रचर्मधाऱ्यांच्या तावडीत सापडलेले आपले मित्र रुद्र-अरुद्र आणि सामन्त राजा सुदर्शनाची कन्या चन्द्रसेना यांची आठवण झाली.

रुद्र-अरुद्र यांची काय अवस्था असेल कोणास ठाऊक! बिचाऱ्यांचे खूपच हाल होत असतील व्याघ्रचर्मधाऱ्यांनी त्यांचा छळ मांडला असेल. त्यांना जेवण ही मिळत नसेल. खूप काबाड-कष्ट उपसावे लागत असतील त्यांना.

आणि चन्द्रसेना, बापाची आठवण करून रडत असेल बिचारी! तिचा ही खूप छळ चालू असेल. आणि मी त्यांना काही ही मदत करू शकत नाही.

त्यांच्याबद्दल विचार करतकरतच उग्रदत्त पायऱ्या उतरून भुयाराच्या तळाशी पोचला. तसे ते भुयार फार मोठे नव्हते. त्याची रुंदी गजभरापेक्षा जास्त नव्हतीं. उंची कांही ठिकाणी पाच फूट तर कांही ठिकाणी दहा फुटापर्यंत होती.

"हे भुयार कुठवर जाते? अस्वलचर्मवाल्यांना गुलाम म्हणून विकण्यासाठी तर तुम्ही मला व्याघ्रचर्मधाऱ्यांच्या तावडीतून वाचवले नाही ना?" उग्रदत्ताने विचारले.

यावर अस्वलचर्मधाऱ्यांपैकी एक मोठ्याने हसला, एकजण चिडून त्याला रागावला व तिसरा एक उग्रदत्तावर तीक्ष्ण दृष्टि रोखून म्हणाला–"तुला गुलाम म्हणून विकायचे असते तर भुयारांतून आणताना तुला कळू नये म्हणून आम्ही तुझ्या डोळ्यांवर पट्टी बांधली असती. माणसांचा गुलाम म्हणून आम्ही उपयोग नाही करत–व्याघ्रचर्मधारी करतात. तुमच्या देशवासियांवर तरी कसा विश्वास ठेवावा! कारण तुमच्यातले लोकच गुलाम पकडून आणून व्याघ्रचर्मधाऱ्यांचा नेता एकपाद याच्याकडे विकतात. नागवर्मा नावाचा माणूस तुला माहीत आहे?"

"हां, त्याला मी चांगलाच ओळखतो...."

उग्रदत्ताचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच दुसरा चर्मधारी पहिल्याला रागावून बोलला–"तू फार बकबक करीत आहेस. आपल्या नेत्याचा इशारा विसरलास वाटते?"

यावर पहिला एकदम चुप झाला. दोन चर्मधारी हातात मणी धरून पुढे जात होते, त्यांच्या मागे उग्रदत्त व त्याच्याही मागे एक अस्वलचर्मधारी–असे आता चुपचाप भुयारातून चालू लागले. भुयारात गंभीर शांतता होती. एकट्याला भीतीच वाटावी. चमकणारा मणी प्रकाश देत असला तरी बेताचाच. शांतपणे सर्व



जण चालत राहिले. दोन तीन मिनिटे चालल्यावर एकदम असे लक्षात आले की भुयार पुढे एकदम बंद आहे, आणि समोर एक मोठी शिला आडवी आलेली आहे! पुढे असणाऱ्याने त्या शिलेला असलेल्या फटीत हात घालून बोटाने एका जागी दाबताच ती शिला बाजूला होऊन पाठीमागून 'शरभ' अशी हाक ऐकू आली. उत्तरादाखल अस्वलचर्मधारी म्हणाला–"भल्लूक." यावर शिळेचे दार आणखी जास्त उघडले. चर्मधाऱ्यांपैकी ज्याच्या हातात वजनदार तलवार होती त्याने दारामागे डोकावून पाहिले.

       




उग्रदत्ताने पटकन ओळखले की त्यांनी उच्चारलेले 'शरभं' व 'भल्लूक' हे त्या रात्रीपुरते त्यांचे परवलीचे शब्द असावेत आणि हे ही ओळखले की हे लोक चोवीस तास शत्रुच्या भयाने संत्रस्त असतात.

"एकच माणूस तुमच्या हाती लागला? बाकीच्यांचे काय आले?" तिथल्या पहारेकऱ्याने विचारले.

"त्याबाबतीत आम्हाला काही माहीत नाही. आणि वटवाघळांसारखे कायम भुयारात रहाणाऱ्या तुम्हाला या सर्व गोष्टींशी काय करायचे आहे?" असे म्हणून शिलेचा दरवाजा पूर्ण उघडून सर्वात पुढे असणारा अस्वलचर्मधारी पुढे झाला.

त्याच्या मागोमाग बाकीचे ही चालत राहिले. उग्रदत्त त्यांच्यामागे दूरपर्यंत चालत राहिला, तरीही भुयाराचा शेवट काही येईना. त्याला अशी शंका आली की मधून मधून बिळांतून वरून उजेड येत आहे, आणि भुयाराच्या भिंतींच्यामागे कोणी कोणी बोलत आहे. त्याच्या असे लक्षात आले की व्याघ्रचर्मधाऱ्यांच्या हल्ल्यापासून जीव वाचविण्यासाठीच अस्वल-चर्मधाऱ्यांचा नेता कंध भयाने या गुप्त जागी दिवस कंठत आहे.

पुढे चालणारा चर्मधारी अचानक थांबला. हातावरचा मणी मुठीत घट्ट पकडून खालील जमिनीच्या दिशेने त्याने तीन-चार वेळा फिरवला. दुसऱ्याच क्षणी असा आवाज झाला की जणू काही जमीन फाटतेय. पहाता पहाता त्या चर्मधाऱ्याच्या पायाजवळील जमीनीत भेगा पडल्या आणि त्यातून डोळे दिपवणारा प्रकाश बाहेर पडला.

"इथे एकवीस पायऱ्या आहेत. सावध! पाय घसरला तर...." असे सावध करतच चर्मधारी पायऱ्या उतरू लागला. ही सूचना ऐकून उग्रदत्ताला आश्चर्य वाटले— भुयाराच्या मध्यावर एक मोठी दरी आहे. त्यातून हा दिवसासारखा प्रकाश येत आहे!

     



उग्रदत्त व त्याच्याबरोबरचे लोक पायऱ्या उतरून समतल प्रदेशात पोचले. त्या प्रदेशाच्या चारी बाजूंच्या भिंतीत जडवलेल्या रत्नातून देदीप्यमान प्रकाश पसरत होता. अशी रत्नें आजपर्यंत उग्रदत्ताने पाहिलीं नव्हती. ही नेत्रदीपक रत्नें पाहून त्याला आश्चर्य वाटले. तो काही वेळ ती रत्नें न्याहळत राहिला. समोर असणाऱ्या उंच द्वाराचे दरवाजे बंद होतें. आलेल्यांपैकी एका चर्मधाऱ्याने त्यावर तीन वेळा हाताने ठकठक केले. ताबडतोब दरवाजा उघडला. समोरील आसनावर अस्वलाचे कान असलेले शिरस्त्राण घातलेली एक विशालकाय व्यक्ति बसलेली होती.

चर्मधाऱ्याने त्याच्याजवळ जाऊन हळू आवाजात काहीतरी सांगितले. त्याच क्षणी अस्वलचर्मधारी उग्रदत्ताजवळ जाऊन म्हणाला–"हे आमचे नेता कन्ध." तुला त्यांच्याजवळ नेण्याची आज्ञा त्यांनी मला दिली आहे. उग्रदत्त निर्भयपणे कन्धाजवळ उभा राहिला. कन्धाने त्याच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहून विचारले–"व्याघ्रचर्मधाऱ्यांनी अपहृत केलेल्या तुझ्या देशातील किती व्यक्ति तुझ्याबरोबर आहेत?"

"आम्ही एकूण चार. त्यातील एक स्त्री आहे." उग्रदत्ताने म्हटले.

"ते लोक आत्ता कुठे आहेत हे तुला माहीत आहे?" कन्धाने विचारले.

"मला काहीच माहिती नाही." उग्रदत्ताने विस्मयाने म्हटले. त्याला कळेना की कन्ध असे का विचारत आहे? यामागील रहस्य काय?

उग्रदत्ताच्या मनातील हे विचार ओळखून कन्ध हसून म्हणाला–"मी तुमचा मित्र आहे. तुमच्या देशातील लोकांचे अपहरण करण्यात माझा हात नाही. व्याघ्रचर्मधारी जसे तुमचे शत्रु आहेत तसेच आमचेही आहेत. तू स्वतः पाहिलेच आहेस की मला व माझ्या अनुयायांना आपले दिवस पहाडी गुहां अन् भुयारे यांच्या आधाराने कसे कंठावे लागत आहेत. तुझ्या देशातल्या आणि अग्निद्वीपातल्या लोकांसाठी महामारी बनून राहिलेल्या एकपाद व त्याच्या अनुयायांचा सर्वनाश करण्याची एक योजना मी आणि तुझ्या देशातल्या एका व्यक्तीने मिळून बनवली आहे. तू कदाचित त्याला ओळखत असशील. मी आत्ताच त्याला बोलवून घेतो." असे म्हणून एका सेवकाला त्याने इशारा केला.

सेवकाने लगेच आपल्या नेत्याच्या आसनामागील दार उघडले. दुसऱ्याच क्षणी रुद्र हसत हसत उग्रदत्ताजवळ येऊन प्रेमाने म्हणाला–"उग्रदत्ता, तू जिवंत असलेला मला दिसशील याची मी कल्पनाच केली नव्हती."

मोठ्या आनंदाने व आतुरतेने उग्रदत्ताने विचारले–"मित्रा रुद्रा! अरुद्र कोठे आहे? चन्द्रसेनेची काय अवस्था आहे?"

"ते दोघेही व्याघ्रचर्मधाऱ्यांच्या ताब्यात आहेत. मला कन्धाच्या अनुयायांनी वाचवले." मोठ्या निराशेने रुद्राने सांगितले.

रुद्र पुढे म्हणाला–"तुम्ही दोघे व चन्द्रसेना कोठे आहात याची मला काहीच कल्पना नव्हती. मी काळजी करीत होतो. तुमच्यावर काय काय प्रसंग येत असतील कोणास ठाऊक? बिचाऱ्या चन्द्रसेनेची अवस्था तर भयानक असेल. या सर्वांची मुक्ति कशी करता येईल?"

कन्ध उठून उभा राहिला आणि उग्रदत्ताला म्हणाला–"रुद्राच्या तोंडून मी




तुझ्याबद्दल सर्व ऐकले आहे. इतक्या काळानंतर एकपाद व त्याच्या अनुयायांचा नाश करण्याची संधी मला मिळत आहे. रुद्राने व मी मिळून बनवलेली योजना काही खास गोष्ट नाही. तुझे पालक व पिता उग्राक्ष व त्यांचे सेवक यांना या द्वीपावर आणून त्यांच्या मदतीने एकपादाच्या दुर्गाला वेढा घालायचा आहे."

"आपल्या जवळ जे मोठमोठे पक्षी आहेत ते राक्षसांनाही उचलून आणू शकतील?" उग्रदत्ताने विचारले.

"इतक्या विशालकाय व्यक्तींना ते उचलू शकणार नाहीत. तुझ्या सर्व बंधूंना नावेतून सफर करून इथे यावे लागेल." कन्धाने म्हटले.

"बन्दीवान बनवून मला जेव्हां इथे आणले गेले तेव्हा याच्या चारी बाजूंना समुद्रतटापर्यंत भिडलेले अग्निपर्वत मी पाहिले. त्यांतून बाहेर पडणारा लावा तटावरील प्रदेशही अग्निने भरून टाकतो. अशा परिस्थितीत नावा किनाऱ्यापर्यंत कशा काय आणता येतील?" उग्रदत्ताने विचारले.

हा प्रश्न ऐकून कन्ध हसू लागला आणि मोठ्या गर्वाने आपल्या अनुयायांकडे पहात म्हणाला–"माझ्या अनुयायांना काही अशा जागा माहीत आहेत की जेथे या आगी-पासून वाचवून नावा किनाऱ्याला लावता येतील. परंतु खरे भय तर एकपादाच्या किल्ल्याला वेढा घालण्यातच आहे. वेढा घालून त्याला कैद केले तरी त्याचा संहार करण्यात फार मोठा धोका आहे."

एकपादाला कैद केल्यावर त्याच्या वध करणें यात काय कठिण आहे हे उग्रदत्ताला समजेना आणि त्यात धोका कसला? एकपादाजवळ काही विशेष शक्ति असेल कां? कंधाला एकपादाचा वध करणें एवढे कठिण कां वाटावे?

यावर उग्रदत्ताला संशयात आणि आश्चर्यात पडलेला पाहून कन्ध त्याला घेऊन गुप्त मार्गाने भुयारांतून त्या पहाडावर घेऊन गेला. तो म्हणाला–"नीट पहा, आगीच्या मधे दिसत आहे तोच एकपादाचा दुर्ग. तो आगीने वेढलेला दिसत असला तरी त्याच्या चारी बाजूंना अग्निपर्वत नाहीत. तेथे पोचण्याचा एक सुरक्षित मार्ग आहे. परंतु किल्ल्यावर कब्जा करूनही एकपादाचा वध करणे कठीण आहे."

"तो आपल्या हाती सापडला तर त्याला मारून टाकायला कितीसा वेळ?" उग्रदत्त म्हणाला.

"त्याच्याजवळ एक अद्भुत शक्ति आहे. ती ही की–त्याला कोणाचे रक्त दिसले वा त्याचे रक्त कोणी पाहिले तर तो निश्चितपणे मरेल." कन्धाने सांगितले.

(क्रमशः)



# सेवकाचा सल्ला

दृढव्रती विक्रमादित्य झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर घेऊन नेहमीप्रमाणे मौन होऊन तो स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणारा वेताळ म्हणाला–"राजा, या स्मशानात मध्य-रात्रीच्या वेळी भूते प्रेते व कोल्ह्यांचा संचार असतो. तू जे कष्ट सहन करीत आहेस, ते पाहून मला तुझी दया येते. मेधावी व्यक्तींची वागणूक काही विशिष्ट वेळी जरा विचित्र भासते. हे बुद्धिमान लोक या विश्वाला एक चक्रव्यूह समजतात. तरीही जेव्हा इतरांसमोर एकादी अडचण उभी रहाते, तेव्हा हे लोक गप्प राहू शकत नाहीत आणि निष्कारण स्वतःवर संकटे ओढवून घेतात. उदाहरण म्हणून एक मेधावी सेवक राजाश्रयाला वंचित कसा झाला त्याची गोष्ट मी तुला सांगतो. गोष्ट ऐकताना तुला तुझ्या श्रमांचा विसरही पडेल.



वेताळ गोष्ट सांगू लागला—चन्द्रशिलाचा राजा चरितार्थ याच्या दरबारात सुचरित नावाचा एक बुद्धिमान सेवक होता. तो अत्यंत चुणचुणीत आणि कोणत्याही समस्येची निरनिराळ्या दृष्टीने छाननी करण्यात हुशार होता. परंतु राजा चरितार्थाला मात्र त्याच्या या हुशारीचा अंदाज नव्हता. सुचरितानेही कधी राजासमोर आपली क्षमता प्रदर्शित करण्याचा प्रयत्न केला नाही.

एके दिवशी चरितार्थ काही समस्येचा खोलवर विचार करीत पडला होता. त्याच वेळी सुचरित द्राक्षाचा रस देण्यासाठी तेथे आला. त्याने ओळखले की राजा कोणत्यातरी गंभीर समस्येबद्दलच्या विचारात गर्क आहे. सुचरिताने राजाला विचारले—"महाराज, असे वाटत आहे की आपण एकाद्या समस्येबद्दल विचारात पडलेले आहात!"

यावर हसून राजा म्हणाला—"मी राजा असूनही मला याचे उत्तर शोधता येत नाही, अशा स्थितीत तुझ्या हातून काय होणार आहे? तरीही मी तुला सांगतो, ऐक. आपल्या राज्यात 'निश्चित' नावाच्या चोराची दुष्कृत्ये वाढत आहेत. अनेकांना त्याने लुटले आहे, लुटतो आहे. त्याला पकडण्यासाठी केलेले सर्व प्रयत्न असफल झाले. मी जनतेच्या सुरक्षिततेचा पुरेसा प्रयत्न करीत नाही असा आरोप माझ्यावर ठेवून जनता माझी निन्दा करीत आहे. सांग, तू राजा असतास तर या परिस्थितीत काय केले असतेस?"

क्षणभर विचार करून सुरचित म्हणाला—

"मी राजा असतो तर समस्या अशी सोडवली असती – आपल्या नगराजवळच्या मैदानात मजूर लावून खोदाई सुरू करायची. तेथे जमिनीच्या गर्भात एका शिवालयाचे अवरोष असून त्यातील नंदीची प्रतिमा सोन्याची आहे—अशी एक बातमी जनतेत पसरवून द्यायची. ही गोष्ट 'निश्चित'च्या कानी नक्कीच पोचेल. तोही स्वर्णप्रतिमा मिळवण्यासाठी मजूरवेषात पोचेल. आपले मजूर हे वेष पालटलेले आपले सैनिकच असतील. नवा चेहरा पाहून आपल्या सैनिकांकरवी त्याला पकडून बन्दिवान करणे मग सोपेच आहे की!"

सुचरिताच्या तोंडून या गोष्टी ऐकून त्याच्या विचार सरणीचे राजाला भारी कौतुक वाटले. सुचरित हा फारच बुद्धिमान आहे हे ओळखून त्याच्या सल्ल्या प्रमाणे करून निश्चितला पकडून कैदेत टाकले.

थोड्या दिवसांनंतर राजापुढे पुन्हा एक अडचण उपस्थित झाली. शेजारील देशाचा राजा सिंहभूपती याने चरितार्थाशी युद्धाची घोषणा केली. चंद्रशिला राज्य त्यामानाने दुर्बळ होते, युद्धात हार निश्चित होती. म्हणूनच तो विचारात पडला होता. इतक्यात बागेत झाडांना पाणी देणाऱ्या सेवकाकडे त्याचे लक्ष गेले.

त्याला बोलावून आपला प्रश्न राजाने त्याच्या समोर मांडला, अन् मागल्या प्रमाणेच विचारले—"तू राजा असतास तर काय केले असतेस?"

यावर सुचरित म्हणाला—"सिंहभूपतीने काही कारण नसताना केवळ गर्वाच्या आहारी जाऊन आपल्यावर हल्ला करायचा विचार केला आहे. त्याला मोठे सैन्य घेऊन आपल्या सीमेच्या आत येताना अरुन्द खिंडीतून यावे लागेल. आपले सैन्य खिंडीच्या दोन्ही बाजूंना ठेवा. खिंडीच्या आपल्या बाजूच्या दारावर घोडदळ पहारा देईल.





शत्रुसैनिक खिंडीत पोचतील तेव्हां आपल्या सैनिकांनी मोठमोठे धोंडे वरून त्यांच्यावर ढकलावे, त्याखाली काही सैनिक मरतील. या अचानक हल्ल्याने त्यांच्यात बेशिस्त येऊन घबराट माजेल. त्यावेळी आपल्या सैनिकांनी इकडे तिकडे पळणाऱ्या शत्रु-सैनिकांना बाणांचा वर्षाव करून टिपावे. इतके करूनही साहस करून जे पुढे घुसतील त्यांचा समाचार आपले घोडदळ घेईलच?"

सुचरिताच्या या योजनेप्रमाणें व्यवस्था करून राजाने शत्रुसैन्य पळवून लावले.

या घटनेमुळे सुचरिताच्या बुद्धि-सामर्थ्यावर राजाचा पक्का विश्वास बसला. त्याला बोलावून राजा म्हणाला–"मी तुझी माझा सल्लागार म्हणून नेमणूक करू इच्छितो. तुझा काय विचार?"

सुचरित अमळ विचारात पडला. राजा आपल्या बुद्धि-सामर्थ्यावर खुश आहे हें जाणून सुचरिताला आनंद झाला. पण राजाचा सल्लागार म्हणून काम करावे की नाही हा मात्र मोठा प्रश्नच त्याच्यापुढे उभा राहिला. राजाचा प्रस्ताव अस्वीकृत करणे ही योग्य नव्हते. राजाचा सेवक म्हणून काम करणे छान! सल्लागाराचे पद स्वीकारून आपण होऊन आपली जबाबदारी कशाला वाढवायची? मोठ्यां-च्या फार जवळ जाणे बरे नाही. आज राजाने आपल्याला सल्लागाराचे पद देऊ केले हे ठीक. उद्या आपला एकादा सल्ला चुकला की राजा रागाच्या भरात काय करील कोणास ठाऊक? तेव्हा नीट विचार करूनच राजाला 'हो' की 'नाही' सांगितले पाहिजे.

हे सर्व विचार-चक्र चालू असतानाच त्याने मनांतल्या मनात एक छान योजना आखली. आपला सल्लागार का होऊ इच्छित नाही हे राजाला पटवून देण्यासाठी आपल्या बुद्धि-सामर्थ्यांचा सुरेख उपयोग सुचरिताने केला. नम्रपणे तो राजाला म्हणाला–

"महाराज, एकादे पद मिळाले की माणसाची जबाबदारी वाढते. जबाबदारी-मुळे विचारशक्ति कमी होते. त्याला स्वतन्त्रपणे काही करता येत नाही. दुसरे असे की आपण माझ्या सल्ल्याने राज्य-कारभार करता असे माहिती झाले तर जनतेच्या मनात आपल्याबद्दलचा आदर कमी होईल. त्यामुळे मी असाच रहाणे ठीक होईल." सुचरिताचे हे म्हणणे राजाला पटले.

आणखी काही वर्षे गेली. विध्वंसक नावाचा एक राक्षस राज्याजवळच्या अरण्यात घुसून येणाऱ्या जाणाऱ्या वाटसरूंना पकडून खाऊ लागला. राजाने हेर पाठवून बातमी मिळवली की राक्षस फारच शक्तिवान् आहे.

सुचरिताला बोलावून त्याने पुन्हा विचारले–"बोल, तू राजा असतास तर यावेळी काय केले असतेस?"

यावर सुचरिताने सुचवलेली योजना राजाला फार पसंत पडली. त्यानुसार राजा स्वतःच रथारूढ होऊन विध्वंसकाला भेटायला अरण्याकडे निघाला.

राजाला पाहून हुंकार देत विध्वंसक म्हणाला–"कसा हिंमतीचा माणूस आहेस! माझ्या समोर येण्याचे साहस करणारा कोण आहेस तू?"

"विध्वंसका, मी या देशचा राजा. जंगलात तुला जे सापडतात त्यांना तू खाऊन टाकतोस. त्यामुळे जनता प्राण-भयाने तुझी निंदा करीत आहे. त्यापेक्षा





"उद्यापासून मीच रोज चार धष्टपुष्ट माणसे तुला पुरवत जाईन. परंतु येणाऱ्या जाणाऱ्यांवर तू हल्ला करू नकोस." चरितार्थाने म्हटले.

विध्वंसकाने हा प्रस्ताव मान्य केला. राजाने त्याला विचारले–"विध्वंसका, मला तुझ्याकडून एक मदत हवी. इथून जवळच एक खोल व विशाल सरोवर आहे. कांही दिवसांपूर्वी चोरांनी माझ्या अंतःपुरातली आराध्य देवतेची सुवर्णमूर्ति चोरली. माझ्या सेवकांनी पाठलाग करून त्यांना पकडले, पण तेवढ्यात चोरांनी ती मूर्ति या सरोवरात फेकली. ती मूर्ति तेथून काढण्याची हिम्मत कोणातही नाही. तू ती शोधून काढून मला द्यायचीस, कबूल?"

विध्वंसक दंड ठोकून म्हणाला–"हं! हे काय मोठं काम आहे? चल, मला सरोवराचा रस्ता दाखव."

नंतर दोघेही सरोवरापाशी पोचले. सरोवर तर दलदलीने भरलेले होते–राक्षसाला काय माहित! त्याने एकदम सरोवरात उडी मारली, अन् तो दलदलीत फसला. जसे हातपाय हलवील तसा आणखी आणखी खोल जात शेवटी पूर्ण बुडाला.

राजाने परत येऊन सुचरिताची खूप स्तुती केली–"सुचरित, तुझी बुद्धी खरोखरीच अपूर्व आहे. मी तुझ्यासाठी भव्य सत्कार समारंभ घडवीन."

सुचरिताने या गोष्टीला सहमती दिली नाही. तो म्हणाला–"राजा, अभिनन्दन व मानसन्मानामुळे माणसाला गर्व चढतो. गर्विष्ठ माणूस सहजपणे विचार करू शकणार नाही, तेव्हां मला हा समारंभ नको."

पुन्हा काही दिवसांनी राजाला समजले की त्याच्या काही नोकर व अधिकारवर्गात लाचलुचपत मर्यादेबाहेर वाढत आहे.

सुचरितला राजाने विचारले–"अधिकाऱ्यांत लाचलुचपत फार वाढली आहे. तू राजा असतास तर काय केले असतेस?"



सुचरित जरा वेळ गप्प राहिला आणि मग म्हणाला–"महाराज, मी राजा होईन असे स्वप्नांतही कधी मला वाटत नाही. राज्य हे परंपरेने किंवा बाहुबलाने मिळते. ते संभाळण्यासाठी स्वतःच विचार करण्याची शक्ति असावी लागते. मी तर बिचारा एक साधा नागरिक आहे."

हे उत्तर ऐकून चरितार्थ क्षण दोन क्षण विचारात पडला आणि एकदम कोपाने म्हणाला–"सुचरित, मी तुला आतापासून नोकरीवरून काढून टाकले आहे. तू कुठेही जा अन् आपली सोय बघ."

वेताळाने एवढी गोष्ट सांगून म्हटले–"राजा, आजपर्यंत राजाला आलेल्या अनेक कठीण समस्या सोडवून देणारा सुचरित, राज्याधिकाऱ्यांच्या लाचलुचपतीच्या बाबतीतच का गप्प राहिला? त्याने सल्ला देण्यास नकार का दिला? अनेक वर्षांपासून स्वतःला, कठीण समस्या सोडवण्यात मदत करणाऱ्या मेधावी सेवकाला, राजाने एवढ्याच एका कारणासाठी नोकरीवरून काढण्याची निर्दयता का दाखवली? याचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू सांगितले नाहीस तर तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे तुकडे होतील."

यावर विक्रमादित्य म्हणाला–"राजाला आपल्याच सेवकांच्या चरित्राबद्दल वा व्यवहारांबद्दल माहिती काढणे हे काही कठीण नाही. परंतु जोपर्यंत सुचरित पदरी आहे, तोपर्यंत राजा स्वतंत्रपणे कोणत्या गोष्टीचा विचारच करणार. नाही–ही गोष्ट सुचरिताने ताडली. त्याने हे ही ओळखले होते की आता उत्तर न दिले तर राजा हाकलून देईल. तेव्हां हे त्याच्या पथ्यावरच पडले. इकडे सुचरिताचे हे विचार राजानेही ओळखले. त्याला नोकरीवरून काढण्यात निर्दयपणाचा प्रश्नच नव्हता, कारण तो कोठेही आपले पोट भरण्याइतका मेधावी आहे हे राजाला माहीत होते."

हे सांगून होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन झाडावर लटकू लागला. (कल्पित)



# नकली किल्ली

शिवपुरी मध्ये राहणारा नागराज कुलुपांची दुरुस्ती व किल्ल्या तयार करण्यांत प्रवीण होता.

एके दिवशी रामसहाय नावाचा एक शेतकरी एक किल्ली घेऊन नागराज पाशी आला आणि त्याने विचारले–"नागराज, तु अशी एक किल्ली बनवून देशील?"

रामसहायने नागराजला सांगितले–उद्या येऊन किल्ली घेऊन जा.

दुसऱ्या दिवशी रामसहाय नागराजच्या दुकानावर पोंचला. त्याच्या हाती नागराजने दोन किल्ल्या ठेवल्या.

नागराजने तयार केलेली किल्ली निरखून पहात रामसहायने विचारले–"ही किल्ली ठीक चालेल ना?"

नागराजं गर्वाने म्हणाला–"कलेतील माझे प्राविण्य तुम्हाला कदाचित् माहितच असेल. मी तयार केलेल्या किल्लीने काम केले नाही असे आजपर्यंत कधीही घडले नाही."

"म्हणून तर मी तुझ्याकडे आलो. ही किल्ली चालत नव्हती. म्हणून एक आणखी किल्ली बनवावी लागली." रामसहाय म्हणाला.



## मुलांसाठी 'चांदोबा' ची गंमतशीर स्पर्धा

# महान भारतीय परंपरेसंबंधी स्पर्धा

## तीन मजेदार विभागात

स्पर्धा–१
भारतातील महान् राजे



स्पर्धा–२
भारतातील महान् राण्या



स्पर्धा–३
भारतातील महान् जोडया



**१,३०,००० रु. पेक्षा अधिक किमतीची बक्षिसे मिळवा**

११ भाषांपैकी प्रत्येक भाषेतील प्रत्येक

**आणि : बंपर बक्षिसे**

प्रथम क्रमांक बंपर : १०,००० रु. ची शिष्यवृत्ति*



अनेक प्रान्त जिंकून अकबराने एका विशाल साम्राज्याची स्थापना केली. परंतु बराच कालपर्यंत पोटी संतान नसल्याने तो दुःखी असे. त्यावेळी एका पहाडावर राहून एक फकीर शेख सलीम चिस्ती याचे गुणगान त्याने ऐकले व त्याचे दर्शन घेऊन आशिर्वाद घेतला.

थोड्याच दिवसांनी अकबराच्या हिन्दु पत्नीने एका सुंदर मुलाला जन्म दिला. फकीरावरील श्रद्धाभक्तीमुळे अकबराने आपल्या या पुत्राचे नाव 'सलीम' ठेवले. हाच बालक कालांतराने 'जहांगीर' नांवाने प्रसिद्ध झाला.





फकिराच्या सान्निध्यात रहाण्याचा संकल्प करून अकबराने आपली राजधानी आग्र्याहून शिक्री पर्वतावर हलविण्याचा विचार केला. किल्ल्याचे बांधकाम शीघ्र गतीने सुरु झाले.

शिक्रीहून अकबराने १५७३ मध्ये गुजराथवर हल्ला केला. सुरुवातीला असंख्य अडचणींना तोंडी देऊन अखेर विजय प्राप्त करून तो राजधानीला परतला. या विजयाची आठवण म्हणून 'शिक्री' या नावापूर्वी 'फतेहपूर' किंवा फत्तेपूर (फतेह=विजय) हे नाव जोडले.





अकबराने या किल्ल्यात १५ वर्षे निवास केला. आपला मित्र व मंत्री बिरबल याच्या संगतीत तिथे काही दिवस आरामात घालवले. सुप्रसिद्ध गायक तानसेन यालाही या किल्ल्याच्या परिसराचे फार आकर्षण होते.

परंतु हा आनन्द फार दिवस टिकला नाही. फत्तेपूर शिक्रीत पाण्याचा तीव्र दुष्काळ पडला. लोकांना प्यायलाही पाणी उरले नाही. पुष्कळ प्रयत्न करूनही दुष्काळाचे निवारण करता न आल्याने नाइलाजाने अखेर अकबराला या किल्ल्याचा त्याग करावा लागला.





समुद्रसपाटीपासून १७६ फूट व चौथऱ्यापासून १३४ फूट उंच असणारे सिंहद्वार किंवा 'बुलंद दरवाजा' इथेच आहे. भारतातील हा सर्वांत उंच दरवाजा आहे. संगमरवरी व [illegible] हे विशाल सिंहद्वार अनेक दर्शकांना आकर्षित करून घेते.



येथील एक मुख्य भवन 'हवामहाल' किंवा 'पंचमहाल' या नावाचे आहे. किल्ला वैभवपूर्ण अवस्थेत असताना अंत:पुरांतल्या स्त्रिया येथे रहात असत. वारा सहज खेळावा अशा तऱ्हेने या मजल्यांची रचना केली.





सम्राट अकबराने किल्ला सोडल्यानंतर केवळ 'शिल्पसंपत्ती' म्हणून किल्ल्याचे रक्षण करीत रहाणे सोपे नव्हते. मग काय? हळूहळू त्याचे वैभव कमी होत गेले. किल्ला उजाड होत गेला. परंतु आता पुन्हां 'फत्तेपूर शिक्री' ची प्रसिद्धी वाढत आहे.




जपान देशापासून थोडे दूर एक सशांचे बेट होते. सर्व प्रकारच्या रंगांचे ससे होते तिथे. पण संपूर्ण पांढराशुभ्र असा एकच होता त्यात! तो पांढरा ससा रोज उत्तरेकडे असलेल्या समुद्राच्या वाळूत पडून राहून जपानच्या किनाऱ्याकडे टक लावून पहात राही. त्या देशात जाऊन तिथली सर्व आश्चर्यपूर्ण दृश्ये पहावी अशी तीव्र इच्छा त्याच्या मनात होती.

त्याच्या मनात ही इच्छा येण्याचे कारण म्हणजे एका मगरीने त्याला सांगितलेल्या गोष्टी. ही मगर रोज जपानच्या किनाऱ्यावरून इथल्या रेतीवर विश्रांतीसाठी येत असे. यामुळे ससा व मगर यांची चांगली मैत्री झाली. मगर सांगे—जपानी किनाऱ्यावरील वाळू फारच घाणेरडी झालेली असते. तेथे माणूस नावाचे प्राणी रहातात. ते सरळ उभे राहून खालच्या पायांनी चालतात आणि वरच्या पायांनी काम करतात. त्यांच्यात एक राजा आहे. त्याच्या मुलीचे केस अमावास्येसारखे (काळे) आहेत आणि तिची देहकांती पौर्णिमेच्या चांदण्यासारखी (गोरी) आहे. असल्या गोष्टी ऐकूनच त्या प्रदेशांत जायची सशाची उत्सुकता वाढत गेली.

एके दिवशी मगरीने सांगितले—राजाच्या मुलीशी विवाह करण्याच्या इच्छेने अनेक संपन्न घरचे युवक येत आहेत, पण तिने या सर्वांना नकार दिला आहे. दुसऱ्या दिवशी आणखी एक नवीन बातमी दिली—दूरच्या एका प्रदेशातून पाच राजकुमार राजकुमारीशी विवाह करण्यासाठी येत आहेत. आणि अशी ही बातमी पसरली आहे की ती यांच्याच पैकी एकाशी विवाह करणार आहे.

आता मात्र जपानला जायचेच असे सशाने ठरवले. राजकुमारीला पहायचे

जपानी लोककथा



त्याची तीव्र इच्छा होती. आपली इच्छा त्याने मगरीला सांगितली. आणि म्हटले– "ताई, तू आपल्या पाठीवरून मला समुद्रपार ने. मी जन्मभर तुझा ऋणी राहीन."

"मी तुला नेले तर तुझे बाकीचे भाऊबंद माझे शत्रु बनतील आणि इतक्या स्वच्छ मऊ वाळूत झोपण्याला मला मुकावे लागेल." असे म्हणून मगरीने प्रथम टाळाटाळ करून पाहिली, पण सशाने पुनःपुन्हा केलेली विनंती ती टाळू शकली नाही. आणि तिने आपल्या पाठीवरून त्याला जपानी तटावर आणून सोडले. किनाऱ्यावर खडे अन् माती पसरलेली होती.

पण दुरूनच जपानची सुंदर भूमी पाहून ससा मनोमन आनंदित झाला. मगरीने एका नवीन सुरेख देशात आणल्याबद्दल सशाने तिला धन्यवाद दिले. दूर दिसणारी हिरवळ व उंच उंच वृक्षराजी त्याला मोहक वाटली. तेथील हवामान ही फार सुखद होते. खालच्या पायांनी चालणारी आणि वरच्या पायांनी काम करणारी माणसे मात्र त्याला दिसली नाहीत. सकाळच्या सूर्याच्या कोंवळया किरणांनी ससा सुखावून गेला.

इतक्यात काही अंतरावर सशाला एक कुत्रा दिसला. चला, त्याच्याशी थोडे बोलून मैत्री करू या असा विचार विचार करून तो निघाला.

ससा किनाऱ्यावर थोडा पुढे सरकतो तोच त्या कुत्र्याने त्याचा पाठलाग करून त्याला बोचकारले. सशाला आता आपल्या जिवाला धोका वाटू लागला. त्याला झालेल्या जखमा दुखत होत्या, म्हणून तो एका नदीकिनारी गेला. नदीवर एक पूल होता. पुलाजवळील दाट झाडीत तो लपून बसला. त्याला आता आपला देश सोडून उगीचच इकडे आल्याचा पश्चात्ताप होऊ लागला.

थोडया वेळाने पुलावर घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू आला. ससा पुलाखालून बाहेर आला आणि त्याने प्रथमच मनुष्य नामक प्राणी पाहिला! ते राजकुमारीच्या महालाकडे जाण्यासाठीं जवळच्या रस्त्याबद्दल बोलत असल्याचे सशाने ऐकले.

मगरीने सांगितलेल्या पाच राजकुमारांपैकीच हे चार असावेत असे सशाला वाटले. आणि त्याने त्यांना विनंति केली–मलाही राजकुमारीच्या महालात घेऊन चला ना!

"काय पण तुझी अवस्था! तुझ्या या जखमा वगैरे अवतार पाहून राजकुमारी फार खुश होईल नाही?" असे म्हणून राजकुमारांनी त्याची टिंगल केली. परंतु त्यातला एक म्हणाला–"तू पाण्यात स्नान करून नंतर रेतीवर थोडा लोळ म्हणजे तुझ्या जखमा भरून येतील."

सशाला त्याचे म्हणणे खरेच वाटले आणि त्याने पाण्यात स्नान केले. परंतु ते खारे असल्यामुळे उलट त्याच्या अंगाची फार आग होऊ लागली. आग कमी होईल असे वाटून तो त्या घाणेरडया रेतीत लोळू लागला. आता तर त्याच्या वेदना फारच वाढल्या. दुधाच्या फेसासारखे स्वच्छ सफेत त्याचे अंग आता अगदीच मळके, घृणास्पद दिसू लागले.

छी:, काय ही मनुष्यजात! त्यापेक्षा कुत्रीसुद्धा बरी–असे त्याला वाटले. आणि पुलाजवळ जाऊन तो स्फुंदून स्फुंदून रडू लागला.



त्याचवेळी पुलावरून आणखी एक माणूस जाऊ लागला. त्याच्या पाठीवर चार बिछान्यांच्या वळकटया होत्या. सशाला पाहिल्याबरोबर त्याने आपले ओझे खाली ठेवले, सशाला आपल्या हातात घेऊन गोंजारत त्याने विचारले–"तू रडतोस का? अंग इतके मळले कसे?"

सशाने विचार केला–हा माणूस बरा वाटतोय. त्याने आपली सगळी हकीकत त्याला सांगितली आणि त्याबरोबर अगोदर आलल्या चार माणसांच्या वागणुकीबद्दलही सांगितले. त्या तरुणाने सशाला सांगितले– ते चारही जण माझे भाऊ, आणि मी त्यांच्यातला पाचवा राजकुमार! ते चारही








जण राजकुमारीशी विवाह करायच्या इच्छेने आले आहेत आणि मला त्यांनी सेवक म्हणून आणले आहे.

"तूच का नाही राजकुमारीशी लग्न करीत? ती फारच सुंदर आहे असे मी ऐकले आहे." ससा म्हणाला.

राजकुमाराने सशाला स्वच्छ पाण्याने धुतले, त्याबरोबर त्याच्या वेदना कमी झाल्या. त्यानंतर त्याने जखमांवर तृण-पुष्पांचे पराग शिंपडले. तो पांढऱ्या सशाला म्हणाला–"ससोबा, आता इथेच जरा विश्रांती घ्या. मी हे बिछाने भावांकडे पोचवून येतो, आणि मग मी तुला राजकुमारीकडे घेऊन जाईन बरं का."

राजकुमार बिछाने पोचवून येईपर्यंत ससा गाढ झोपला होता. झोप होईपर्यंत त्याच्या शरीरावर पुन्हा केसही उगवले होते! पाचवा राजकुमार त्याला घेऊन राजकुमारीच्या अंत:पुरात पोचेपर्यंत बाकीच्या चार भावांना राजकुमारीचा नकारही देऊन झाला होता.

द्वारपालाने राजकुमारीला कळवले की–"विवाहाच्या इच्छेने आणखी एक कुमार आला आहे आणि त्याने बरोबर एक पांढरा ससा आणला आहे."

"पांढरा ससा? ओहो, मी तर कधी ऐकले ही नव्हते की ससे पांढरे ही असू शकतात! लवकर त्या राजकुमाराला आत पाठव." तिने आज्ञा केली.

नंतर सशाला पाहिल्याबरोबर त्याला उचलून आपल्या मांडीवर घेऊन गोंजारत राजकुमारी म्हणाली–"वा: काय सुंदर आणि गोजिरवाणा आहे हा ससा!" राजकुमाराने आपली कशी काळजी घेतली हे सांगून सशाने राजकुमारीला या कुमाराशीच विवाह करण्याची विनंती केली.

राजकुमारीने सशाची विनंती मानली आणि त्या दोघांचा विवाह थाटामाटाने पार पडला.

पांढरा ससा नंतर राजकुमारी जवळच कायम राहिला.






**प्र**भु रामचन्द्रांच्या हस्ते संपन्न होणाऱ्या अद्भुत यज्ञात भाग घेण्यासाठीं वाल्मीकि आपल्या शिष्यांसह येऊन पोंचले आणि त्यांनी खास त्यांच्यासाठी राखून ठेवलेल्या ऋषि-वाटिकेतील पर्णशाळेत मुक्काम केला. महर्षी वाल्मीकींसाठीं ही पर्णशाला खास सुशोभित करण्यांत आली होती. मध्यभागी महर्षींसाठी एक प्रशस्त व्यास-पीठ तयार केले होते. त्यावर एक हरिणाजिन घातले होते. व्यास-पीठाच्या चारी बाजूंना रंगी-बेरंगी रंगवल्लिका आरेखिलेल्या होत्या. समोर एक छोटेखानीं सुरेख अग्निकुंड मंद-मंद जळत होते. मधून मधून त्यात चंदन-चूर्ण टाकण्यांत येत होते. सर्व वातावरण सुगंधाने परिपूर्ण भरलेले होते. स्वत: रचलेल्या रामायणाचे सर्वत्र गायन करण्याची अनुमति त्यांनी आपल्या शिष्यांना दिली. वाल्मीकींचे अनेक शिष्य रामायण गात असत. पण लव व कुश यांच्या रामायण-गायनांत विशेष आकर्षण असे. लव-कुश रामायण गाऊ लागले की श्रोते तल्लीन होऊन जात. श्रोत्यांना वेळेचे भान रहात नसे. त्यांनी कुश-लवांना समजून सांगितले–"तुम्ही कुणाची मुलं आहात असे कोणी तुम्हाला विचारले तर सांगा की आम्ही वाल्मीकींचे शिष्य आहोत. कोणी तुम्हाला धन दिले तर ते घेऊ नका, प्रभु रामचन्द्रांनी बोलविले तर त्यांच्या पुढे ही रामायण गा. ते राजे आहेत, त्यांच्याशी आदरपूर्वक वागा."

१३. कुश-लवाचा राज्याभिषेक



"असंच करू आजोबा" असे म्हणून ते दोघे पर्णशाळेच्या बाहेर पडले.

लव-कुश राग तालासह रामायणाचे गायन करूं लागले. ही वार्ता समजताच रामचन्द्रांनी त्यांना बोलविले आणि एका विशाल सभेत गायन करायला सांगितले. या सभेत मुनी-तपस्वी, राजे, पंडित पुराणिक, संगीतज्ञ, कलाकार, नृत्यशास्त्री अशी मोठमोठी मंडळी हजर होती.

त्या दिवशी कुशलवांनी रामायणाच्या पहिल्या वीस सर्गांचे गायन केले. शेवटी श्री रामचन्द्र लक्ष्मणाला म्हणाले–"या मुलांना अठरा हजार मुद्रा देण्याची व्यवस्था कर." पण लक्ष्मण त्यांना मुद्रा देऊं लागला, तसे दोघांनी एक-स्वरात सांगितले–"आम्हाला या स्वर्ण-मुद्रा कशाला? आम्ही अरण्यात कंदमुळे अन् फळे खाऊन राहणारे ऋषिकुमार!"

रामचन्द्र हे उत्तर ऐकून आश्चर्यात पडले. म्हणाले–"ज्याच्या काव्याचं तुम्ही गायन करता तो किती महान् माणूस असेल! कोण याचा रचयिता?"

"महातपस्वी वाल्मिकींनी ही रचना केली आहे. महर्षि वाल्मीकींच्या आश्रमांत नित्य रामायणाचें गायन चालू असते. रोज सकाळी वाल्मीकी आपल्या सर्व शिष्यांना रामायण गायला शिकवितात. आम्हा दोघांवर महर्षींचे विशेष प्रेम, कारण आम्ही रामायणाचे विशेष भावपूर्ण गायन करतो. यज्ञात सामिल होण्यासाठी ते ही इथे आलेले आहेत. आपली इच्छा असेल तर आम्ही रोज येऊन इथे गायन करू." सीतेच्या या कुमारांनी मोठ्या विनयाने सांगितले.

श्री रामचन्द्रांनी रोज रामायण ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केली. लव-कुश रोज सभेत काही सर्ग गाऊन परत जात. रोज सायंकाळी सर्व महत्वाची कामे आटोपून श्रीरामचन्द्र रामायणाचा पाठ ऐकण्यासाठी संगीत-भवनाने उपस्थित राहात. रामायणाचे गायन ऐकण्यासाठी रसिकांची रीघ लागे. बसायला जागा न मिळणारी मंडळी बाजूने उभी राहात. गायन चालू असनाना सर्वत्र संपूर्ण शांतता असे. लव-कुशांचे भावपूर्ण रामायण सर्वांनाज मंत्र-मुग्ध करी. लोक तहान-भूक विसरून जात. गायन-सभा संपल्यावर घरीं जाताता सर्वांच्या तोंडीं रामायणाची गीतेंच असत. सर्व वातावरण रामायणमय होऊन गेले. लव-कुशांच्या गायनाला तोड नव्हती. असे पुष्कळ दिवस चालले. पुरे रामायण ऐकून सर्वांना समजून चुकले की ही सीतेचीच मुले आहेत.

श्री रामचन्द्रांनी नोकरांकरवी महामुनि वाल्मिकींना निरोप पाठवला की–"सीता पवित्र असेल तर तिने स्वतः इथे येऊन आपले पावित्र्य सिद्ध करून दाखवावे, यासाठी आपण अनुमति द्यावी."

दूताने वाल्मिकींना संदेश ऐकवला. यावर महामुनींनी कळवले–"रामचन्द्राच्या इच्छेप्रमाणे सीता जरूर यईल."

ही वार्ता ऐकून रामचन्द्रांनी सर्व सभासदांसमोर जाहीर केले की–सीता सर्व सभेसमोर आपले पावित्र्य सिद्ध करून दाखवणार आहे. यावर सर्वांनी आनंदाने रामचन्द्राचे अभिनंदन केले.

दुसऱ्या दिवशी रामचन्द्रांनी यज्ञवाटिकेत जाऊन सर्व महामुनींना ही वार्ता कळवली. त्याचबरोबर राक्षस, वानर व यज्ञाकरता



आलेल्या देशोदेशींच्या चातुर्वर्ण्य लोकांनाही बोलावणे केले. जेव्हा सर्वजण सभेत पोचले, तेव्हा वाल्मिकींच्या मागे दीनतापूर्वक चालणाऱ्या सीतेला पाहून सर्वांची हृदये गलबलून गेली.

वाल्मिकींनी रामचन्द्राला म्हटले-"रामा, सीता अत्यंत शीलवती, महान् गृहिणी व धर्माचरण करणारी आहे. तू जनतेच्या अफवांच्या भीतीने तिला माझ्या आश्रमाजवळ सोडून दिलेस. तुला विश्वास वाटावा म्हणून सीता आत्ता शपथ घेईल. ही दोन्ही तुझीच मुले आहेत. मी खूप तपस्या केली आहे. माझ्या जिभेने असत्य भाषण कधीही केले नाही. सीता अपवित्र असेल



तर माझ्या तपस्येचे पुण्य नाहीसे होवो! तू जनापवादाला भ्यायलास, परंतु तुझी खात्री आहे की सीतेचा कांहीही दोष नाही. मला ही गोष्ट चांगली ठाऊक आहे."

रामचन्द्रांनी वाल्मिकींना प्रणाम करून म्हटले—"मुनीवर, आपले कथन सत्य आहे. लंकेतच अग्निदेवाने सीतेच्या पवित्र्या बद्दल साक्ष दिली होती. म्हणूनच मी तिला अयोध्येला घेऊन आलो. ही मुले माझी आहेत हे ही मी जाणले आहे. या सभेत सीतेने आपले पावित्र्य सिद्ध केले तर मी तिचा आनंदाने स्वीकार करीन."

भगवी वस्त्रे परिधान केलेली सीता जमिनीवर नजर खिळवून, हात जोडून म्हणाली—"श्रीराम सोडून मी अन्य कोणाचे स्मरणही केले नाही. काया वाचा मनाने मी केवळ रामचन्द्रांचीच पूजा केली. हे खरे असेल तर भूदेवी मला आपल्या पोटात घेईल."

हे शब्द बाहेर पडायचाच अवकाश— पृथ्वीच्या पोटातून बलवान नागकुमार एक दिव्य सिंहासन उचलून घेऊन वर आला. सिंहासन अद्भुत दिसत होते. नागकुमाराच्या डोक्यावरील रत्नेही अद्भुत प्रकाशाने झळाळत होती. त्या सिंहासनावर विराजित भूदेवीने वात्सल्यप्रेमाने हात पसरून सीतेला उठवले व सिंहासनावर बसवले. सिंहासन तात्काळ पाताळात गडप झाले!

हे पाहून सर्व लोक अवाक् झाले. काहीजण सीतेकडे पहात राहिले तर काही रामाकडे. थोडयाच वेळाने तेथे कोलाहल माजला. वानरे रडू लागली. ऋषिमुनि म्हणू लागले—'सीतादेवी अपूर्व साध्वी आहे!'

हातातील काठीवर आपला भार देत डोके खाली घालून श्रीराम थोडा वेळ अश्रू ढाळत राहिले. नंतर अचानक त्यांच्या तोंडातून उद्गार निघाले—"हे भूदेवी, आजपर्यंत मी इतके मानसिक क्लेश व दुःख अनुभवले नाही. माझी सीता मला परत दे, नाहीतर मलाही मुक्ति दे, अरे, कोण आहे तिकडे? माझे धनुष्यबाण आणा, मी पृथ्वीच फोडून काढतो!"

यावर सर्वांनी रामचन्द्रांचे सांत्वन केले. लव-कुशांना घेऊन वाल्मिकी आपल्या पर्णशाळेत परतले. सीतेचे स्मरण करत त्यांनी ती रात्र घालवली.

दुसऱ्या दिवशी सभेच्या सुरुवातीला लव-कुशांनी उत्तर-रामायण गाऊन दाखवले आणि याबरोबरच यज्ञाची समाप्ति झाली. यज्ञाला आलेल्या लोकांचा उचित सत्कार करून आपल्या पुत्रांसह श्रीरामचन्द्र अयोध्येला गेले. पुन्हा विवाह न करता सीतेची सुवर्णमूर्ती बरोबर ठेवून त्यांनी अनेक अश्वमेध व वाजपेय यज्ञ केले. धर्मरक्षण व न्यायपूर्वक राज्य करून त्यांनी जनतेचा आदर संपादन केला. त्यांच्या राज्यात देश संपन्न झाला. अकाल मृत्यु व दुःख-कष्ट यांचे नावही उरले नाही.

कालांतराने कौसल्या, सुमित्रा व कैकयी या मातांचे प्राणोत्क्रमण झाले. त्यांच्या उत्तरक्रिया करून रामाने दानधर्महीं केला.

काही दिवसांनंतर कैकयीचा बंधु युधाजित यांच्यातर्फे गार्ग्य दहा हजार अश्व भेटीदाखल घेऊन रामचन्द्रा कडे आला व



म्हणाला—"आपल्या मामांनी आपणास एक गोष्ट कळवण्याची मला आज्ञा दिली आहे. सिन्धु नदीच्या दोन्ही तटांवर वसलेला गांधर्वदेश अत्यंत सुशोभित आहे. तेथे शैलूष जातीचे तीन कोटी बलवान असे लोक रहात आहेत. त्यांना जिंकून आपण तो देश आपल्या आधिपत्या खाली आणावा. आपल्या हितचिन्तनासाठी च त्यांनी हा संदेश माझ्यातर्फे पाठवला आहे."

सर्व ऐकून रामचन्द्राने म्हटले—"ठीक आहे. ऐक—भरताचे पुत्र तक्ष आणि पुष्कर यांच्याबरोबर खुद्द भरत आणि कांही सैन्य मी पाठवीन. भरत गंधर्वांचा पराभव करून राज्याचे दोन भाग करून, आपल्या



दोन पुत्रांना ती राज्ये देऊन परत येईल."

रामाच्या आज्ञेप्रमाणे सेनेसह पंधरा दिवसांचा प्रवास करून भरत कैकेय देशात पोचला. युधाजिताला भेटून त्यालाही घेऊन युद्धासाठी तो गंधर्वदेशाकडे निघाला. गंधर्वांचा पराभव करून त्याने तक्षाला 'तक्षशीला' व पुष्कराला 'पुष्कलावती' नावाची नगरे स्थापन करून देऊन त्यांच्याबरोबर पांच वर्षे राहून भरत अयोध्येला परतला.

आता लक्ष्मणाचे पुत्र अंगद व चन्द्रकेतु यांच्यासाठी राज्याची सोय करायची होती. रामाने लक्ष्मणाला यांच्यासाठी राज्याची निवड करण्याचा आदेश दिला. लक्ष्मणाने 'कारुपथ' देशाचे नाव सुचवले. नंतर असे ठरले की 'कारुपथ' अंगदाला व 'चन्द्रकांत' नावाचा देश चंद्रकेतुला सोपवावा. अंगदाबरोबर लक्ष्मण व चन्द्रकेतु बरोबर भरत असे जाऊन सर्व सोय करून अयोध्येला आले.

दिवस जात राहिले. एके दिवशी यमराज मुनिवेषांत रामचन्द्राच्या महाली प्रविष्ट झाले. लक्ष्मणाला पाहून ते म्हणाले– "लक्ष्मणा, रामचन्द्राला जाऊन सांग की एका महान महर्षींचा दूत राजपथावर तुझी प्रतीक्षा करीत आहे."

लक्ष्मणाकडून ही वार्ता ऐकून रामाने त्या मुनिला आत पाठविण्याची आज्ञा दिली.

रामाने यमराजाला अर्घ्य देऊन त्याची पाद्यपूजा केली. "रामचन्द्रा, आपल्याला एकांतात कांही बोलायचे आहे. बोलत असताना मधेच कोणी आत आले तर त्याला मृत्युदण्ड द्यावा लागेल–याला तुझी संमति असेल तरच माझ्या येण्याचा हेतु मी तुला सांगेन." यमराज म्हणाला.

रामचन्द्राने ही अट मान्य केली व म्हणाला–"लक्ष्मणा, प्रतिहारीला पाठवून देऊन तूच दारावर उभा रहा. ऐक, मधे कोणी आत आला तर मृत्युदण्ड निश्चित, सावधान!"



यमराज सांगू लागला–"रामचंद्रा, मी यमराज आहे. ब्रह्मदेवाचा निरोप घेऊन तुझ्याकडे आलो आहे. त्यांनी तुला कळवण्यास सांगितले की–तू रावणाचा संहार करण्यासाठी अवतार घेतलेला प्रत्यक्ष महाविष्णु आहेस. पृथ्वीवरील तुझे कार्य आता संपले आहे. तुझ्या इच्छेला वाटेल तेव्हां आता तू स्वर्गलोकी परतावेस."

मंदहास्य करीत रामचन्द्र म्हणाले– "आपल्या आगमनाने मला फार आनन्द झाला. मी जेथून आलो तेथे जायला तयार आहे."



या प्रकारे त्यांचा वार्तालाप चालू असतानाच मुनि दुर्वास तेथे आले व 'रामचन्द्राला भेटायचे आहे' असे म्हणू लागले.

लक्ष्मण म्हणाला–"मुनिवर आपले काम माझ्याकडून होण्यासारखे असेल तर सांगा. माझे बंधु आवश्यक कामात निमग्न आहेत."

दुर्वास क्रोधित होऊन म्हणाले–"तू मला तावडतोब रामाकडे घेऊन गेला नाहीस तर शाप देऊन मी तुझ्या वंशाचे निर्मूलन करून टाकीन." लक्ष्मणाने विचार केला, वंशाचे निर्मूलन होण्यापेक्षा मी एकट्याने मरणे श्रेयस्कर! तावडतोब आत जाऊन रामचन्द्राला त्याने बोलावून आणले.

रामचन्द्र उठून बाहेर येऊन म्हणाले– "मुनिवर, काय आज्ञा आहे?"

दुर्वास म्हणाले–"मला तावडतोब भोजन हवे आहे." रामचन्द्रांनी भोजन दिल्यावर संतुष्ट होऊन दुर्वास निघून गेले.

यानंतर रामचन्द्रांना एकदम यमराजांना दिलेल्या वचनाची आठवण झाली व ते दुःखी झाले. लक्ष्मणाने समजावले–"बंधो, आपण माझी चिन्ता करू नका. माझा वध करून आपल्या वचनाची पूर्तता करा."

रामचन्द्रांनी आपल्या मंत्री, पुरोहितांना बोलवून सर्व वार्ता सांगून त्यांचा सल्ला विचारला.

“रामा, तू लक्ष्मणाचा त्याग कर, त्यागही वधासारखाच आहे—असे शास्त्रवचन सांगते.” त्यांनी सल्ला दिला.

यावर आपल्या महालाकडेही न जाता लक्ष्मण सरळ शरयूतीरावर गेला व श्वास रोखून त्याने योग आरंभ केला. इतक्यात इंद्र अदृश्य रूपाने तेथे आला व लक्ष्मणाला सशरीर स्वर्गात घेऊन गेला. अशा प्रकारे विष्णूचा एक चतुर्थांश परत आला.

यानंतर रामचन्द्राने सभा बोलावून सांगितले—“मीही आता लक्ष्मणामागोमाग निघून जातो. आपण भरताच्या राज्याभिषेकाची तयारी करा.”

हे ऐकून भरत व्याकूळ होऊन म्हणाला—“बन्धो, आपल्याविना हे राज्य मला काय कामाचे? आपण कुशलवांना राज्याभिषेक करा. दक्षिण कोसल देशचा राजा कुश आणि उत्तर कोसल देशचा लव! आपण शत्रुघ्नालाही निरोप पाठवू—की आपणा सर्वांना स्वर्गी जायचे आहे.”

भरताच्या सूचनेप्रमाणे लव-कुशांचा राज्याभिषेक झाला. शत्रुघ्नाकडे दूत रवाना झाला. शत्रुघ्नानेही आपले राज्य आपले दोन पुत्र सुबाहु व शत्रुघाती यांच्यात विभागून दिले व तो अयोध्येला आला. सुग्रीवाने आपले राज्य अंगदाला दिले.

रामचन्द्राच्या महाप्रस्थानाचा आरम्भ झाला. त्यांनी पातळ वस्त्र परिधान केले. मौन स्वीकारून हातात दर्भ घेऊन गंभीरतेने ते चालू लागले. त्यांच्यापाठोपाठ मोठ्या भक्तीने अंतःपुरातील स्त्रिया, भरत, शत्रुघ्न, मंत्री, सेवक व वानर यांनीही त्यांचेच अनुकरण केले.

सर्वजण चालत थोड्या अंतरावरील शरयू-नदीवर पोचले. रामचन्द्रांनी आपले पाय पाण्यात ठेवल्याबरोबर त्यांना ब्रह्मदेवाची हाक ऐकू आली. राम, भरत व शत्रुघ्न यांना विष्णुचे शरीर प्राप्त झाले. विष्णु ब्रह्मदेवापुढे नतमस्तक झाले. त्यावरोबरच त्यांच्यासह आलेले सर्व आपापल्या लोकी गेले. (संपूर्ण)

# करोडपती

कांजीवरमला एक व्यापारी रहात असे. त्याने व्यापारात करोडो रुपये कमवले, लोक त्याला ‘नवकुबेर’ म्हणू लागले. त्याला पुष्कळ मुले-बाळे होती. सर्वांचे विवाह झाले. जावयांनाही त्याने आपल्याच व्यापारात कामे दिली, आणि आपला व्यापार खूप वाढवला. हळूहळू त्याच्या परिवारात भाऊ, मुले, नातवंडे यांची संख्या वाढत गेली आणि त्याच्या घराला एका कचेरीचे स्वरूप आले. आपल्या नातेवाईकांसह वैभवसंपन्न जीवन जगत त्याने सर्व राजसुखे ही मिळवली.

परंतु हा नवकुबेर घराबाहेर पटला की कोणाला फुटकी कवडीही दान देत नसे. पहिल्या नंबरचा कंजूस होता तो! दानधर्म, तीर्थयात्रा, किंवा देवाच्या नावे सुद्धा त्याने काहीही खर्च केला नाही.

एके दिवशी नवकुबेरच्या घरासमोर एक बैरागी येऊन उभा राहिला व त्याने एक वेळच्या जेवणाची मागणी केली.

“अरे चोरा, तू एकदम कुठून टपकलास?” चिडूनच नवकुबेराने विचारले.

बैरागी म्हणाला—“चोर असतो तर मी इथे भीक मागायला कशाला आलो असतो?”

या प्रकारे थोडा वेळ त्यांच्यात बाचाबाची झाली. पण यात आपला वेळ फुकट जात आहे, असे पाहून नवकुबेराने एका नोकराकरवी बैराग्याची हकालपट्टी केली. इतके होऊनही तो बैरागी हट्टाने संध्याकाळपर्यंत तेथेच बसून राहिला.

“तू खुशाल इथे बसून मर, मी काही तुला जेवण-बिवण देणार नाही. पहातोच तू कुठवर इथे बसून रहातोस ते!” नवकुबेराने त्याला धमकी दिली.



बैरागीही घराच्या दरवाज्यापुढे ओळीने तीन दिवस अन् तीन रात्री बसून राहिला. बैरागी एकाद्या वेळी काही शाप वगैरे देईल—असे काही हितचिंतकांनी नवकुबेरला समजाऊन पाहिले. परंतु नवकुबेर घाबरला नाहीच, उलट पुढील दरवाजा बंद करून तो दुसऱ्या दाराने जाऊ-येऊ लागला.

काहीं दिवसांनी पुढील दरवाजा उघडला. तेव्हां बैरागी तेथून नाहीसा झालेला पाहून नवकुबेराला आपला जय झाल्याचा आनंद झाला. परंतु दरवाजा उघडल्याच्या दुसऱ्याच दिवशी बैरागी पुन्हा हजर झाला!

"हा तर शनीसारखा माझ्या मागे लागलाय. त्याला विचार तो पुन्हा का आलाय." असे म्हणून नवकुबेराने नोकराला बैराग्याकडे पाठवले.

"मी यांच्याकडे भीक मागायला नाही आलो. पण मला त्यांच्याशी कांही बोलायचे आहे." बैराग्याने उत्तर दिले

सहा महिनेपर्यंत तरी मला बोलायला वेळ नाहीं असे उत्तर नवकुबेराने पाठवले. यावर बैरागी निघून गेला, पण पुन्हा सहा महिन्यांनी हजर झाला! नवकुबेराने पुन्हा असेच वायदे केले, परंतु प्रत्येक वेळी बैरागी मोठ्या सहनशीलतेने उपस्थिती देत राहिला. अशा प्रकारे एक वर्ष निघून गेल्यावर नाइलाजाने नवकुबेराने त्याचे बोलणे ऐकून घ्यायचे ठरवून त्याला बोलावून घेतले.

"मी एक वर्षभर तुझ्या सर्व व्यवहारावर लक्ष ठेवून आहे. तू तुझ्या बायकोमुलांवर विश्वास ठेवतोस. डोळे उघडून सत्य शोधायचा प्रयत्न तू करावास." बैराग्याने त्याला उपदेश दिला.

"ओहो, मी माझ्या सग्या सोयऱ्यांशी सर्व संबंध तोडावेत म्हणून वर्षभर तू माझ्या मागे लागला आहेस होय?" नवकुबेराने विचारले.

"वास्तविक पहाता यापैकी कोणीच तुझं 'आपलं' असं नाहीं. तू जोपर्यंत मिळवून यांना खायला घालशील तोपर्यंतच ते तुझी स्तुति करतील, तुला मान देतील. वाटलं तर मी हे सिद्ध करून दाखवीन." बैरागी म्हणाला.

व्यापाऱ्याने संमती दिल्यावर त्याला काही उपाय सांगून बैरागी निघून गेला.

या घटनेनंतर थोड्याच दिवसात—आपल्याला जणू एकाद्या भयंकर रोगाने ग्रासले आहे असे सोंग नवकुबेराने केले. आपल्या पत्नीला तो म्हणाला—"ऐक, मी आता थोड्याच दिवसांचा सोबती आहे. इतकी वर्षं जगलो, पण एकादंही पुण्यकर्म करायला मला फुरसत मिळाली नाही. अजून एक वर्षानंतर हा मृत्यु आला असता तर काय छान झालं असतं!" असे बोलता बोलताच त्याने मान टाकली.

बायको हे पाहून घाबरून गेली. तिने लगेच वैद्याला बोलाविले. तपासणी करूनही वैद्य रोगनिदान करू शकला नाही व तो तेथून निघून गेला. बैराग्याने सांगितल्या प्रमाणे नवकुबेरही श्वास रोखून मेल्याचा अभिनय करीत राहिला.

त्यांच्या आश्रयाने रहाणाऱ्यांची संख्या जवळजवळ दोनशे होती. ते सर्वजण भोवती जमून रडू लागले. त्यांच्यात स्मशान-बैराग्याच्या गोष्टी हळूहळू सुरू झाल्या. पृथ्वीवर जन्मणाऱ्या प्रत्येकालाच एक न एक दिवस मृत्यु हा अटळच आहे....वगैरे वगैरे.

नेमक्या त्याच वेळी बैरागी लोटाभर दूध घेऊन तिथे आला व त्याने सर्वांना शांत रहाण्याचा आदेश दिला. नंतर



      



म्हणाला–" तुम्हापैकी खरोखरच कोणी या मृत व्यक्तीचा जीव वाचवू इच्छित असाल तर बोला. माझ्याजवळ रामबाण औषध आहे."

नवकुबेराची पत्नी वगैरे सर्वजण लगेच बैराग्याचे पाय धरून याचना करू लागले– "साधुमहाराज, आपण यांना वाचवा. आपण मागाल ते आम्ही देऊ, पण आपलं रामबाण औषध देऊन यांना वाचवा!"

"अरे वेड्यांनो, हे औषध मृत व्यक्तीला उठवू शकते हे खरं. पण उपाय दुसराच आहे–तुम्हापैकी जो कोणी आपलं उरलेलं आयुष्य या शेटजींना द्यायला तयार असेल त्याने पुढे येऊन हे औषध घ्यावे. औषध घेणारा तावडतोब मरेल आणि त्याचे उर्वरित आयुष्य शेटजींना मिळेल. बोला, कोण तयार आहे?"

शेटजींना जिवंत करू इच्छिणारे सर्वजण आता मात्र गप्प बसले. ज्याला त्याला आपला जीव प्यारा! आपलें शिल्लक आयुष्य शेटजींना देण्यासाठी कोणीच तयार नाही. सर्वांची सहानुभूति नुसती वर-वरची. ज्यानें आजपर्यंत प्रेमाने आपलें पालन-पोषण केले, एवढा त्याग केला, त्याला आपले उर्वरित आयुष्य कोण देणार?

"ओहो, या महान माणसाने आत्तापर्यंतचें आयुष्य तुमच्यासाठी वेचले. परलोकात चांगलं स्थान मिळवण्यासाठी एकादं पुण्यकार्य करण्यापूर्वीच यांना मृत्यु आला. तुम्हापैकी कोणीच यांच्यासाठी प्राणार्पण करायला तयार नाही?" बैराग्याने आश्चर्याने विचारले.

"साधुमहाराज, आता माझे डोळे उघडले." असे म्हणत शेटजी एकदम उठून बसले. हे पाहून आश्चर्यचकित होऊन सर्वांनी लाजेने माना खाली घातल्या.

यानंतर मात्र नवकुबेरशेटने सर्व नातेवाईकांना हाकलून दिले. आपली अपार संपत्ति दान, पुण्यकर्मे यात खर्च केली. व्यापाराची जबाबदारी आपल्या मुलांवर सोपवून ते ईश्वरचिंतनांत आपले आयुष्य कंठू लागले.






[८]

ग्रामस्थ लोकांना बरोबर घेऊन परदेशी माणूस गावच्या प्रमुखांना भेटायला निघाला. इतकी मोठी गर्दी पाहून जय-विजय घाबरले.

"आम्हां सर्वांची गावच्या प्रमुखांना भेटायची इच्छा आहे." सर्वच गाववाले एकदम ओरडले.

"का?" जयने विचारले.

"हा परदेशी स्वत:ला महाविष्णु म्हणवतो. हे कितपत खरे आहे हे आम्हाला प्रमुखांकडून जाणून घ्यायचे आहे. जर त्यांनी आम्हाला हे महाविष्णु आहेत असे सांगितले तर आम्ही तुम्हा सर्वांचा निकाल लावू." गाववाले म्हणाले.

भीतीने कापतच जय-विजय घरात गेले आणि प्रमुखांना ही बातमी सांगून म्हणाले– "आता तुम्ही आम्हाला मदत करायला हवी. आपण दोघांनीही-परदेशी हा महाविष्णुच आहे–असे म्हटलेत तर आम्ही तुमच्या डोळ्यादेखत आत्महत्या करू."

आता काय करावे हे प्रमुखांच्या लक्षात येईना. थोडा वेळ गप्प राहून नंतर ते म्हणाले–"तुम्ही दोघांनी आम्हाला मोठ्या संकटात टाकलंय. एकदा आम्हाला प्रियंवदेशी बोलू द्या."

नंतर जय-विजय दोन्ही प्रमुखांना घेऊन जवळच्या एका घरात गेले. दार उघडले– खोलीभर अंधःकार पसरलेला होता. प्रियंवदा एका चटईवर बसून रडत होती.

चिंतापूर्ण चेहऱ्याने प्रमुख खोलीच्या आत गेले. प्रियंवदेने एकदा डोके वर उचलून त्यांच्याकडे पाहिले. तिचा चेहरा









पाहून प्रमुखांना फार वाईट वाटले. "बाळ प्रियंवदा, आमच्या मुळे तुला फार त्रास झाला. तुझे हे दुःख आम्हाला पाहवत नाही. आमच्या मुलांचे प्राण गेले तरी बेहतर, पण आम्ही तुझे प्राण वाचवू." प्रमुख तिला म्हणाले.

प्रियंवदा यावर काहीच बोलली नाही. प्रमुखांनी सारा वृत्तान्त प्रियंवदेला सांगितला आणि म्हणाले–"बाळ, जय आणि विजय फार हट्टी आहेत. ते जे म्हणतील ते करून दाखवतील. तरीही तुझ्या हितासाठी आम्ही त्या परदेशी माणसाला महाविष्णु म्हणायला तयार झालो आहोत."

"मग माझ्याकडे कशाला आलात?" तिने चिडून विचारले.

"तुझे रूप-गुण पाहून आम्हाला असे वाटू लागले आहे की तू खरोखर एक देवीच आहेस. तुझ्यात अनेक अद्भुत शक्ति आहेत. तुझ्या मनात आले तर तू जय-विजयचा शेवट करू शकतेस, परंतु आमच्या मुलांचा संहार आमच्याच हातून घडवायचा तू संकल्प केलेला दिसतो आहे. आम्हीं इतके दारुण दुःख सहन करू शकणार नाही. आमची मुलं मूर्ख असतील तर तू त्यांचा मूर्खपणा घालवून टाक, पण त्यांचा जीव घ्यायचा विचार करू नकोस." छोट्या प्रमुखाने दीनतेने म्हटले.

"तुमच्या मुलांच्या मूर्खपणाला तुम्हीच प्रोत्साहन दिले आहे. लहानपणीच त्यांच्या-वर बंधने घालायला हवी होती. लहानपणी जो वाकू शकला नाही तो मोठेपणी कसा वाकेल?" प्रियंवदा बोलली.

"आम्ही साधारण माणसे! आम्हाला हे विचार समजणें कठीण! तुला वाटलं तर तूच असा उपाय करू शकशील, की ज्यामुळे मुलांचे प्राणही वाचतील आणि परदेशी माणसाशी तुझा विवाहही होईल." लहान प्रमुखाने म्हटले.

थोडा विचार करून प्रियंवदेने विचारले–"समजा मी काही उपाय सांगितला नाहीं तर तुम्ही काय कराल?"

"आम्ही गावकऱ्यांना सांगू की हा परदेशी महाविष्णूचा अवतार आहे, आणि आमच्या तोंडून ही गोष्ट बाहेर पडताच आमची मुले विष खाऊन जीव देतील." मोठा म्हणाला.

"तुमच्या मुलांना काही धोका पोचणार नाही, असा उपाय मी शोधून ठेवला आहे." ती म्हणाली.

नंतर प्रियंवदेने सांगितलेला उपाय नीट सावधपणे ऐकून ते प्रमुख खोलीबाहेर पडले.

घराच्या बाहेर गावकरी उत्सुकतेने बसले होते. त्यांच्यातच तो परदेशीही बसला होता. तो विचार करत होता की–आता नेत्यांनी त्याला 'अवतारी पुरुष' म्हटले नाही तर गावकरी आपली काय अवस्था करून ठेवतील!

जय-विजय थोड्या दूर बसून मोठ्या उद्विग्नतेने विचार करीत होते की–आपल्या







वडिलांच्या तोंडून कोणता निर्णय बाहेर पडतो आहे–त्या दोघांच्याही हातात विषाच्या पुड्या घट्ट पकडून ठेवलेल्या होत्या.

घसा साफ करून मोठा नेता म्हणाला–

"माझ्या गावकऱ्यांनो, आपल्या गावात येऊन अनेक प्रकारे आपल्याला मदत करणाऱ्या परदेशी माणसात अवतारी पुरुषाची सर्व लक्षणे आहेत. पण एवढ्यावरच आपण त्याला 'अवतार' म्हणून प्रमुखाने हा मार्ग सांगितला–

परदेशी आणि प्रियंवदा यांना जवळच्या अरण्यात घेऊन जायचे. ते जेथे उभे असतील तेथून पाचशे मीटर अंतरावर गांवकऱ्यांनी त्यांना घेरून उभे रहावे, म्हणजे त्यांना पळून ही जाता येणार नाही. आता अट अशी की शंभर अंक मोजून होण्यापूर्वी प्रियंवदेसह या माणसाने अदृश्य झाले पाहिजे. तसे न घडले तर प्रियंवदेला जय- विजयाबरोबर विवाह करावा लागेल. आणि हा परदेशी आपले गाव सोडून निघून जाईल.

ही योजना जय-विजय सुद्धा सर्व गावकऱ्यांना पसंत पडली. परदेशी व प्रियंवदा यांच्यापासुन पाचशे मीटरवर गावकरी पहारा देणार आणि अशा स्थितीत परदेशी व प्रियंवदा कसे पळून जाऊ शकतील–आणि ते सुद्धा शंभर अंक मोजण्यापूर्वी?

जय-विजय खूष होते–की आता प्रियंवदेला त्यांच्याशी लग्न करावेच लागेल अन् परदेशी गाव सोडून जाईल. पण त्यांना काय कल्पना की, प्रियंवदा त्या झाडाच्या ढोलीतून पुन्हा राजवाड्यात निघून जाईल!

यानंतर दोन्ही नेत्यांच्या सांगण्याप्रमाणे केले गेले.

"मला माहीत आहे की हा परदेशी 'अवतार पुरुष' आहे. आम्हीं दोघेही आता अदृश्य होऊन थोडा काळ आकाशात भ्रमण करू. तिथे तुमची आठवण रहावी म्हणून आम्हाला थोडे खाद्यपदार्थ द्या."



प्रियंवदेने म्हणून गावकऱ्यांना विनंति केली. प्रियंवदेच्या विनंतीनुसार गावकरी तयारीस लागले. कोणी काय खाद्य पदार्थ तयार करायचे याची योजना ठरली. त्याप्रमाणे प्रत्येक जण घरी जाऊन प्रेमपूर्वक एकेक पदार्थ तयार करून घेऊन आला. सर्व पदार्थांच्या खमंग सुवासाने वातावरण दरवळले. हे सर्व पदार्थ व्यवस्थित बांधून त्यांचे एक गाठोडे तयार करण्यात आले. ते गावकऱ्यांनी प्रियंवदेला दिले.

नंतर प्रियंवदेने, त्यांना दोघांना जिथे सोडायला सांगितले होते, त्या जागी गावकरी त्यांना सोडून पाचशे मीटर दूर जाण्यासाठी निघाले. तेवढ्यात परदेशी म्हणाला.

"आता आपण सर्वजण पाचशे मीटर जाऊन अंक मोजू लागाल आणि त्यानंतर आम्ही आपणाला कधीही दिसणार नाही. म्हणून शेवटचा उपदेश करतो–जनतेची शक्ती ही केव्हाही राजशक्तीपेक्षा जास्त असते. तुमच्यावर कोणी अन्याय करू पाहील तर तुम्ही सर्व एकत्र होऊन त्यांना तोंड द्या. अन्याय सहन करू नका. जय विजय काही तुमच्यापेक्षा जास्त शक्तिशाली नाहीत. त्यांच्यातला राक्षसी अंश मी आपल्याबरोबर घेऊन जात आहे. आपल्या शक्तीच्या बळावर तुम्ही आता त्यांना वाकवू शकाल. आजपर्यंत तुमच्यावर शासन करणारे गावचे दोन्ही प्रमुख यापुढे तुम्हाला सर्व बाबतीत मदत करतील. तुम्ही आता जा. तुमचे कल्याण होईल."

नंतर सर्व गावकरी तिथून निघून गेले. प्रमुखांनी ही मनातल्या मनात–प्रियंवदा व परदेशी यांनी अदृश्य व्हावे अशी इच्छा केली. गाववाले दूर गेल्याबरोबर प्रियंवदा पुढे होऊन परदेशी माणसाला रस्ता दाखवत भुयाराचे दार असलेल्या झाडापर्यंत घेऊन गेली. दोघांनी ढोलीतले भुयाराचे दार उघडून त्यात प्रवेश केला आणि मागे भुयाराच्या दाराला आतून अडसर घातला.

(पुढील अंकी समाप्त)





वडिलांच्या तोंडून कोणता निर्णय बाहेर पडतो आहे–त्या दोघांच्याही हातात विषाच्या पुड्या घट्ट पकडून ठेवलेल्या होत्या.

घसा साफ करून मोठा नेता म्हणाला– "माझ्या गावकऱ्यांनो, आपल्या गावात येऊन अनेक प्रकारे आपल्याला मदत करणाऱ्या परदेशी माणसात अवतारी पुरुषाची सर्व लक्षणे आहेत. पण एवढ्या-वरच आपण त्याला 'अवतार' म्हणून प्रमुखाने हा मार्ग सांगितला–

परदेशी आणि प्रियंवदा यांना जवळच्या अरण्यात घेऊन जायचे. ते जेथे उभे असतील तेथून पाचशे मीटर अंतरावर गावकऱ्यांनी त्यांना घेरून उभे रहावे, म्हणजे त्यांना पळून ही जाता येणार नाही. आता अट अशी की शंभर अंक मोजून होण्यापूर्वी प्रियंवदेसह या माणसाने अदृश्य झाले पाहिजे. तसे न घडले तर प्रियंवदेला जय- विजयाबरोबर विवाह करावा लागेल. आणि हा परदेशी आपले गाव सोडून निघून जाईल.

ही योजना जय-विजय मुद्धा सर्व गावकऱ्यांना पसंत पडली. परदेशी व प्रियंवदा यांच्यापासुन पाचशे मीटरवर गावकरी पहारा देणार आणि अशा स्थितीत परदेशी व प्रियंवदा कसे पळून जाऊ शकतील–आणि ते सुद्धा शंभर अंक मोजण्यापूर्वी ?

जय-विजय खूष होते–की आता प्रियं-वदेला त्यांच्याशी लग्न करावेच लागेल अन् परदेशी गाव सोडून जाईल. पण त्यांना काय कल्पना की, प्रियंवदा त्या झाडाच्या ढोलीतून पुन्हा राजवाड्यात निघून जाईल !

यानंतर दोन्ही नेत्यांच्या सांगण्याप्रमाणे केले गेले.

"मला माहीत आहे की हा परदेशी 'अवतार पुरुष' आहे. आम्ही दोघेही आता अदृश्य होऊन थोडा काळ आकाशात भ्रमण करू. तिथे तुमची आठवण रहावी म्हणून आम्हाला थोडे खाद्यपदार्थ द्या."



# योग्य वारस

राधानगरचा सुदर्शन पटेल एक नंबरचा कंजूस माणूस होता. लोकांत भांडणे लावून देण्याबद्दलही तो प्रसिद्ध होता. आगीत तेल म्हणून की काय, त्याची बायको सुंदरीबाईही तशीच होती. त्यामुळे सुदर्शनला आता पैसा जोडण्याशिवाय दुसरा उद्योगच नव्हता.

सुदर्शनच्या डोक्यात सदासर्वदा हाच विचार घोळत असायचा–आता कोणा-कोणात भांडण लावून द्यावं, अन् कोणाला कोर्टात जायचा सल्ला द्यावा? कोणाला पैशाची जरूर आहे असं वाटलं तर हा स्वत:च त्यांच्याकडे जाऊन पैसे देण्याची तयारी दाखवत असे. पैसे देताना अगदी कमी व्याज घेईन असे म्हणून प्रत्यक्षात मात्र मुद्दलाच्या तिप्पट पैसे वसूल करीत असे !

सुंदरीबाईही भांडी-कुंडी गहाण ठेवून घेऊन पैसे व्याजाने देत असे.

लग्नानंतर पंचवीस वर्षांनी या जोडप्याला मुलगा झाला. आपल्याला वारस मिळाल्याचा दोघांनाही फार आनंद झाला.

आसपासच्या बायकांनी सुंदरीबाईचं अभिनन्दन करीत म्हटलं–"आता बारसं थाटात करा अन् सर्वांना छानशी मेजवानी हवी बरंका !"

यावर दोघा नवरा-बायकोंनी खूपसा विचार केला आणि एक शक्कल काढली– मुलाच्या बारशा-बरोबरच आपल्या लग्नाची रजतजयंतीही साजरी करावी, खूप लोकांना बोलावणं करावं; म्हणजे भेटीदाखल तिघांनाही खूपशा वस्तु आणि पैसे मिळतील.

आपल्याला योजनेप्रमाणे सुदर्शनने संबंध गावाला जेवायला बोलावले. पण गाव-वाल्यांनी त्याचा बेत बरोबर ओळखला. आणि फक्त पाळण्यात झोपलेल्या

बालाच्या हातीच भेटवस्तु देऊन म्हटलें– "पंचवीस वर्षांनी का होईना, छानसा मुलगा झालाय, त्याला मी ही अंगठी देतो." असे म्हणत बऱ्याचशा लोकांनी मुलाला एकएक अंगठीच दिली.

जेवणावळीनंतर रात्री सुदर्शन-सुंदरीबाई भेटवस्तुंवर हिशोब करायला बसले. मनात विचार असा–जेवणावळीचा खर्च जाऊन आपल्याला किती लाभ झाला?

तेवढ्यात सुदर्शनच्या मनात काही शंका आली आणि त्याने एक अंगठी उचलून कसोटीवर घासून पाहिली आणि एकदम ओरडला, 'अरे, आपल्याला बनवलं गेलंय. आपण साफ लुटले गेलो!' त्याने आणखीही काही अंगठ्या घासून पाहून खात्री करून घेतली की त्या सगळ्या खोट्या आहेत! हरामखोर–सर्वजण पोटभर जेऊन गेले आणि मिळाल्या वस्तूंची किंमत कवडीचीही नाही. सर्वांनी मिळून आपल्याला चांगलेच बनविले. सगळ्या भेट-वस्तु खोट्या!

सुंदरीबाईच्याही मनांत एकदम काही शंका येऊन ती उठली अन् घराच्या सगळ्या खोल्या धुंडाळून ओरडत परत आली– "दुष्ट-हरामखोर मेजवानी झोडून जाताना गहाण ठेवलेल्या आपल्या वस्तुही एकएक जण पळवून घेऊन गेले." असं म्हणत ती आपल्याच झिज्या ओढू लागली!

दोघांनी आपल्या नशीबाला दोष देत रडत असतांनाच त्यांना मुलाचे रडणे ऐकू आले.

सुंदरीबाई मुलाला पाळण्यातून काढून शांत करू लागली. एवढ्यात तिचे लक्ष मुलाच्या हाताकडे गेले–एक सोन्याचा दोन पदरी हार मुलाने मुठीत घट्ट पकडून धरलेला होता!

बायकोची हाक ऐकून सुदर्शन खोलीत आला अन् मुलाचा पराक्रम पाहून त्याला फारच आनन्द झाला. तो म्हणाला– "पाहिलंस, आपण खूप ठरवूनही जे करू शकलो नाहीं, ते आपल्या पोराने करून दाखवले. आहे की नाही आपला वारस–सवाई!"



## नैसर्गिक आश्चर्ये :

उत्तर व दक्षिण ध्रुवप्रदेशात रात्रभर आकाश प्रकाशित दिसते. या प्रकाशाला 'अरोरा बोरियालिस' व 'अरोरा अस्त्रायलिस' असे म्हणतात. यामागील शास्त्रीय कारण असे– सूर्यापासून प्रसारित होणारे विद्युत्कण व ध्रुवप्रदेशाच्या जमिनीच्या वरच्या थरातील चुंबकीय क्षेत्र यांच्या संयोगाने हा प्रकाश फैलावतो.



ध्रुवप्रदेशांतील रात्रीचा प्रकाश



### क्वाला अस्वले

ऑस्ट्रेलियातील क्वाला जातीची अस्वले उन्हाळ्यात आपल्या तोंडातील लाळ अंगाला फासून बाहेरील उष्णतेपासून आपले रक्षण करतात.

### वाळवंटातील पाऊस

वाळवंटी प्रदेशावर अनेकदा पाऊस येऊनही तेथील जमीन कोरडीच रहाते. येथील हवेच्या वरच्या थरांत इतकी उष्णता असते की पाऊस जमिनीवर पोचण्यापूर्वीच त्या पाण्याची वाफ होऊन जाते.



## चांदोबातील

### मिकीची साहसयात्रा



जगातले कोणतेही माजर करु शकणार नाही अशी एक यात्रा मिकी नावाच्या एका माजरीने केली. जगान-मधला जुनिचीमुशा नावाचा एक पोलीस अधिकारी ३७० कि. मि. अंतरावरील एका परिचित कुटुंबाला भेटायला गेला असता आपली ही माजरी तिथेच विसरून परत आला. परंतु हा प्रवास करून १०, महिन्यांनी मिकी आपल्या मालकाकडे परत आली.

### स्वप्न साकारले

पश्चिम जर्मनीतला २९ वर्षाचा अँण्ड्रीज भारत व इतर देशांत भ्रमण करायचे स्वप्न पहात असे. परंतु रस्त्या-तल्या एका अपघातामध्ये त्याचे कमरेपासून खालचे शरीर लुळे झाले. पण तो आपले स्वप्न विसरला म्हणता ? नाही. त्याने भारत व इतर देश मिळून ५०,००० कि. मी. चा प्रवास चाकाच्या खुर्चीच्या सहाय्याने पूर्ण केला





### पोलाद कापणारे उत्तम यंत्र

हे यंत्र काय आहे ? पोलादी करवत ? वज्र ? सुरी ? नाही. यापैकी काहीच नाही. यंत्र आहे 'पाणी' ! आवाजाच्या वेगाच्या तिप्पट वेगाने, पाण्याच्या केसा-इतक्या पातळ धाराने आघात करून पोलाद कापता येते - तेही पोलाद कापण्याच्या इतर प्रकारांहून कितीतरी सहजपणे !

### हात लावील तिथे आग !

युक्रेनियातील १३ वर्षाचा एक विद्यार्थी ज्या वस्तुला हात लावील तिला आग लागते. त्याच्या केवळ स्पर्शाने पुस्तके, कपडे, कपाटे आगीच्या भक्षस्थानी पडतात. या मुलाला हॉस्पिटलमधे ठेऊन रशियन शास्त्रज्ञ व डॉक्टर



# निशाकर

दण्डकारण्याजवळ एका मुनिवाटीकेमधे धमिष्ठा नावाची एक स्त्री रहात असे. तिचा मुलगा निशाकर हा मंदबुद्धि, खोडकर व अयोग्य वर्तन करणारा होता.

एक दिवस निशाकर अचानक बेपत्ता झाला. त्याच्या आईने खूप शोध केला पण व्यर्थ !

काही वर्षे निघून गेली. धमिष्ठा एकदा मुनिवाटिकेतून जात असता रस्त्याच्या बाजूला असलेल्या विहिरीतून तिला कुणा माणसाचा आवाज ऐकू आला. विहिरीचे तोंड एका धोंड्याने झाकलेले होते. तिने आश्चर्याने फटीजवळ तोंड नेऊन म्हटले–"विहिरीचे तोंड कोणीतरी दगडाने झाकले आहे."

त्याच वेळी विहिरीतून निशाकराने हाक मारली–"आई !" आपल्या मुलाचा आवाज ओळखून धमिष्ठेने आसपासच्या लोकांना मदतीला बोलावले व धोंडा बाजूला सारून निशाकरला विहिरीबाहेर काढले.

निशाकरच्या खोड्यांना कंटाळून कोणीतरी त्याला विहिरीत ढकलून देऊन वर धोंडा ठेवला. विहिरीत राहून झाडा-वेलीची फळे, कंदमुळे खात आपले दिवस घालवत निशाकर खोल विचारात बुडून गेला – आपली अशी दुर्गति कशामुळे झाली ? अशा प्रकारे ध्यान लावल्याचा परिणाम म्हणून त्याला आपल्या पूर्व जन्मांची माहिती कळू लागली. आणि त्याला समजून आले की पूर्वजन्मींच्या पापांमुळेच आपली अशी दुर्गति झाली. मग काय ? मन पूर्णत: निर्मल होऊन तो विहिरीबाहेर आला. यानंतर त्याने कठीण तप केले आणि तो एक महामुनि व त्रिकालज्ञानी म्हणून प्रसिद्ध झाला.





# ताइताचे महात्म्य

गंगाराम नावाच्या एका डाकूने राज्याचा खजिना लुटला आणि सर्व संपत्ति घरांत एका गुप्त जागी लपवून ठेवली. नंतर चोराला पकडण्यासाठी राजा काय योजना आखत आहे हे आजमावण्यासाठी वेष बदलून तो पुन्हा राजधानीत आला.

डाकू एका धर्मशाळेच्या समोरून जात होता, तेवढ्यात त्याची नजर धर्मशाळेच्या कट्ट्यावर झोपलेल्या एका साधूवर पडली. गंगारामने ऐकले होते की साधु-संतांना काही सिद्धि अवगत असतात आणि त्यांच्याजवळ ज्या काही वस्तु असतात त्या सिद्धिंनी अभि-मंत्रित झालेल्या असतात. या साधूजवळील अशी एकादी वस्तु हस्तगत करावी–या उद्देशाने चोरपावलांनी तो त्या साधूजवळ येऊन शोधू लागला. साधूच्या दंडावर बांधलेला एक ताईत त्याला दिसला आणि हळूच तो सोडून घेऊन त्याने आपल्या दंडावर बांधला.

आणि काय आश्चर्य ! दुसऱ्याच क्षणी तो जोरजोरात ओरडू लागला–मीच तो डाकू गंगाराम ! राज्याचा खजिना मीच लुटला होता !

आपल्या तोंडून आपोआपच सत्य बाहेर पडत असल्याचे पाहून गंगाराम घाबरला आणि त्याने तो ताईत काढून दूर फेकून दिला. परंतु तो तितक्याच गतीने परत येऊन त्याच्या हातावर बांधला गेला. याप्रकारे दोन-चार वेळा घडल्यावर तो कंटाळला. हा गोंधळ चालू असतानाच त्या रस्त्यावरून जाणारे राजाचे शिपाई तिथे पोचले व त्याला पकडून खेचून राजाकडे घेऊन गेले.

शिपायांच्या तोंडून सर्व हकीकत जाणून राजा म्हणाला–"हे पहा, कोणताही चोर असं स्वत:ला चोर म्हणवून घेत नाही. तरीही याच्या घराची झडती घ्या. हा जर



खोटं बोलत असेल तर याचं डोकं कापून ते गडाच्या दारावर टांगून ठेवीन."

राजाच्या आज्ञेने शिपाई गंगारामच्या घरी गेले व लुटलेला माल घेऊनच परत आले.

हे पाहून मोठ्या विस्मयाने राजा म्हणाला–"हा डाकू गंगारामच आहे यात काही संदेह नाही. पण तो ज्या प्रकारे खरं बोलत आहे ते पहाता यामागे कांही रहस्य आहे असं मला वाटतं. ते रहस्य सापडे-पर्यंत याला कैदखान्यात ठेवा.

त्याच दिवशी रात्री पहारेकऱ्यांशी दोस्ती करत गंगाराम त्याला म्हणाला–"हा ताईत मोठा गुणकारी आहे. एकदा आपल्या दंडावर बांधून तर बघ. तुला स्वत:लाच त्याचं महात्म्य कळेल."

पहारेकऱ्याने हातावर ताईत बांधला आणि बोलू लागला–"पहाऱ्यावर असताना मी नेहमी झोपतो, पण अजूनपर्यंत ही गोष्ट कोणाच्या लक्षात आली नाही. कारण असं की–डोळे उघडे ठेऊनच गाढ झोपू शकतो."

पहारेकऱ्याच हे रहस्य कळल्यावर गंगाराम मध्यरात्री तुरुंगाचे गज वाकवून पळून गेला.

सकाळ होताच पहारेकऱ्याला खरा प्रकार कळला आणि राजाकडे जाऊन त्याने कबुली दिली–"महाराज, गंगाराम डाकू पळून गेला आणि हे सर्व माझ्यामुळेच झाले."

पहारेकऱ्याचे बोलणे ऐकून राजाने रागावून विचारले–"तू त्याला का पळून जाऊ दिलेस?"

"प्रभु, त्याने माझ्या हाती जो ताईत दिला त्याच्या प्रभावामुळे मी आपल्या मनची गोष्ट त्याला सांगितली." असे म्हणून ताईत काढून त्याने राजाच्या हाती दिला.

"राजाने ताईत दूर फेकून दिला, पण तो परत येऊन राजाच्या हाताला लपेटला गेला. राजाच्या लक्षात आले की तो दुसऱ्या कोणी हाती घेतल्यासच त्याची सुटका होईल. ही गोष्ट लक्षात आल्या-बरोबर राजाने ठरवले की एक दिवस ताईत आपल्याजवळ ठेवून जनता व राज्य-कर्मचारी यांचे आपल्याबद्दल काय मत आहे हे समजून घ्यायचे.

दुसऱ्या दिवशी राजाने सभा बोलवली. सभासदांपैकी एकाला बोलावून त्याच्या हाताला ताईत बांधला. त्याबरोबर तो माणूस उच्च स्वरात बोलू लागला–"आपण ज्या दिवशी प्रजेवर करांचा जास्त बोजा न टाकता शासन करू लागाल, त्या दिवसा-पासून आम्ही आपणाला खऱ्या अर्थाने एक 'महाराजा' मानू."

यानंतर राजाने ताईत एका शिपायाच्या हातावर बांधला. तो म्हणाला–"आमच्या-कडून कसून काम करून घेऊनही आमच्या कुटुम्बाच्या निर्वाहापुरतेही वेतन न देणाऱ्या राजाची आम्हाला घृणा येते."

शेवटी सेनापतीवर प्रयोग केला तेव्हा तो म्हणाला–"मला विलासी जीवन फार आवडते. मी जर सिंहासनावर बसू शकलो तर मला काय आनन्द होईल!"

या घटनेने राजाचे मन व्याकुळ झाले. त्या रात्री राजाला झोप आली नाही. जनतेच्या कल्याणासाठी अनेक कामे करूनही प्रजेच्या मनात आपल्याबद्दल आदरभाव नाही. राजकर्मचारींना वेळोवेळी वेतनवाढ दिली तरी त्यांना संतोष नाही, राजाबद्दल



इतकी निष्ठा दाखवणारा सेनापतीही मनोमन आपला द्वेषच करतो. काय? यात्र लोकांवर मी इतके दिवस विश्वसलो!... याच गोष्टींच्या विचाराने राजा दुःखी झाला.

सकाळ होताच राजाने मंत्र्याला बोलावून घेतले. त्याला सर्व हकीकत सांगून राजा म्हणाला–"मंत्री महोदय, कुणास ठाऊक का–पण, माझ्या मनात राज्य शासनाबद्दल विरक्ति उत्पन्न होत आहे."

मंदहास्य करीत मंत्री म्हणाला–"प्रभु, या सर्व व्यथांचे कारण तो नतद्रष्ट ताईत आहे. किनाऱ्यावर उभे राहून पाण्याच्या खोलीचा अंदाज घेत रहावा त्याप्रमाणे माणसांच्या मनांतली रहस्ये जाणून घ्यायचा

प्रयत्न करणे-ही आपली चूक आहे. आपण सर्वात अगोदर त्या ताईतापासून आपली सुटका करून घ्या. मग सर्व काही आपो-आपच ठीकठाक होईल"

राजाला हा सल्ला रुचला. त्याने सभेतील प्रत्येकाला बोलावून ताईत ग्रहण करण्याची विनंति केली. परंतु आतापर्यंत त्याचा महिमा माहीत झाल्यामुळे कोणीही तो ताईत स्वीकारायला तयार होईना.

राजा मनोमन चिडून गेला आणि त्याने नगरात अशा आशयाची दवंडी पिटवली की-जो कोणी हा ताईत हातावर बांधून घेईल त्याला मोठे बक्षिस मिळेल. तरीही कोणी पुढे आले नाही. आता तो ताईत म्हणजे राजापुढील मोठे प्रश्नचिन्ह बनले. राजकाजात राजा सर्वकाळ मग्न असे, पण त्याच्या तोंडून कोणतीही गोष्ट लपून राहीना.

शवटी राजाने मंत्र्याला हे सांगून म्हटले-"महोदय, आता आपणच काही उपाय शोधून काढा."

यावर मंत्र्याने तीन दिवसाची मुदत मागून घेतली आणि तो तेथून निघून गेला.

तिसऱ्या दिवशी एका व्यक्तीला घेऊन मंत्री राजासमोर हजर झाला आणि म्हणाला-"प्रभु, हा माणूस ताईत हातात बांधून घ्यायला तयार आहे. आपण तो याच्या हातावर बांधावा."

राजाने ताईत त्या माणसाच्या दंडावर बांधला, पण त्या माणसाच्या तोंडून एक शब्दही बाहेर पडला नाही. त्याला ठरलेले बक्षिस देऊन राजा म्हणाला-"मी आज-पर्यंत अशाच व्यक्ति पाहिल्या की ज्या ताईत बांधल्याबरोबर मनातल्या खऱ्या गोष्टी खडाखड बोलू लागल्या. आपण तर कोणी महानुभाव दिसता, म्हणूनच या ताईताचा आपल्यावर काहीच प्रभाव पडला नाही."

हे ऐकून मंत्री हंसून म्हणाला-"प्रभु, हा कोणी महानुभाव वगैरे नाही. हा एक मुका माणूस आहे. याच्याशिवाय तो ताईत बांधून घेण्याची हिंमत कोणातच नाही!"






# रसिक ग्रामाधिपती

गुरुकुलात आपले शिक्षण पूर्ण करून विद्याभूषण नावाचा एक तरुण आपल्या गावी परत आला. त्याचे आई-वडील वृद्ध होते, म्हणून शेती-वाडीचे आपले काम करून तो आई वडिलांची सेवा करू लागला.

विद्याभूषण एक अभिजात कवी होता. त्या ग्रामीण वातावरणात त्याला अशी काही प्रेरणा मिळाली की आपल्या विश्रांतीच्या वेळात तो काव्य-रचनेत मग्न राहू लागला. दोन वर्षात त्याने अशा प्रकारे एकून बारा काव्ये लिहिली.

"शेतीवाडीचे काम संभाळून, माता-पित्यांची सेवा करून, दोन वर्षात बारा काव्ये लिहिणे-म्हणजे सामान्य माणसाचे काम नव्हे."-असे म्हणून त्याचे आईवडील नेहमी त्याची स्तुति करीत.

त्यावर विद्याभूषण म्हणे-"रसिक श्रोत्यांच्या प्रशंसेनेच काव्याचे खरे सार्थक होते. आपल्या गावात या काव्याला श्रोता नाही. अन् यामुळेच हळूहळू माझी प्रतिभाही कमीकमी होत चालली आहे."

हे ऐकून विद्याभूषणचे वडील सहानुभूतीने म्हणाले-"बाळा, काव्याला राजाश्रयाचीच खरी आवश्यकता असते. तुझ्या काव्यांतील एक उत्तम काव्य निवडून, राजधानीत जाऊन तू ते राजाला वाचून दाखव."

"बाबा, माझं प्रत्येक काव्य मला चांगलंच वाटतं. माझ्या काव्यांपैकी उत्तम काव्य निवडण्यासाठी मला दुसऱ्या कोणाची तरी मदत हवी. पण या गावात मला मदत करण्यासारखा कोणीही नाही." मुलगा उत्तरला.

"का बरं नाही? आपल्या गावचा ग्रामाधिपती नाही का?" वडील म्हणाले.

काव्याबद्दल थोडीफार अभिरुची असणारी एकच व्यक्ति त्या गावात होती-



ग्रामाधिपती. परंतु हे महाशय फक्त हलक्या-फुलक्या कविता व गीतांचेच भोक्ते होते.

तो वडिलांना म्हणाला–"ग्रामाधिपती खरा रसिक नाही, त्याला आपलं काव्य वाचून दाखवायची माझी इच्छा नाही. वाचून दाखवलं तरी योग्य निवड होणं शक्य नाही."

विद्याभूषणच्या वडिलांना काव्याबद्दल फारशी माहिती नव्हती, परंतु अनुभवाने त्यांचे व्यवहारज्ञान चांगले होते. त्यांनी समजावले–"हे बघ बाळा, बुद्धिमान माणूस समुद्राच्या पाण्यानेही शेती करू शकेल, मूर्खा कडून काव्य रचना करवू शकेल. तू आपल्या बुद्धिचातुर्याने ग्रामाधिपतीला माध्यम बनवून आपलं काम साधून घे."–असे म्हणून त्यांनी मुलाच्या कानात काहीतरी सांगितले.

वडिलांच्या सूचनेप्रमाणे विद्याभूषणने एक एक करून आपली सगळी काव्ये ग्रामाधिपतीसमोर वाचून दाखवली. पहिलं काव्य वाचल्या बरोबरच–"वा, वा! काय अद्‌भुत काव्य आहे. राजमान्यता मिळवायला हेच एक काव्य पुरेसं आहे." असे म्हणत तो स्तुति करू लागला.

तरीही विद्याभूषण म्हणाला–"राजाकडून प्रशंसा मिळवायला कशा प्रकारचं काव्य निवडावं–काही समजत नाही. आपण सहृदय आणि रसिक आहात. तेव्हां या इतर काव्यांबद्दलही आपण आपला अभिप्राय सांगावा." असे म्हणून विद्याभूषणने आपली बाकीची सर्व काव्येही ग्रामाधिपतीला ऐकवली.

विद्याभूषणच्या तोंडून हे ऐकून ग्रामाधिपती फार खूष झाला. त्याने ती सर्व काव्ये लक्ष देऊन ऐकली. परंतु त्यापैकी एकही काव्य पहिला नंबर देण्यासारखे त्याला वाटलं नाही. त्यातलं एक तर अगदीच हलक्या दर्जाचे वाटले.

सर्व काव्ये ग्रामाधिपतीला ऐकवण्यात विद्यापतीने दोन महिने घालवले होते. ग्रामाधिपतीचा अभिप्राय ऐकल्यावर तो आपले काव्य घेऊन राजधानीकडे रवाना झाला. योगायोगाने राजाची भेटही लवकरच झाली.

पाच दिवस राजाने विद्याभूषणचे काव्य ऐकले. आणि त्याची स्तुति करीत राजा म्हणाला–"तुझ्यात महाकवि बनण्याची लक्षणे भरपूर दिसतात. तुझ्या आणखी काही रचना आहेत?"

"प्रभु, मी कित्येक काव्ये केली आहेत. ती माझी काव्ये मला तितकीशी आवडली नाहीत, हे स्वाभाविकच नाही का? आणि आपल्यासारख्या रसिकाला आवडतील अशीच काव्ये निवडणे हे योग्यच नव्हे का? या निवड-कार्यात मला आमच्या ग्रामाधिपतीची खूपच मदत झाली. माझी बाकीची काव्ये या काव्यांच्या तोडीची नाहीत."

विद्याभूषण पुढे आणखी काही बोलणार इतक्यात त्याला मधेच थांबवत राजा म्हणाला–"माझ्यासाठी इतक्या सुंदर काव्यांची निवड करणाऱ्या तुमच्या ग्रामाधिपतीचाही गौरव केला पाहिजे." असे म्हणून राजाने तत्काळ ग्रामाधिपतीला बोलावणे पाठवले.

दुसऱ्या दिवशी ग्रामाधिपतीचा राजाने भव्य सत्कार केला आणि विद्याभूषणने राजाशी ज्या गोष्टी केल्या त्याही त्याला सांगितल्या.

राजाचे बोलणे ऐकून ग्रामाधिपतीला संतोष वाटायला हवा होता, परंतु त्याऐवजी










राजाला तो म्हणाला–"प्रभु, विद्याभूषणने सर्वप्रथम आपल्याला जे काव्य ऐकवले ते मला मुळीच आवडले नव्हते. मी जे काव्य पसंत केले होते ते जर आपण ऐकले असते तर हा सन्मान मला अधिक हर्षदायक वाटला असता."

यानंतर ग्रामाधिपतीला अतिथी-शाळेत पाठवून राजाने विद्याभूषणला जाब विचारला–"ग्रामाधिपतीने ज्या अद्‌भुत काव्याची निवड केली ते सोडून जे काव्य त्याला मुळीच आवडले नाही ते तू मला ऐकवलेस. याचा काय अर्थ?"

"महाराज मी आपणाजवळ इतकेच सांगितले की, काव्य निवडण्यात मला ग्रामाधिपतीची मदत झाली. मी असं तर नाही सांगितलं की–त्याला जे काव्य आवडलं त्याचीच मी निवड केली? ग्रामाधिपतीची आवड कोणत्या युगांतली व कोणत्या शताब्दीतली आहे हे मी चांगले ओळखून आहे. मला हे ही चांगलं माहीत आहे की–त्याला जे काव्य आवडत नाही तेच रसिक काव्यप्रेमी लोकांना खूप आवडते. साहित्यिक मूल्यं असणारे काव्य ग्रामाधिपतीला आवडतच नाही. माझी सगळी काव्यं त्याला जर आवडली असती तर मी आपल्या दर्शनाला आलोच नसतो."

काव्य-निवडीत विद्याभूषणने आपल्या ग्रामाधिपतीचा कसा उपयोग करून घेतला हे समजल्यावर राजा पोट धरधरून हसला. त्याच दिवशी संध्याकाळी अतिथिगृहातून ग्रामाधिपतीला बोलावून आणून "मी तुझा सत्कार केल्यावर तू गप्प बसायला हवे होतेस. झाकली मूठ सव्वा लाखाची!" असे म्हणून राजाने त्याला तेथून परत पाठवून दिले.

यानंतर राजाने 'दरबारी कवि' म्हणून विधाभूषणाला कायम ठेवून घेतले. विद्याभूषणने आपल्या आईवडिलांनाही राजधानीत आणले व तो आपले आयुष्य सुंदर काव्ये रचत रचत मोठ्या आनंदाने घालवू लागला.






[१७]

[अस्वलचर्मधारी उग्रदत्ताला आपला सरदार कंध याच्याकडे घेऊन गेले. एकपादाचा संहार करण्यासाठी राक्षसांच्या मदतीची जरूर आहे–असे कंधाने उग्रदत्ताला सांगितले. कंधाने हेही सांगितले की–एकपादाचा वध करणे सोपे नाही, कारण त्याचे रक्त जो बघेल किंवा तो ज्याचे रक्त बघेल तो मरेल......पुढे वाचा]

व्याघ्रचर्मधाऱ्यांचा नेता एकपाद याच्या अपूर्व शक्ती बद्दलची गोष्ट ऐकून उग्रदत्ताच्या शरीराचा थरकाप झाला. वध केल्यावाचून तो व त्याचे मित्र अग्नि द्वीप सोडून जाऊं शकत नव्हते. शिवाय सामन्त राजा सुदर्शन व त्याची कन्या चन्द्रसेना ही त्या दुष्टांच्या कब्जात अडकली होती. अशा परिस्थितीत अजिबात रक्तपात न करता एकपादाचा वध कसा बरे करता येईल?

"एकदा माझ्या काही अनुयायांनी एकपादाला एकान्तात गाठून कैद केले. पण त्याच्या छातीवर भाला रोखण्यापूर्वीच त्याने मोठ्या चपळाईने स्वतःच्याच चेहऱ्यावर तलवारीने जखम करून घेतली. आणि त्याचे रक्त पाहताच माझे तिथे असलेले सैनिक मरून गेले. खरोखरच त्याला मारणे म्हणजे कठीण समस्या आहे." कन्ध म्हणाला.



"म्हणजे याचा अर्थ असा की त्याच्या समोर जाणेही धोक्याचे आहे. मग त्याला मारायचे तरी कसे?" उग्रदत्ताने निराशेने विचारले.

रुद्राने एकपादाच्या किल्ल्याकडे अर्थपूर्ण दृष्टीने पाहून म्हटले–"एकदा किल्ल्याला आपण वेढा घालू शकलो की याबाबत विचार करू. काही न काही उपाय सापडेलच आणि उग्राक्ष मोठा चतुर आहे."

उग्रदत्त मनात म्हणाला–"या रुद्राच्या मनात असं दिसतंय, की माझ्या पोषक पित्याच्या जिवाला अपाय झाला तरी हरकत नाही, पण मी एकपादाविरुद्ध लढण्यासाठी त्यांची मदत मिळवलीच पाहिजे, शक्तिशाली आणि प्राणपणाने लढणाऱ्या राक्षसांच्या मदतीशिवाय हे भयंकर पक्षी व व्याघ्रचर्मधारी यांचा पराभव करणं शक्य नाही."

उग्रदत्त या विचारांत गढला होता, इतक्यात कन्ध त्याच्याजवळ आला आणि म्हणाला–"तुझा काय विचार ठरला? तुझ्या पोषक पित्याकडे निरोप पाठवून त्यांची मदत मागावी की नाही?"

"कुणाबरोबर निरोप द्यावा? मीच जाऊन येऊ का?" उग्रदत्ताने विचारले.

यावर कन्ध काही उत्तर देण्यापूर्वीच रुद्र पुढे होऊन म्हणाला–"कपिलपुरला जाऊन सर्व वार्ता सांगून मीच मदत घेऊन येतो. हे भयंकर पक्षी व व्याघ्रचर्मधारी यांचा पराभव करण्याची कशी आवश्यकता आहे हे सर्व मी तेथे नीट समजाऊन सांगीन. मला परवानगी द्यावी."

उग्रदत्त व कन्धानेही याला संमती दिली. यावर आपल्या एका अनुयायाला बोलावून–रुद्राला कपिलपुर राज्याच्या जंगलात उतरवून देण्याबद्दल आज्ञा केली. यावर आपली अनिच्छा दाखवत चेहरा वाकडा करून तो सेवक म्हणाला, "महाराज, आपणाला माहीतच आहे की उग्रदत्त व इतरांना व्याघ्रचर्मधाऱ्यांनी पळवून आपल्यापासून तिथले राक्षस व इतर प्रजाही



रात्रंदिवस भयंकर पक्ष्यांची चाहूल घेण्यासाठी पहारा करीत आहे. अशा परिस्थितीत आम्ही तिथे उतरलो तर आमच्याकडून निरोप ऐकण्यापूर्वीच ते आम्हाला मारून टाकतील. त्यांच्याशी सामना देणे आम्हाला शक्य होणार नाही. म्हणून अमळ विचार करूनच आपण आपला निर्णय द्यावा."

क्षणभर विचार करून उग्रदत्त म्हणाला– "असे असेल तर रुद्राला एक काम करावे लागेल. ते म्हणजे–जंगलात उतरण्यापूर्वीच आपली ओळख पटवण्यासाठी त्याने आपल्या वस्त्रांपैकी एकादे वस्त्र खाली टाकावे. मी माझ्या पोषक पित्यासाठी जे पत्र लिहीन ते ही या वस्त्राबरोबर खाली टाकले तर त्यांना खरी परिस्थिती समजेल."

हा उपाय सर्वांना योग्य वाटला. उग्रदत्ताच्या या कल्पनेचे सर्वांना कौतुक वाटले. सर्वांनी मिळून या योजनेप्रमाणे करायचे मान्य केले. यानंतर कन्धाने आपले अनुयायी आणि रुद्राला सकाळीच यात्रेला निघण्यासाठी आवश्यक तयारी करायला सांगितले आणि उग्रदत्ताला बरोबर घेऊन जाऊन त्याची झोपण्याची सोय केली.

• • •



उग्राक्ष आपल्या दुर्गासमोरील जागेत एका मोठ्या शिळेवर मस्तक हातात धरून चिन्तामग्न बसलेला होता. इतक्यात त्याचे दोन सेवक धापा टाकतच तेथे आले व म्हणाले–"महानायक, काहीतरी धोका आहे. आपण एका मोठ्या संकटात आहोत असं दिसतय. काय होईल हे कळत नाही. सगळी गडबड उडून गेली आहे. त्याचं डोकं फिरलय वाटतं!"

"कसला धोका? काय गडबड? ही काय वटवट लावली आहे? वेड तर नाहीं लागलं?" उग्राक्षाने रागाने डोळे वटारत विचारले.

आपल्या नेत्याचा रागाने लाल झालेला चेहरा पाहून ते दोन राक्षस घाबरून गेले. कापऱ्या आवाजात ते बोलू लागले–



"महानायक, अग्निद्वीपवासी काहीजण आपल्या जंगलावरून उडत खाली उतरण्याच्या प्रयत्नात आहेत. आपल्या पहारेकऱ्यांनी त्यांच्यावर बाण फेकले, गदा भिरकावल्या. पण त्यांनी गाठोड्यासारखे काहीतरी खाली टाकले. काय आहे त्यात कोणास ठाऊक? आपल्यावर काही महासंकट आल्यासारख वाटतय! बर, हे टाकून निघून गेले नाहीत. आणि अजूनही ते वर उडतच आहेत."

"कुठे आहे ती वस्तु? इथे आणलीत? काही भयंकर वस्तु असेल तर इथे घेऊन कां आला नाहीत. रिकाम्या हाताने नुसते सांगत काय आलात? जा, घेऊन या ते गाठोडं! पाहू या त्यात काय काय आहे ते!" उग्राक्षाने अजून रागातच विचारले.

"कुठेतरी झाडात ते पडलंय महाराज. आपले लोक ते शोधत आहेत. आम्ही सर्वांनी ते शोधून काढण्यासाठी खूप धावपळ केली. पण अजून ते सांपडले नाही." राक्षस सेवक म्हणाले.

"आणि तुम्ही आपली डोकी ताळ्यावर न ठेवता इथे धावत आलात असंच ना? चला आता तिकडे." हुंकार भरत उग्राक्ष आपल्या सेवकांबरोबर चालू लागला.

उग्राक्ष जंगलात थोडा पुढे जातो तोच त्याला एका उंचवटयाजवळ झाडाखाली काही राक्षस व प्रजाजन कोलाहल करीत उभे असलेले दिसले. एक भयंकर पक्षी झाडांवरून वर्तुळाकार कक्षेत उडत होता. उग्राक्ष आपल्याकडे येत असलेला पाहून गर्दीतून एक राक्षस व दोन प्रजाजन धावत पुढे झाले. राक्षसाच्या हातात एक रंगीत वस्त्र व लाकडी दांडीला गुंडाळलेले पत्र होते.

"महाराज, त्या पक्ष्यावर तीनजण आहेत. पण ते व्याघ्रचर्मधाऱ्यांपैकी नाहीत. दोघेजण अस्वलचर्मधारी आहेत. सांगवत नाही—कदाचित त्या दुष्टांनी आपल्याला दगा देण्यासाठी वेष बदलला असेल. त्याच लोकांनी या वस्तु खाली टाकल्या." असे





म्हणून राक्षसाने त्या वस्तु उग्राक्षाच्या हाती दिल्या.

उग्राक्षाने वस्तु घेऊन चिट्ठी उघडली अन् म्हणाला—"माणसांच्या भाषेतली ही चिट्ठी तू माझ्या हाती देतो आहेस? अक्कल कुठे गेली तुझी? ए माणसा, या तुमच्या रेघोट्या काय आहेत—जरा वाचून दाखव पाहू." असे म्हणून जवळच उभ्या असलेल्या एका माणसाकडे त्याने पत्र दिले.

चिट्ठी वाचून त्या माणसाला फार आश्चर्य वाटले, तो म्हणाला—"महाराज, हे पत्र तुमचा मुलगा उग्रदत्त याने अग्निद्वीपावरून लिहिले आहे. या भयानक पक्ष्यावर बसलेल्या तिघांपैकी एक रुद्र आहे, आणि बाकी दोघे अस्वलचर्मधारी आहेत. ते आपले मित्र आहेत."

"वाहवा! माझा उग्रदत्त जिवंत आहे! पहिल्यापासून माझी खात्री होती की तो कधी न कधी माझ्या अरण्यराज्यात परतेल. अरे, पण तो स्वतः का आला नाही? त्याने या रुद्राला का पाठवले? ठीक आहे, आता त्या पक्ष्यावर बसलेल्या लोकांना खाली उतरायचा संकेत द्या."

उग्राक्षाची आज्ञा ऐकून काही राक्षस व प्रजाजनही झाडांवर व फांद्यांवर चढले व तेथून हात हलवून व हातांत लांबलांब फांद्या घेऊन त्या हलवत पक्ष्याकडे पहात उतरण्यासाठी इशारा करू लागले, तो भयानक पक्षी उग्रक्षापासून थोड्या अंतरावर जमिनीवर उतरला. रुद्र ताबडतोब उडी मारूनच खाली उतरला व आनन्दाने ओरडतच तो उग्राक्षाजवळ धावत आला.

रुद्राला पाहून उग्राक्षाला आनंदाचे भरते आले व त्याने रुद्राला उचलून घेऊन एक-दोनदा प्रेमाने हलवून पुन्हा जमिनीवर ठेवले. आणि आता विचारले—"उग्रदत्त खुशाल आहे ना? त्याच्या विषयी मला खूपच काळजी लागून राहिली होती. तो कोठे आहे, कसा आहे या बाबत मी रात्रंदिवस विचारात होतो. त्याला का










नाही बरोबर घेऊन आलास? अरुद्राची काय वार्ता?"

"उग्रदत्त खुशाल आहे. अरुद्र आणि सामन्तराज सुदर्शनाची कन्या चन्द्रसेना मात्र व्याघ्रचर्मधाऱ्यांच्या कैदेत सापडले आहेत. आता व्याघ्रचर्मधाऱ्यांचा नेता एकपाद याचा वध केल्यावरच हे दोघे आणि उग्रदत्तही सकुशल इथे परतू शकतील. यासाठीच उग्रदत्ताला तुमची मदत हवी." रुद्राने नीट समजावून सांगितले.

"माझ्या मुलाने माझी मदत मागीतली? काय गोष्टी करतो आहेस तू? अरे, मला चुकवून तो पळून जायचं म्हणाला तरी चौदा चौकड्यांतून त्याला शोधून काढून माझ्या किल्ल्यात बन्दी बनवून ठेवीन. पण माझ्यानंतर माझ्या या अरण्यराज्याचा नेता कोण होईल?" उग्राक्ष हुंकार करीत म्हणाला.

उग्राक्ष थोडा शान्त झाल्यावर रुद्राने अग्निद्वीपावरील दोन शत्रुदलांची वार्ता त्याला सांगितली. अस्वलचर्मधाऱ्यांचा नेता कन्ध हा कधी मदत करणार आहे हे ही सांगितले–"आपल्या लोकांना नावेत बसून जावे लागेल. अग्निद्वीपात पोचण्यासाठी दोन दिवस व दोन रात्री प्रवास करावा लागेल. आपल्याला रस्ता दाखवण्यासाठी माझ्याबरोबर एक अस्वलचर्मधारी आलेला आहे. यानंतर मार्ग दाखवायला आलेल्या अस्वलचर्मधाऱ्याला उग्राक्षाजवळ सोडून रुद्र पुन्हा अग्निद्वीपाकडे परतला.

आपल्या सेनेतून पाचशे पराक्रमी योद्धे निवडून त्यांना बरोबर घेऊन उग्राक्ष अग्निद्वीपाकडे रवाना झाला. या पराक्रमी वीरांना वाटेत अनेक संकटांशी सामना करावा लागला. हींस्त्र वन्य श्वापदांनी त्यांना भेडसावले. थोडी उपासमार झाली. ते लोक मोठमोठी अरण्ये, पहाड व नद्या पार करून एका आठवड्याने समुद्रकिनाऱ्यावर पोचले.

राक्षसांपैकी अनेकांनी प्रथमच समुद्र पाहिला. एवढा विशाल सागर पाहून ते एकमेकांच्या कानाशी बोलू लागले– "या महासागराच्या मधे जमीन कशी असेल? नक्कीच कांहीतरी धोका आहे. आपल्याला पाण्यांतच आपले प्राण सोडावे लागतील."

ही गोष्ट कळल्याबरोबर उग्राक्ष रागाने म्हणाला–"तुम्ही जंगली वृक्ष कापून त्यापासून प्रत्येकीत पन्नासजण बसू शकू अशा नावा तयार करा. नावा चांगल्या मजबूत बनविल्या पाहिजेत. वाटेत काही अपघात होता कामा नये. मध्येच खवळलेल्या समुद्राशी ही सामना करावा लागेल. या नावांतून समुद्रांतून तुम्हाला अग्निद्वीपावर पोचावे लागेल. नाहीतर तुमच्या शंकेप्रमाणे तुम्हाला पाण्यात समाधिस्थ व्हावे लागेल."

उग्राक्षाच्या या चेतावणीमुळे राक्षसांना एका बाजूला भय, तर दुसऱ्या बाजूला आत्मविश्वास वाढून त्यांचे साहस वाढू लागले. त्या लोकांनी मुळासकट मोठेमोठे वृक्ष उपटून एकमेकांना बांधून टाकले. अशा प्रकारे मोठमोठ्या डोंग्या (नावा) तयार केल्या.

पुन्हा तयारीनिशी एक दिवस सूर्योदयाबरोबर उग्राक्ष समुद्रपार होण्यासाठी रवाना होणार इतक्यात चित्रसेनकडून एक दूत तेथे येऊन पोचला. दूताकडून उग्राक्षाला समजले की चित्रसेन अग्निद्वीपावरील



वातावरणाशी चांगला परिचित आहे. आपल्या दूताकरवी त्याने हेच कळविले की तो थोडीफार सैनिक सहायता देऊ शकेल.

दूताने उग्राक्षाला सांगितले–"महाराज, चित्रसेन व महाराणीही आपल्या मुलाला व्याघ्रचर्मधाऱ्यांनी पळवल्याची वार्ता कळल्यापासून फार दुःखी आहेत. ते अन्नग्रहण करीत नाहीत. त्यांना नीट झोप ही लागत नाही. सामन्तराज सुदर्शनाची कन्या चंद्रसेना हिचेही अपहरण झाल्याच्या वार्तेने त्यांच्या दुःखात भरच पडली आहे. द्रोही नागवर्म्या बरोबर महाराजांनी जी युद्धे केली त्यात सामन्त-

राज सुदर्शनाने खूप मदत केली. ते महाराणीचे नातेवाईकही आहेत. राजकुमारी चंद्रसेना व युवराज यांचा विवाह झाला तर फारच उत्तम होईल–असा त्यांचा विचार आहे."

दूताच्या गोष्टी ऐकून रुद्राक्ष क्रोधाने थरथरू लागला. एकदा तर दूताला मारण्यासाठी त्याने आपली दगडी गदाही उचलली, पण कसेबसे स्वतःला आवरत तो बोलला–"तो युवराज नाही, उग्रदत्त आहे, माझा मुलगा आहे. त्यांना जाऊन सांग–माझ्या मुलासाठी दुःखी होण्याचा तुमच्या राजाराणीला काहीही हक्क नाही. हां सामन्त कोण? सुदर्शन कोण? मी तर त्याचं नावही कधी ऐकलं नाही. त्याची मुलगी चन्द्रसेना माझ्या उग्रदत्तासाठी योग्य आहे की नाही याचा निर्णय मी घेईन, समजलं? आता तू चालू लाग."

उग्राक्षाला समजावण्याचा प्रयत्न करणे म्हणजे आपल्याच प्राणांशी खेळण्यासारखे आहे–अशा विचाराने तो दूत तेथून पळून गेला. यानंतर उग्राक्षाच्या आदेशानुसार राक्षसांनी नावा समुद्रात थोड्या दूर ओढून नेल्या. पशूंच्या चामड्यांनी बनवलेली पाळे वाऱ्याची दिशा पाहून वर उचलली. सर्वात पुढल्या नावेत मार्गदर्शनासाठी आलेल्या चर्मधाऱ्याने आपले आसन जमवले होते.

राक्षसांच्या नावांनी पूर्वदिशेला एक दिवस व एक रात्र असा निर्वेध प्रवास केला. परंतु दुसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या वेळीच त्यांना समुद्रात दूरवर आकाशाला भिडणाऱ्या आगीच्या ज्वाला दिसल्या. त्याबरोबर काही राक्षस थोड्या आश्चर्याने व भयाने 'अग्निद्वीप, अग्निद्वीप' असे ओरडू लागले. थोड्या वेळाने द्वीपाकडून आपणाकडे पुढेपुढे येत असलेली एक छोटी–काळी आकृति त्यांना दिसली. पाहता-पाहता ती आकृति मोठी होत गेली आणि शेवटी भयंकर पक्ष्याच्या रूपात नावेवर अवतरित झाली.

(पुढील अंकी समाप्त)





# गुणशेखरची गोष्ट

दृढव्रती विक्रमादित्य झाडापाशी आला, झाडावरून प्रेत उतरवून घेऊन नेहमीप्रमाणे स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा त्या प्रेतात असलेल्या वेताळाने विचारले–"राजा, प्रजेच्या सुख-दुःखाची खबर घेत न्यायपूर्वक तू आपले राज्यशकट चालवावयास हवे. ते सोडून मध्यरात्रीच्या या वेळी स्मशानात तू आपला अमूल्य वेळ विनाकारण खर्च करत आहेस. मला तर असा संशय आहे की कोणीतरी दुष्ट विचाराने तुला या कामाला प्रवृत्त केले आहे. नीच व मूर्ख माणसांना मदत करणे कसे धोक्याचे आहे, हे तुला समजावून सांगण्याची गरज नाही. परंतु तुला सावध करण्यासाठी मी गुणशेखरची गोष्ट सांगतो. ऐक.

वेताळ सांगू लागला–अवन्ति देशाचा राजा राज्यपाल याला शौर्यपाल नावाचा

# वेताळाच्या गोष्टी



मुलगा होता. याच्या नावातच फक्त शौर्य, पण खरे तर तो अतिशय भित्रा होता. एक बुद्धिहीन व अर्धवट मुलगा म्हणूनच तो वाढवला गेला—मोठा झाला.

मंत्र्याचा मुलगा गुणशेखर याच्याशी शौर्यपालची मैत्री होती. गुणशेखर केवळ गुणवानच नव्हे, तर बुद्धिमानही होता.

आपल्या बुद्धिमत्तेचा उपयोग तो नेहमी शौर्यपालला करुन देत असे. शौर्यपालावर काही संकट आले की तो गुणशेखरकडे धाव घेई आणि आपली समस्या सोडवी.

राज्यपालाला आपल्या मुलाच्या मूर्खपणाची बरोबर कल्पना होती, म्हणून गुणशेखरला तो नेहमी म्हणे—"बाळा, तू आणि शौर्यपाल सहपाठी आहात. शौर्यपाल भविष्यातला महाराजा, तर तू त्याचा होणारा मंत्री आहेस. शौर्यपालाला उत्तम राजा म्हणून वळण देण्याची जबाबदारी मी तुझ्यावर टाकत आहे."

गुणशेखरही वेळोवेळी शौर्यपालाला साहस, पराक्रम व राजनीति संबंधी गोष्टी सांगत असे, परंतु सर्व पालथ्या घागरीवर पाणी !

त्याच दिवसात गांधार देशच्या राजाकडून राज्यपालाकडे एक निरोप आला. तो संदेश गांधार-राजा सिंहबल याची कन्या कल्याणलतिका हिच्या विवाहासंबंधी होता.

कल्याणलतिकेच्या स्वयंवराची योजना एका नवीन तऱ्हेने करण्यात येणार होती. त्याकरता तीन चाचण्या होत्या. त्यात केवळ उच्च क्षत्रीयवंशीच भाग घेऊ शकणार होते. या संबंधीची सविस्तर माहिती गांधार देशाची राजधानी गार्ग्यपुर येथे मिळणार होती.

विवाहा संबंधी संदेशाबरोबरच कल्याणलतिकेचा फोटोही पाठवला गेला होता. सर्व वृत्तान्त ऐकून राज्यपाल गप्पच बसला. पण राजकुमारीचा फोटो पाहून शौर्यपाल मात्र लुब्ध झाला.

शौर्यपाल गुणशेखरला भेटला व त्याने त्याला विवाहाबद्दलचा संदेश सांगितला.



तो म्हणाला—"मित्रा, कल्याणलतिकेशी विवाह करायची माझी इच्छा आहे. आपण गार्ग्यपुराला जाऊ."

गुणशेखर म्हणाला—"स्वयंवराचे वेळी कशा परीक्षा घेण्यात येतील हे आपल्याला काही माहीत नाही. विचार न करताच गेलो तर निश्चितपणे आपला अपमानच होईल."

"म्हणून तर मी तुला बरोबर यायला सांगत आहे. त्या परिक्षांसंबंधी सविस्तर कळल्यावर जरूर पडली तर तू मला मदत करू शकशील. चल." शौर्यपालने घाई केली.

"तुझ्या वडिलांची परवानगी नको का घ्यायला?" गुणशेखरने विचारले.

"पिताजींना कळले तर ते परवानगी देणार नाहीत." शौर्यपाल म्हणाला.

आता नाइलाज होऊन गुणशेखर शौर्यपालाबरोबर गार्ग्यपुरला जायला निघाला. तेथे पोचल्यावर दोघांनी चाचण्यांसंबंधी सविस्तर जाणून घेतले

कोण्या एका भवनात परीक्षा होतील. त्यातील तीन खोल्यांमधे तीन निरनिराळ्या चाचण्या घेण्याची व्यवस्था केली गेली आहे.

पहिली चाचणी आहे—सापांच्या मधून चालत जाण्याची ! पहिल्या खोलीत खूप साप असतील—इतके की खोलीत पाय ठेवायला सुद्धा जागा मिळणे मुश्किल !



डोके उचलून फूत्कार करणाऱ्या सापांच्या मधून चालत दुसऱ्या खोलीत जावे लागेल.

दुसऱ्या खोलीच्या प्रवेशद्वारावर उभी असलेली एक सखी विचारील—"माफ करा, या विषारी सापांनी आपल्याला काय केले?"

याचे उत्तर दिल्यावरच ती दुसऱ्या खोलीत जाऊ देईल. त्या खोलीत दोन ब्राह्मण बसलेले असतील. पण खरे म्हणजे त्यातला एकच खरा ब्राह्मण आहे. दुसरा इतर वर्णाचा आहे. त्यातला खरा ब्राह्मण कोणता हे ओळखले तर तिसऱ्या खोलीत जायला परवानगी मिळेल.

तिसऱ्या खोलीत भिंतीवर एक चित्र टांगलेले असेल. ते कल्याणलतिकेने स्वतः



काढलेले चित्र आहे. एक सुंदर पुरुष अर्ध्या काळ्या व अर्ध्या पांढऱ्या रंगाच्या घोड्यावर स्वार होऊन, एका फिरत्या चाकावरून घोड्याला मोठ्या कुशलतेने हाकत आहे– असे त्या चित्रात दाखवले आहे.

तिथे पोचणाऱ्या माणसाने ते चित्र काय दर्शवते हे तेथे नेमलेल्या शिपायाला सांगायचे आहे. ते बरोबर असेल तर शिपाई त्या माणसाला कल्याणलतिकेकडे घेऊन जाईल.

हे सारे वर्णन ऐकल्यावर गुणशेखर थोडा वेळ विचार करून म्हणाला–"शौर्यपाल, पहिल्या खोलीत जर पावला-पावलावर साप असतील तर ते नक्की खेळातले सापच असणार. एकाध दुसरा खरा साप असला तरी बिनविषारी असणार."–अशा प्रकारे तीनही चाचण्यात काय उत्तरे द्यावीत हे आणि त्या चित्राचा अर्थही गुणशेखरने शौर्यपालला समजावून सांगितला आणि त्याला परीक्षेसाठी रवाना केले.

शौर्यपाल कापत कापतच सापवाल्या खोलीत पोचला व खोली पार करून दुसऱ्या खोलीजवळ आला.

तेथे असलेल्या, राजकुमारीच्या सखीने त्याला विचारले–"क्षमा असावी, पण विषारी सापांनी आपणाला काही त्रास तर नाही दिला ना?"

शौर्यपाल गर्वाने म्हणाला–"छे, त्या सर्पाकृति माझे काय बिघडवणार?"

यावर सखीने वाकून प्रणाम करून दुसऱ्या खोलीचा मार्ग दाखवला. तेथे दोन ब्राह्मण दर्भासनावर बसून जप करीत होते.

शौर्यपालने त्या दोघांकडे भेदक दृष्टिने पहात म्हटले–"परीक्षेसाठी का होईना, पण राजकुमारीकडून मिळणाऱ्या धनाच्या लोभाने इतर जातीच्या माणसाबरोबर बसणारा ब्राह्मण माझ्या देशातला असता तर मी त्याचे डोकेच उडवले असते."

हे ऐकल्याबरोबर एका ब्राह्मणाच्या चेहऱ्यावर आवेश चढलेला शौर्यपालाला दिसला. तिथे असलेल्या शिपायाला,





त्याच्याकडे बोट करून दाखवत शौर्यपाल म्हणाला–"हाच खरा ब्राह्मण आहे." शिपायाने शौर्यपालाला प्रणाम करून त्याला तिसऱ्या खोलीचा मार्ग दाखवला.

शौर्यपालने तिसऱ्या खोलीत प्रवेश करून तेथे टांगलेल्या चित्राकडे थोडा वेळ लक्षपूर्वक पहाण्याचे नाटक केले, आणि म्हटले–"हे चक्र 'कालचक्र' आहे. सुख-दुःख समान असणारे जीवन दर्शवणाऱ्या घोड्यावर बसून, हातून लगाम निसटू न देता, त्यावर योग्य नियंत्रण ठेवून, काल-प्रवाह यशस्वीपणे पार करणाऱ्या धीरोदात्त पुरुषाशीच तुमच्या देशाची राजकुमारी विवाह करू इच्छिते. चित्राच्या माध्यमातून ती आपले हेच विचार प्रकट करू इच्छिते." हे उत्तर ऐकून तेथील शिपायाने त्याला प्रणाम करून म्हटले–"आपण याच्या मागच्या बाजूस असणाऱ्या खोलीत जावे."

मोठ्या हर्षाने शौर्यपाल तिकडे वळला. परंतु कल्याणलतिकेची भेट होण्यापूर्वीच त्याच्या चाचण्यांमधील विजयाची वार्ता राजकुमारीकडे पोचवली गेली होती.

सापांच्या खोलीत प्रवेश करताना शौर्यपालाचे भयभीत होणे व कापणे गुप्तचरांनी हेरले होते व ते राजकुमारीला कळवले ही होते. त्याच गुप्तचरांनी जेव्हा त्याच्या विजयाची वार्ता दिली, तेव्हा ती



आश्चर्यचकित झाली. तिची स्वतःची बुद्धि अतिशय सूक्ष्म व तीक्ष्ण होती. त्यामुळे तिच्या मनात शंका आली की शौर्यपालाच्या विजयापाठीमागे काहीतरी कारस्थान आहे.

शौर्यपाल विजयगर्वाने राजकुमारीकडे पोचला.

कल्याणलतिका बोलली–"आपल्या विजयाबद्दल मी आपले अभिनन्दन करते. या तिन्ही चाचण्यात उत्तीर्ण होणाऱ्यासाठी आणखी एक परीक्षा आहे.

हे वाक्य ऐकल्याबरोबर शौर्यपालाने रागाने विचारले–"पुन्हा एक परीक्षा?"

राजकुमारीने विनयाने म्हटले–"आपण नाराज होऊ नये. पहिल्या तीन परीक्षात



काढलेले चित्र आहे. एक सुंदर पुरुष अर्ध्या काळ्या व अर्ध्या पांढऱ्या रंगाच्या घोड्यावर स्वार होऊन, एका फिरत्या चाकावरून घोड्याला मोठ्या कुशलतेने हाकत आहे– असे त्या चित्रात दाखवले आहे.

तिथे पोचणाऱ्या माणसाने ते चित्र काय दर्शवते हे तेथे नेमलेल्या शिपायाला सांगायचे आहे. ते बरोबर असेल तर शिपाई त्या माणसाला कल्याणलतिकेकडे घेऊन जाईल.

हे सारे वर्णन ऐकल्यावर गुणशेखर थोडा वेळ विचार करून म्हणाला–"शौर्यपाल, पहिल्या खोलीत जर पावला-पावलावर साप असतील तर ते नक्की खेळातले सापच असणार. एकाध दुसरा खरा साप असला तरी बिनविषारी असणार."–अशा प्रकारे तीनही चाचण्यात काय उत्तरे द्यावीत हे आणि त्या चित्राचा अर्थही गुणशेखरने शौर्यपालला समजावून सांगितला आणि त्याला परीक्षेसाठी रवाना केले.

शौर्यपाल कापत कापतच सापवाल्या खोलीत पोचला व खोली पार करून दुसऱ्या खोलीजवळ आला.

तेथे असलेल्या, राजकुमारीच्या सखीने त्याला विचारले–"क्षमा असावी, पण विषारी सापांनी आपणाला काही त्रास तर नाही दिला ना?"

शौर्यपाल गर्वाने म्हणाला–"छे, त्या सर्पाकृति माझे काय बिघडवणार?"

यावर सखीने वाकून प्रणाम करून दुसऱ्या खोलीचा मार्ग दाखवला. तेथे दोन ब्राह्मण दर्भासनावर बसून जप करीत होते.

शौर्यपालने त्या दोघांकडे भेदक दृष्टिने पहात म्हटले–"परीक्षेसाठी का होईना, पण राजकुमारीकडून मिळणाऱ्या धनाच्या लोभाने इतर जातीच्या माणसाबरोबर बसणारा ब्राह्मण माझ्या देशातला असता तर मी त्याचे डोकेच उडवले असते."

हे ऐकल्याबरोबर एका ब्राह्मणाच्या चेहऱ्यावर आवेश चढलेला शौर्यपालाला दिसला. तिथे असलेल्या शिपायाला,



नंतर तिने गुणशेखरला एका आसनावर बसण्याबद्दल विनवले आणि ती बोलली– "मी ज्या तीन परीक्षा घेतल्या त्यात प्रत्यक्ष भाग घेतल्यावाचूनच आपण विजयी झाले आहात. माझी आपणाला अशी प्रार्थना आहे की विजयश्री बरोबरच आपण मलाही ग्रहण करावे."

गुणशेखर हसून म्हणाला–"जो परीक्षेत प्रत्यक्ष भाग घेतो तोच त्यासाठी अर्जदार किंवा प्रार्थी असतो. उत्तरे माहीत असलेला प्रत्येकजण त्याच्या फलप्राप्तीला लायक असू शकतो, पण हक्कदार होऊ शकत नाही."

हे उत्तर ऐकून विचित्रसे हसून कल्याणसुंदरी तेथून निघून गेली. तिच्या त्या हसण्याचे मर्म काय असावे याचा विचार करीत गुणशेखरही तेथून निघून गेला व शौर्यपालला जाऊन मिळाला.

दोघे जेव्हा राजधानीत पोचले, तेव्हा त्यांच्या तोंडून सर्व गोष्टी ऐकून राज्यपाल जरा वेळ मौन राहिला आणि गुणशेखरला म्हणाला–"उद्या आपण दोघे जंगलात शिकारीला जाऊ, तू तयार रहा."

दुसऱ्या दिवशी सकाळी दोघे जंगलात गेले. एका ठिकाणी राज्यपालने गुणशेखरवर अचानक तलवार उगारली.



या गोष्टीची जणू काही आगाऊ कल्पना असल्याप्रमाणे गुणशेखरने झटकन राजाचा हात वरच्यावर पकडला आणि म्हणाला– "आपल्या मुलाचा मूर्खपणा प्रकट होण्याला कारण गांधार राजकुमारीची तीक्ष्ण बुद्धि आहे, माझा त्यात काही स्वार्थ नव्हता." असे म्हणून त्याने राजाला घोड्यावरून खाली ढकलले व आपला घोडा पुढे दौडवला.

नंतर गुणशेखर सरळ गांधार देशी गेला, कल्याणलतिकेला भेटून त्याने विवाहासाठी आपली संमति कळवली.

राजकुमारी व गुणशेखर यांचा विवाह थाटात, वैभवपूर्ण असा झाला. एका

आठवड्यानंतर आपल्या सासऱ्याचे सैन्य घेऊन गुणशेखरने अवन्ती राज्यावर हल्ला चढवला. राज्यपालाला सहजपणे हरवून त्याच्या सिंहासनावर अधिकार प्रस्थापित केला.

वेताळाने ही गोष्ट ऐकवून म्हटले– "राजा आता तू सांग – या गोष्टीत मूर्ख कोण आहे? अत्यंत भक्ती व आदराने राजपरिवाराची सेवा करणारा गुणशेखर शेवटी राजाचा शत्रु बनला. कल्याणलतिकेशी त्याने विवाह केला. हा अन्याय नव्हे का? गुणशेखरने विवाहाला नकार दिला तेव्हा ती विचित्रसे का हसली? या प्रश्नाचे उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची छकले होऊन पडतील.

यावर विक्रमादित्य म्हणाला– "राज्यपाल आणि शौर्यपाल एकाहून एक मूर्ख आहेत. राज्यपालाच्या मूर्खपणाचे प्रमाण म्हणजे–मुलाच्या मूर्खपणामुळे अपमानित होणे, आणि आपल्या मुलाऐवजी गुणशेखरशी कल्याणलतिकेने विवाहाची इच्छा प्रदर्शित केल्यामुळे गुणशेखरबद्दल मनात असूया बाळगणे. भविष्यकाळांत मंत्री होणाऱ्या बुद्धिमान गुणशेखरच्या हत्येचा प्रयत्न राज्यपालने केला. या कारणामुळेच गुणशेखरच्या मनातली राजभक्ती नाहीशी झाली. एक सामान्य नागरिक म्हणूनच त्याने राजकुमारीशी विवाह केला व आपला देश नीच माणसांच्या हातून वाचवण्याच्या मार्गे लागला. आता राहिली कल्याणलतिकेची गोष्ट. गुणशेखरने तिच्याशी विवाहाला नकार दिला, त्यावेळी तिच्या मनात असा विचार आला की शौर्यपालचा बापही मुलासारखा मूर्ख असेल तर आता गुणशेखरची अवस्था काय होईल? या विचारानेच ती विचित्रपणे हसली. तिच्या हसण्याचे रहस्यच गुणशेखरला मार्गदर्शक ठरले!

असे सांगून राजा मौन होताच प्रेतातील वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर लटकू लागला. (कल्पित)



## मुलांसाठी 'चांदोबा' ची गंमतशीर स्पर्धा

# महान भारतीय परंपरेसंबंधी स्पर्धा

### तीन मजेदार विभागात

| स्पर्धा—१ | स्पर्धा—२ | स्पर्धा—३ |
|---|---|---|
| भारतातील महान् राजे | भारतातील महान् राण्या | भारतातील महान् जोडपी |
|  |  |  |

**१,३०,००० रु. पेक्षा अधिक किमतीची बक्षिसे मिळवा**

**आणि : बंपर बक्षिसे**

११ भाषांपैकी प्रत्येक भाषेतील प्रत्येक

... १०,०००रु. ची शिष्यवृत्ति*

## स्पर्धा क्रमांक ३

(प्रवेश-पत्रिका)

आता, या सहा चित्रांपैकी कोणत्याही एका जोडीचे नाव निवडा आणि 'कारण' या शब्दापुढे १५ पेक्षा अधिक शब्द न वापरता हे वाक्य पूर्ण करा.

"मला .................... आणि ....................
यांची गोष्ट जोडी सर्वांत अधिक आवडते, कारण ....................
....................
...................."

नाव ....................
वय .......... पत्ता ....................
....................

या पानावरील 'चांदोबा स्पर्धा क्रमांक ३' असे लिहिलेले कूपन कापून तुमच्याजवळ काढून ठेवून हे पान आमच्याकडे तावडतोब पाठवून द्या.

चांदोबा स्पर्धा ३
चंदामामा पब्लिकेशन्स
१८८ अर्काट रोड
मद्रास ६०० ०२६

स्पर्धा क्रमांक ३ साठी शेवटची तारीख–डिसेंबर ३१, १९८७

हे लेबल बंपर बक्षिसासाठी जपून

महान भारतीय परंपरेसंबंधी

## हम्पी

चौदाव्या शतकात निर्माण झालेले हम्पी शहर बंगलोरपासून ४०० कि. मि. अंतरावर तुंगभद्रेच्या किनारी वसलेले आहे. हेच शहर विजयनगर-साम्राज्याची राजधानी म्हणून प्रसिद्धीस आले होते.










हरिहरराय नावाच्या राजकुमाराने विद्यारण्य स्वामींचे दर्शन घेऊन त्यांना सांगितले – "स्वामी महाराज, मी इथल्या जवळच्या जंगलात शिकार करीत असता एका ठिकाणी ससे शिकारी कुत्र्यांचा पाठलाग करीत असल्याचे दृश्य पाहिले." यावर विद्यारण्यांनी सुचवले – तेच स्थान राजधानीचे शहर वसविण्यासाठी उत्तम आहे.

यानंतर विद्यारण्यस्वामींनी हरिहरराय व त्याचा भाऊ बुक्क यांना शहरनिर्मिती साठी पुरेसे धन देण्यासाठी देवी भुवनेश्वरीची प्रार्थना केली. प्रार्थनेचे फळ म्हणून त्या रात्री हरिहर व बुक्क यांच्यासमोर आकाशातून सुवर्ण वृष्टि झाली.





प्रथम हरिहरराय व नंतर बुक्क यांनी येथे राज्य केले. सुप्रसिद्ध व्याकरण-कर्ता सायन आणि त्यांचे बंधु माधवाचार्य ह्यांनी त्यांचे मंत्रीपद संभाळले होते.

विजयनगर साम्राज्यावर राज्य करणाऱ्या चार घराण्यात कृष्णदेवरायचे नाव सर्वात अधिक प्रसिद्ध आहे. १५०२ ते १५२९ पर्यंत कृष्णदेवरायने राज्य केले. तो केवळ कुशल शासकच नव्हे, तर साहित्य व विविध कलांचाही भोक्ता होता. त्याने अनेक विशाल इमारती व मंदिरे बांधली.





आपल्या पूर्वजांवर अनेकदा हल्ले करणाऱ्या बिजापुर व बेदरच्या सुलतानांना त्याने धुळीला मिळवले व प्रजेला भयमुक्त करून विशाल विजयनगरात शांतिचे साम्राज्य पसरविले.

इतके होऊनही बिजापुर, गोवळकोंडा, अहमदनगर व बेदरच्या सुलतानांनी एकत्र होऊन विजयनगरावर हल्ला केला. १५६५ मध्ये तालिकोटच्या युद्धात अखेर हम्पी शत्रूच्या ताब्यात गेले. त्यावेळी हल्लेखोरांनी सर्व सुंदर इमारती जमीनदोस्त केल्या.





तेथील सर्वात मोठे मंदिर पट्टाभिराम मंदिर होय. याच्यासमोर विशाल मंडप आहे. अच्युतदेवरायने बांधलेले हे मंदिर आजही शहराच्या अवशेषांच्या मधोमध पहायला मिळते.



विठ्ठल मंदिराच्या प्रांगणात असलेला हा शिलारथ त्या काळच्या शिल्पकलेचा एक उत्कृष्ठ नमुना आहे.





लक्ष्मीनरसिंहाची ही प्रतिमा प्रभावी व विशाल आहे. आजही अशाप्रकारचे शिल्पकलेचे अद्भुत नमुने अवशेषांच्या या भांडारात अन्यत्र पहायला मिळतात.



# गवताचा झगा

अनेक शतकांपूर्वी जपनमधील एक गावात ओटोको नावाचा एक खोडकर माणूस रहात असे. एक दिवस त्याला काही सुचत नव्हते; तेव्हा त्याने बांबूची एक काठी घेतली, गाठींना भोके पाडून त्या बांबूची त्याने एक लांब नळी बनवली आणि ती डोळ्यासमोर धरून त्यातून तो दुर्बिणीप्रमाणे पाहू लागला. तेव्हां त्याला हवेत उडणारी टेंगू जातीची एक डाकीण दिसली.

त्या काळात माणसांना पुष्कळदा अशा टेंगू जातीच्या डाकिणी दिसत असत, परंतु त्यांची छेड काढणे फार धोक्याचे असे. डाकिणीच्या वाटे गेल्यामुळे भयंकर संकटांत सापडल्याच्या अनेक गोष्टी प्रचलित होत्या. म्हणून बहुधा कोणी त्यांच्या नादी लागत नसे. ओटोकोने जी डाकीण पाहिली, तिचे नाक लांब होते. तिच्या खांद्यावर दोन सुंदर पंख होते. वाळलेल्या गवतापासून बनवलेला एक झगा तिने घातला होता. त्या डाकिणीला आपल्याचकडे उडत येताना पाहून, कसेही करून तिचा झगा पळवण्याचा ओटोकोने विचार केला.

डाकीण जेव्हां जमिनीवर उतरली, तेव्हा ओटोको बांबूच्या नळीतून आकाशाकडे पहात काहीतरी बोलत होता– "वाहवा!–अरे!–काय विचित्र आहे!" हे बोलणे ऐकून डाकिणीलाही आपली उत्सुकता आवरेना. ती ओटोकोच्या भोवती उड्या मारत, याचना करीत त्याला म्हणाली–"ए, हे काय आहे? मलाही जरा पाहू दे ना!"

"काय म्हणलीस? हुं:, मी मोठ्या कष्टाने तयार केलेली दुर्बिण तुझ्या हाती देऊ होय? वाहवा! चंद्र काय सुंदर दिसतो! पर्वतही छानच दिसतात! आणि



ऱ्यांची शोभा तर अवर्णनीयच!" ओटोको पुटपुटत राहिला.

चंद्राचे वर्णन ऐकून डाकिणीच्या मनात दुर्बिणीतून चंद्राकडे पहायची उत्सुकता वाढत गेली. तिने ओटोकोला म्हटले—"तू मला दुर्बिणीतून पाहू दिलेस तर मी तुला माझी चप्पल देईन." तो बधेना तेव्हा तिने टोपीचे आमिष दाखवले. पण असे करीत करीत तिने आपला झगा देण्याची गोष्ट करीपर्यंत ओटोको आपला हेकटपणा व ऐट दाखवत राहिला. शेवटी तिच्याकडून झगा घेऊन अन् तिच्या हातावर नळी ठेऊन त्याने तिथून पलायन केले.

डाकीण दृष्टीआड झाल्याबरोबर त्याने गवताचा झगा अंगात घातला. आणि तत्काल तो अदृश्य झाला! त्याच्या अंगावरचा झगाही अदृश्य झाला. आता ओटोकोच्या आनंदाला पारावार राहिला नाही. तो नाचत बागडत गावातल्या मोठ्या गल्लीत पोचला आणि तऱ्हेतऱ्हेच्या चित्रविचित्र गमतीजमती करू लागला. माणसांच्या डोक्यावरची ओझी खाली पाडू लागला. काही दुकानातल्या वस्तूही त्याने अस्ताव्यस्त करून टाकल्या.

रस्त्यावरून जाणारे लोक हा प्रकार पाहून घाबरून गेले. आणि मिळेल तिथे लपून हा चमत्कार पाहू लागले. पाहता पाहता ती गल्ली निर्जन झाली. पण चमत्कार चालूच होते. त्याच वेळी त्या निर्जन रस्त्यावरून एक बडा असामी मोठ्या थाटाने जाऊ लागला. अचानक त्याला जाणवले - आपला डावा कान कुणी-पिळला! तो चिडून मागे वळून पाहू लागला तोच त्याचा उजवा कान पिळला गेला! तो गरकन वळून चोहोकडे पाहू लागला. त्यावेळी दारांच्या छिद्रांमधून पहाणाऱ्या जनतेला भयाबरोबरच हसूही येऊ लागले!

त्याच वेळी एक शेतकरी उंची वस्त्रे खरेदी करून ती हातात घेऊन जात होता.



अचानक त्याचा हातातली वस्त्रे हवेत उडून घाण पाण्याच्या गटारात पडली.

दुसऱ्या एका ठिकाणी नुकतेच पकडलेले मासे विक्रीला आले होते. खरेदीला आलेल्या बायका मासे निवडीत होत्या. तितक्यात एक मोठा मासा चटकन् उडून हवेत तरंगू लागला. मासे विकणारा त्याच्या मागे लागला. तो जेव्हा माशाच्या जवळ पोचला तेव्हा तो मासा एकदम धपकन् खाली पडला आणि धुळीने माखून गेला.

अशा प्रकारे काही वेळ खोड्या केल्यावर ओटोको दमला आणि आपल्या घरी गेला. तो दरवाजातून आत आला आणि त्याने गवताचा झगा काढला, त्याबरोबर तो मूळ रूपात दिसू लागला. त्याची आई एकदम दचकली कारण तिने त्याला आत येताना पाहिले नव्हते.

आपला मुलगा झोपल्यावर त्या बाईने गवताचा झगा हातात घेऊन पाहिला. छी: छी: कसला घाणेरडा कचऱ्यातला झगा हा! असे वाटून तिने तो चुलीत टाकला. काही क्षणातच झगा जळून खाक झाला.

जाग आल्यावर ओटोकोने झगा खूप शोधला. आईला विचारल्यावर झग्याची राख झाल्याचे त्याला कळले. ओटोकोला



फार वाईट वाटले. १ण त्याने विचार केला—झग्याचा गुण त्याच्या राखेतही असू शकेल. मोठ्या आशेने त्याने सर्व राख एका टोपल्यात भरली. ती घेऊन घराच्या मागल्या बाजूला गेला. अंगावरचे सर्व कपडे उतरून ती राख तो सर्वांगाला फासू लागला. त्याने पाहिले की जसजसा तो राख लावील तसतसा त्याच्या शरीराचा भाग अदृश्य होत राहिला. त्याला पटले की झग्याचा गुण त्याच्या राखेतही आहे. आता सर्व शरीराला काळजीपूर्वक राख चोपडून ओटोको पूर्णत: अदृश्य झाला!

आपली युक्ति सफल झालेली पाहून त्याला परमानन्द झाला. आता तो मुख्य









रस्त्याकडे वळला. लोकांची खूप गर्दी होती तिथे. अदृश्य रूपाने त्या गर्दीतून जाताना 'साकी' नावाचे दारूचे एक दुकान त्याला दिसले. दुकानदार एका मोठ्या पिपातून दारू काढून गिऱ्हाइकांना देत होता.

पिपाजवळ कोणी नाही अशी संधी पाहून ओटोको नळाजवळ पोचला आणि नळ सोडून घटाघट दारू पिऊ लागला. गटागट प्याल्याचा आवाज मात्र येत होता. हा आवाज कुठून येत आहे हे पहाण्यासाठी दुकानदार जवळ गेला. तेव्हा त्याला दारू पिणारे मनुष्याचे तोंडच फक्त दिसले. कारण दारूमुळे ओटोकोच्या तोंडा जवळील राख पुसली गेली होती! दुकान-दार आश्चर्याने त्या तोंडाकडे पहातच राहिला. एवढ्यात दारूच्या धारा तोंडा-वरून वाहिल्यामुळे त्याची दाढीही थोडी थोडी करीत दिसू लागली.

हे पाहून दुकानदार एकदम ओरडला. घाबरून ओटोको एकदम उठून उभा राहीला, त्याला घाम फुटला! घामामुळे त्याचे शरीर पुसलेल्या चित्रासारखे प्रकट होऊ लागले!

ओटोकोच्या लक्षात आले की–आपले रहस्य उघड झाले! तेव्हा तो दुकानाबाहेर पडून मुख्य रस्त्यावरून पळू लागला. दुकानातले सर्वजण त्याचा पाठलाग करू लागले. बरेच दूर पळून ओटोकोने शेवटी एका कालव्यात उडी मारली. डोके तेवढे पाण्याबाहेर ठेऊन थंडीने अंग कापत तो पाण्यातच उभा राहिला.

पाठलागावर आलेल्या लोकांनी त्याला ओळखून पाण्याबाहेर खेचून काढले व त्याच्या उघड्या शरीरावर कांबळे पांघरले. गावच्या प्रमुखाने विचारले–"ओटोको, तुझी अशी दुर्गति कशामुळे झाली रे?"

ओटोकोला लाज वाटली. त्याने टेंगू डाकिणीचा झगा कसा मिळवला हे लोकांना सांगितले. त्याची हकीकत ऐकून सर्वांची हसून हसून मुरकुंडी वळली. नंतर ते लोक म्हणाले–"तू टेंगू डाकिणीलाच फसवायचा प्रयत्न केलास. कसा रे मूर्ख तू?"






प्राचीन काळी कालनेमी नावाचा एक राक्षस रहात होता. त्याला शंभर हात व शंभर डोकी होती. शंभर शिखरे असणाऱ्या एकाद्या भयानक काळ्या पर्वता-सारखा दिसायचा तो! तो असामान्य शक्तिशाली होताच, शिवाय ब्रह्मदेवाची तपस्या करून त्याने त्याच्याकडून अनेक वर मिळवले होते. आणि याचमुळे तो अत्यंत अहंकारी झाला होता.

त्या काळी देव-दानवांच्यात नेहमीच युद्ध होत असत. त्या युद्धात कधी दानव विजयी होत तर कधी देव! एकदा देवांना युद्धात जय मिळाला व त्यांनी दानवांना मारून पिटाळून लावले. ही बातमी ऐकून कालनेमी रागाने बेभान झाला. त्याने समस्त दानवनेत्यांना एकत्र केले व त्यांना पुन्हा युद्धाला तयार केले. सैन्य एकत्र करून त्यांनी इन्द्रावर हल्ला केला. इन्द्राच्या नेतृत्वासाठी दानव मोठ्या ईर्ष्येने लढले.

या युद्धात कालनेमीने इन्द्राबरोबरच बाकीच्या दिक्पालांचाही फार मोठा पराभव केला. त्यामुळे तीन्ही लोक त्याच्या अमला-खाली आले. देवांचा हा अपमान पाहून सुद्धा श्रीविष्णुंनी मौन धारण केले. कारण त्यांना माहीत होते की–कालनेमीचा मृत्यु अजून जवळ आलेला नाही.

परंतु, कालनेमीच्या मनात मात्र विष्णुनाही जिंकण्याची इच्छा जागृत झाली. एक दिवस विष्णूंना युद्धाचे आव्हान देत तो म्हणाला–"तू आमच्या मधु व

     



कैटभ यांचा संहार केलास. आम्हा दैत्यांचा मुकुटमणी हिरण्यकश्यपु याला तू आपल्या नखांनी फाडून मारून टाकलेस. आमच्या चक्रवर्ती बळीला पाताळात दाबून टाकून तू त्रैलोक्याचा स्वामी झालास. आमच्या दैत्यनारींच्या अश्रुजलाने तू जणू काही तुमच्या देव-देवतारूपी शेतांना वाचवलेस. आता या तुझ्या सगळ्या दुष्कृत्यांचा सूड घेण्यासाठी मी तुझ्याकडे आलो आहे."

"गर्वामुळे तू शेंडाबुडखा नसणारे भाषण करीत आहेस. याचे काय फळ मिळेल माहीत आहे? शूर-वीर कधीही गर्व धरीत नसतो. परंतु ब्रह्मदेवाकडून वर प्राप्त झाल्याने गर्वाने फुगून तू अनेक दुष्कृत्ये केलीस. प्राचीन काळी दानवांची जी दुर्गती झाली तीच वेळ पुन्हा आली आहे. तुझा वध करून देव-देवतांना मी पुन्हा त्यांचे स्थान मिळवून देणार आहे, समजलास?" विष्णूने त्याला इशारा दिला.

हे ऐकल्याबरोबर कालनेमीने क्रोधाने आपली अपूर्व गदा गरुडावर नेम धरून फेकली आणि रुद्रभीषण हुंकार केला. वज्राची एखाद्या पहाडाशी टक्कर व्हावी असा तीव्र आघात करीत ती गदा गरुडाला लागली. हे पाहून महाविष्णूनाही आश्चर्य वाटले. त्यांनी तत्काल गरुडासकट स्वत:चे शरीर खूप मोठे केले आणि कालनेमीवर सुदर्शन चक्र फेकले. त्या चक्राने वेगाने जाऊन कालनेमीची मस्तके व हात छाटून टाकले. तरीही त्या राक्षसाचे शरीर जसेच्या तसे उभेच होते! ते पाहून गरुडाने आपले पंख इतक्या वेगाने फडफडावले की त्या हवेच्या झोताने धक्का खाऊन त्याचे शरीर खाली पडले. हे दृश्य पाहून कालनेमीचे अनुचर राक्षस घाबरून अवाक् झाले व जागच्या जागीच उभे राहिले. ही संधी साधून विष्णूने त्या सर्वांचा संहार केला.

या संहारानंतर ब्रह्म-इंद्रादि देवांनी विष्णूचे दर्शन घेऊन त्यांची स्तुति केली.

महाविष्णूंनी त्यांचे सांत्वन करून म्हटले—"आता यापुढे तुम्हाला राक्षसांचे भय राहणार नाही. निश्चिन्त होऊन तुम्ही आपापल्या लोकात राज्य करा. आता राक्षस तुम्हाला त्रास देण्यास धजणार नाहीत. सत्कृत्ये करण्याचा तुमचा रस्ता आता मोकळा झाला. विविध फल-प्राप्तीसाठी निरनिराळ्या यज्ञांचे आयोजन आता सुरू करा. तुमचे यज्ञ आता निर्विघ्नपणे पार पडतील. परंतु दुष्टबुद्धि राक्षसांच्या हालचालींवर नीट लक्ष ठेवा."

यानंतर क्षीरसागरात जाऊन महाविष्णु आपल्या शेषशय्येवर पहुडले व योगनिद्रेत लीन झाले.

ते निद्रेत असतानाच कृतयुग संपले, त्रेतायुगही संपत आले. अशातच एक दिवस वाढलेल्या प्रजेचा भार सहन होत नाही म्हणून भूदेवीने आक्रोश करायला सुरुवात केली. तो ऐकून सर्व देव ब्रह्मदेवाकडे गेले. त्याला सर्व हकीकत सांगून त्याला बरोबर घेऊन ते महाविष्णुंकडे गेले. आणि त्यांनी महाविष्णुंना योगनिद्रेतून जागे केले.

विष्णूंनी हलकेच डोळे उघडून देवांकडे पाहिले व त्यांना विचारले—"तुम्ही कशासाठी आला आहात? कुशल तर आहात ना? राक्षसांच्या अत्याचारांपासून मुक्त आहात ना?"

ब्रह्मदेवांनी हात जोडून निवेदन केले—"महाराज, राजांच्यात कोणतेही शत्रुत्व













नाही. सत्य व धर्म सुस्थिर आहेत. युगांचा क्रम सुव्यवस्थित चालू आहे. देवकार्ये, पितृकार्ये उत्तम प्रकारे चालू आहेत. सर्वजण व्याधिमुक्त आहेत. मानवांना पूर्णायु मिळत आहे. प्रत्येक नगर व गाव अपार जनसंख्येने भरलेले आहे. परंतु भूदेवि इतका भार सहन करू शकत नसल्यामुळे विलाप करीत आहे. तेव्हां कोणत्याही प्रकारे धर्महानि न होता पृथ्वीचा हा भार कमी होईल असा उपाय आपण करायला हवा. म्हणूनच आमची अशी विनंती आहे की आपण मेरु पर्वतावर येऊन आम्हाला आमचे कर्तव्य समजावून सांगण्याची कृपा करावी."

ब्रह्मदेवाची ही विनंति ऐकून श्री महाविष्णु उठून बसले, आपले अलंकार ठीकठाक केले आणि उभे राहून त्यांनी आपली शंखचक्र आदि आयुधे धारण केली. नंतर गरुडावर बसून पळभरातच मेरुपर्वतावर पोचले. विश्वकर्म्याने बनवलेले एक भव्य सभागृह तेथे होते.

या सभागृहातच एका उच्चासनावर महाविष्णु विराजमान झाले. बाकी सर्वजण आपापल्या स्थानांवर बसले. या सभेत यक्ष, गंधर्व, सिद्ध, विद्याधर, नाग इत्यादि उपस्थित होते.

मोठ्या दुःखी चेहऱ्याने भूदेवीही तेथे पोचली. तिला पाहून सर्वांनी तिची वास्तपुस्त केली. वायुदेवाने हात उचलून सर्वांना शांत होण्याचा इशारा देऊन भूदेवीला तिच्या आगमनाचे कारण सभेपुढे निवेदन करण्याची विनंति केली.

"आपणा सर्वांना माहीतच आहे की राजांची संख्या मर्यादेबाहेर वाढल्यामुळे प्रजेच्या भाराखाली मी दबली जात आहे. हा भार कमी झाला नाही तर मी जगू शकणार नाही. श्री महाविष्णुंनी मनावर घेतले तर हे कार्य सहजपणें सिद्ध होऊ शकेल. आपण सर्व वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध आहातच." भूदेवीने व्याकुलतेने आपली कथा सांगितली.



भूदेवीचे कथन ऐकून सर्व सभासदांनी आपसात विचारविनिमय केला व ते ब्रह्मदेवाला म्हणाले–"भूदेवीची ही व्यथा कमी करणे हे आपणा सर्वांचे कर्तव्य आहे. आपण सर्वश्रेष्ठ आहात, सृष्टिकर्ता आहात. आपण मनावर घेतले तर भूदेवीचे दुःख नष्ट करू शकाल. तिची ही अवस्था पाहून सर्वजणच कष्टी आहोत. सर्वांचे दुःख दूर करणें आपल्या हाती आहे. आपण आमच्यावर एवढी कृपा करावी.

यावर ब्रह्मदेवाने उभे राहून सभासदांना म्हटले–"एके दिवशी संध्याकाळी मी व महामुनि कश्यप समुद्रतीरावर बसून तात्त्विक चर्चा करीत होतो. गंगेच्या संगमामुळे चन्द्रोदयाच्या सुमारास भरती येऊन समुद्र आकाशापर्यंत वर जाऊन आम्ही जेथे बसलो होतो तेथपर्यंत पोहोचला व त्याने आम्हा दोघांनाही भिजवून टाकले. मी हसून त्याला विचारले–"हे तू काय करत आहेस? शांत हो! समुद्र तत्काल शांत झाला व मानवरूपात गंगेसह आमच्या समोर येऊन उभा राहिला. त्यावेळी मी भविष्याबद्दल विचार करून म्हटले–"तू आत्ता आपले राजसी रूप प्रकट केले आहेस, तेव्हा तू आता पृथ्वीवर एका राजाचा जन्म धारण करशील. माझे ऐकून तू तावडतोब शांत झालास, म्हणून तू



'शंतनु' नावाने ओळखला जाशील. या गंगेला आपली पत्नी बनवून तू आपले जीवन घालवशील."

हे ऐकून सागर नम्रतेने म्हणाला–"महाराज, पर्वकालात वायुच्या आघातामुळे फुगून भरती येणे हे तर माझे स्वभाविक लक्षण आहे. यांत माझा अहंकार किंवा दुर्बुद्धीचा काहीही भाग नाही. अशा परिस्थितीत आपण मला शाप देणे कितपत उचित आहे?"

"वत्सा, लोककल्याणाच्या हेतूनेच मी या गोष्टी बोललो. तू पवित्र भरत वंशात जन्म घेशील. या गंगेपासून वसूंना जन्म देऊन वसिष्ठाच्या शापातून त्यांना मुक्त



करशील. यानंतर सत्यवती नावाच्या तरुणीचा वंश वाढवणाऱ्या दोन पुत्रांना जन्म देऊन तू त्या शरीराचा त्याग करशील."

"याप्रमाणे त्या शंतनुचा एक पुत्र विचित्रवीर्य याला धृतराष्ट्र व पंडु नावाचे दोन पुत्र होतील. कालांतराने धृतराष्ट्राला शंभर व पंडूला पाच पुत्र होतील. राज्यलालसेमुळे या शंभर व पाचांमध्ये युद्ध होणार आहे. या युद्धात पृथ्वी-वरील सर्व राजे कामी येतील. अनेक लाख हत्ती, घोडे व सैनिक मृत्युमुखी पडतील. अशा प्रकारे पृथ्वीचा भार कमी होऊन भूदेवी सुखी होईल. कलह उत्पन्न करणाऱ्या कलीचा अंश धृतराष्ट्र पत्नीच्या उदरी व यमाचा अंश पंडु-पत्नीच्या उदरी जन्म घेणार आहेत."

ब्रह्मदेवाच्या तोंडची ही वार्ता ऐकून सर्वांनी त्याची स्तुति केली. त्याच वेळी नारदमुनिही त्या सभेत अवतरित झाले.

नारदमुनींनी वीणावादन करून गाणे म्हटले, श्री महाविष्णु व अन्य देवांना प्रसन्न केले व मग महाविष्णूंना म्हणाले— भगवन, या सर्व देवांनी पृथ्वीवरील सर्व राजांचा अंत करण्याचा जो संकल्प केला आहे तो आपल्या मदतीशिवाय कसा बरे सफल होईल? यासाठी आपल्या एका अंशाने पृथ्वीवर अवश्य जन्म घेतला पाहिजे. हा अंश इतरांना उत्साह व प्रेरणा देईल, तेव्हाच देवांनी योजलेले हे कार्य सिद्धीस जाईल. याशिवाय या देवांच्या अंशापासून उत्पन्न झालेल्या व्यक्तींना अशक्य असे एक कार्य आहे. त्या बाबतीत चेतावणी देण्यासाठीच मी इतक्या घाईने इथे आलो आहे. ते कार्य म्हणजे—देव व असुरांच्या युद्धात जे राक्षस आपल्या हातून मृत्युमुखी पडले, त्या सर्वांनी पृथ्वीवर मानव जन्म घेतले आहेत. श्रीरामाच्या हातून रावणाचा वध झाला. यानंतर त्याचा पुतण्या मधु नामक दैत्य व मधुचा पुत्र लवण या दोघांचा शत्रुघ्नाने श्रीरामाच्या

आज्ञेने संहार केला. शत्रुघ्नाने त्या मधुवन नामक स्थानाचे निर्मूलन करून त्या जागी मथुरा नावाची महानगरी निर्माण केली. मथुरेवर अनेक पिढ्यांनी राज्य करून त्याचा विकास घडवला. सध्या तेथे आदियुगातला कालनेमी याने भोजवंशी राजा उग्रसेन याच्या पुत्राच्या रूपात 'कंस' या नावाने जन्म घेतला आहे. पूर्वजन्मातले संस्कार अजूनही त्याच्या ठायी विद्यमान आहेत. आपल्या पित्याला कैदेत टाकून तो स्वत: राजा बनला आहे. कालनेमीचे सर्व मित्र कंसाच्या सेवकांच्या रूपात जन्म घेऊन कालिन्दी तटावर, वृन्दावनात, मथुरेत व अन्य ठिकाणी पसरलेले आहेत. काही राक्षस प्राग्ज्योतिषपुरात जन्म घेऊन नरकासुराचे सहायक बनून राहिले आहेत. त्या सर्व राक्षसांचा संहार करण्यासाठी आपणास अवश्य मानवावतार धारण करावा लागेल."

हे सर्व ऐकून श्रीविष्णुनी ब्रह्मदेवाकडे वळून विचारले—"मी असा अवतार घेण्यास तयार आहे. हे सृष्टिकर्त्या, मी कुठे जन्म घ्यावा अशी आपली योजना आहे?"

ब्रह्मदेवाने उत्तर दिले—"वरुणाच्या यज्ञाच्या गायी कश्यपाने हरण केल्या. त्याच्या पत्नी अदिति व सुरभि यांनीही गायी परत करायला विरोध केला. वरुणाने माझ्याकडे याबद्दल तक्रार केली. मी कश्यप व त्याच्या पत्नींना मानवजन्म घेण्याचा शाप दिला. तोच कश्यप सांप्रत कंसाच्या गायींचा अधिपति बनला आहे. त्याचे नाव 'वसुदेव'. कश्यपाच्या पत्नीही देवकी व रोहिणी नावाने वसुदेवाच्या पत्नी झालेल्या आहेत. यासाठी आपण आपला अंश दोन भागात विभागून वसुदेवाच्या दोन पत्नींच्या गर्भात त्यांची धारणा करवावी. आपण कृपया एवढे केले म्हणजे पुरे."

महाविष्णु ब्रह्मदेवाच्या या सूचनेने संतुष्ट झाले. सभा समाप्त करून सर्वांना निरोप देऊन ते पुन्हा आपल्या स्थानी क्षीरसागराकडे परतले.





# घोड्याचे भाडे

एका गावात दोन शेतकरी रहात असत. गांवातले सर्वलोक त्यांना चांगल्या प्रकारे ओळखत असत. त्यांच्यातला एक अगदी साधासुधा आणि मंदबुद्धि होता.

दुसरा पक्का लबाड होता. एकदा तावडीत सापडलेल्या माणसाला तो पुन: फसवत रहात असे.

मंदबुद्धिवाला शेतकरी फार गरीब होता. त्याच्याजवळ पुरेसे खायलाही नसे. शेत-कामासाठी त्याच्याजवळ एकादे खेचरही नव्हते. एकदा त्याने आपल्या शेतात कांही कंद तयार केले. ते काढून शहरात विकावे असा त्याचा विचार होता. त्याने आपल्या एका मित्राकडे जाऊन विचारले—"उद्या-पुरते तुझे खेचर मला कामाला देशील?"

"माझे खेचर काल दुपारपासून कुठे गेले आहे त्याचा अजून पत्ता नाही." मित्र म्हणाला.

गावात एका कंजूस माणसाकडे असलेला घोडा मागून घेण्याचा सल्ला त्या मित्राने मंदबुद्धिला दिला.

मंदबुद्धि कंजूस माणसाकडे गेला व त्याला विचारले—"तुझा घोडा मग उद्या-पुरता उधार देशील?"

थोडा वेळ विचार करून त्याने विचारले—"घोडा दिला तर मला काय देशील?"

"छट्, मी फुकट-विकट कोणाला काही देत नाही. माझ्या घोड्याचं भाडं आहे रोजी पंधरा भोपळे!" कंजूस म्हणाला.

"माझ्याकडे सध्या पाचच भोपळे आहेत. बाकीचे दहा मी तुला थोड्या दिवसांनी देईन." मंदबुद्धि म्हणाला.

"ते पाच भोपळे आत्ताच आणून दे. बाकीचे दहा आल्यावर मगच घोडा घेऊन जा." कंजूस माणसाने अट घातली.




मंदबुद्धिने ही अट मान्य केली आणि घरून त्याने पाच भोपळे आणून दिले.

दुसऱ्या दिवशी सकाळी मंदबुद्धिचा मित्र आपले खेचर घेऊन त्याच्या घरी आला आणि म्हणाला–"हे घे खेचर, काल मध्यरात्री ते आपण होऊनच परत आलं· तू आपला माल यावर लादून शहरात घेऊन जा."

"पण मी तर त्या कंजूस माणसाचा घोडा ठरवून आलो." मंदबुद्धि म्हणाला.

"माझं खेचर मिळालय ना, मग आता घोडा कशाला?" मित्र समजावत म्हणाला.

"मी त्याला पाच भोपळे आगाऊ दिलेत. आता मी 'घोडा नको' म्हणालो तरी तो भोपळे परत देणार नाहीच." मंदबुद्धिने आपली अडचण सांगितली

"अरेरे! आपण तर भलत्याच अडचणीत सापडलो. आता काय करावं बरं?" मित्राने काळजी व्यक्त करीत म्हटले.

नेमका त्याच वेळी तो धूर्त-लबाड शेतकरी तेथे आला. सर्व हकीकत ऐकून घेऊन त्याने मंदबुद्धिला सल्ला दिला–"आपल्याला घोड्याची जरूर नाही–असं सांगुन भोपळे परत घेऊन ये–भितोस कशाला? आपण घोडा कामासाठी वापरला तर त्याला पंधरा भोपळे द्यायचे हे कबूल! पण आपण जर घोडा वापरलाच नाही तर त्याला आगाऊ दिलेले पाच भोपळे त्याने आपल्याला परत दिले पाहिजेत. यांत भिण्यासारखे काय आहे. मी तुला मदत करतो हवी तर!"

"मला तर त्याला पाहूनच भीती वाटते बाबा!" मंदबुद्धि म्हणाला

"चल माझ्याबरोबर, पाहू कसे भोपळे परत देत नाही ते!" असं म्हणून तो धूर्त माणूस मंदबुद्धिला बरोबर घेऊन निघाला.

हा तमाशा पहायला म्हणून मंदबुद्धिचा मित्रही बरोबर गेला.

तिघांना बरोबर पाहून तो कंजूस म्हणाला–"बोला, कसं येणं केलंत?"

"घोड्यासाठी आलोय. तुझा घोडा कुठय?" त्या धूर्ताने विचारले.

"तो काय समोर आहे, दिसत नाही? पण बाकीचे दहा भोपळे मिळाल्याशिवाय मी घोडा मुळीच देणार नाही." कंजूस उत्तरला.

"गडबड का करतोस? आम्हाला घोडा बरोबर होईल का नाही–नीट पाहू दे" धूर्त बोलला.

"घोडा बरोबर होईल की नाही–ही काय भानगड? घोडा हा घोडाच आहे. तो बरोबर होतो वगैरे असं काही नसतं." कंजूस म्हणाला.

"बास? तुला फक्त इतकंच माहीत आहे न? आता आम्ही मापून पाहतो." धूर्त म्हणाला.

"पहा रे तुझ्यासाठी कमीत कमी दोन वितींची जागा हवी. मी तुझ्या मागे बसलो तर माझ्या मागे माझी बायको बसू शकेल. मला एक वीत आणि टिचभर इतकी जागा आणि बायकोला दोन वित जागा हवी. आता तुझी बायको तुझ्यापुढे बसेल. तिला दोन विती आणि एक टिचभर जागा लागेल. आणि तुझ्या मुलांनाही जागा हवीच की! तुझी मुलगी लहानच आहे, तिला आपण घोड्याच्या मानेवर बसवू आणि तुझा सर्वात छोटा, तिच्या मांडीवर




बसेल." असे बोलत हाताने मापं घेत तो समजावून सांगत राहिला.

इकडे हे ऐकताना त्या कंजूस माणसाचा जीव अर्धा-अर्धा होत होता. तो एकदम ओरडून म्हणाला–"बास करा हे सगळं. काय डोकं-बिकं फिरलंय काय? घोडा इतक्या सगळ्यांना नेऊ शकेल का?"

"ए, ते घोडा पाहून घेईल, तो त्याचा-प्रश्न आहे. आमचा प्रश्न आहे–आम्ही सर्वजण घोड्यावर बसून तीर्थयात्रा करू शकू की नाही?" धूर्त म्हणाला.

"म्हणजे? तुम्ही सर्वजण माझ्या घोड्यावर बसून तीर्थयात्रा करणार?" आश्चर्याने कंजूस माणसाने विचारले

"आम्हाला थोडा त्रास होईलच, पण घोड्यावरं जागा पुरेशी आहे." धूर्त बोलला.

"वा, वा, बरं झालं आधीच सांगितलंस, माझ्या घोड्याचा जीव वाचला. मी आपला घोडा तुम्हाला भाड्याने देत नाही." कंजूस गरजला.

"तू वचन दिल आहेस, आता ते मोडणं बरोबर नाही...." असं बोलत मंदबुद्धिकडे वळून तो चतुर म्हणाला–"अरे, मी तुझ्या आईला विसरलोच! तिला कुठे बरं वसवावं? शिवाय कोंबड्या अन् बकऱ्या यांच्यासाठी जागा कुठंय्?" निराश होत धूर्त म्हणाला.

आता तर त्या कंजूस माणसाचं डोकंच तापलं! तो ओरडून म्हणाला–"माझ्या घोड्याला मारून टाकायचा विचार दिसतोय तुमचा! वाटेल ते झालं तरी मी माझा घोडा तुम्हा लोकांना देणार नाही."

"तू घोडा दिला नाहीस तर आम्ही कोर्टात खटला भरू, कळलं?" धूर्ताने धमकी दिली.

"तुम्ही आपले पाच भोपळे न्या. मला हा सौदा करायचा नाही." कंजूस म्हणाला.

"आपली अट तर पंधरा भोपळ्यांची होती, तू पांच भोपळ्यांची गोष्ट कशी करतोस? ही तर शुद्ध फसवणूक आहे." धूर्ताने विचारले.

"तुम्ही तर मला पाचच दिले ना?" कंजूसने विचारले.

"तू काय पाच भोपळे घेऊन घोडा सुपूर्त केलास का? पंधरा भोपळे घेऊनच घोडा देण्याची गोष्ट केली होतीस ना? आता तुला व्यवहार मोडायचा असेल तर पंधरा भोपळे दिले पाहिजेत." धूर्त म्हणाला.

कंजूस धावत घरात गेला, पंधरा भोपळे बाहेर आणून म्हणाला–"हे घेऊन जा. तुम्हाला आणि या सौद्यालाही रामराम! माझा घोडा तुम्हाला देण्याची आता माझी मुळीच इच्छा नाही."

यानंतर ते तिघेजण पंधरा भोपळे घेऊन तिथून निघून गेले.





# चांगला वाईट

## [१]

परदेशी व प्रियंवदा यांनी वृक्षाच्या खोडातील भुयारात प्रवेश करून आतून कडी लावली. यानंतर थोड्या वेळाने ग्रामवासी परत येऊन पहातात तो ते दोघेही गायब झालेले होते. त्या सर्वांनी तिथली झाडे-झुडपे व इतर ठिकाणी खूप शोधले, पण त्यांचा कुठेच पत्ता न लागल्याने ते या निर्णयावर पोचले–परदेशी हा कोणी सामान्य माणूस नाही, देवाचा अंश धारण करणारा कोणी अवतारी पुरुष आहे.

या विचित्र घटनेमुळे विस्मित होऊन जय-विजय आता पुढे काय करावे याचा विचार करू लागले, इतक्यात ग्रामवासी लोकांनी त्यांच्यावर एकदम हल्ला केला. आणि त्यांना तेथून हाकलून देत धमकी दिली–"आज पासून दहा वर्षांपर्यंत या शतनन्दन गावाच्या आसपास फिरकलात तर पहा. जीव जाग्यावर रहाणार नाही."

इकडे भुयारात प्रवेश केल्यानंतर यावेळचा प्रवास प्रियंवदेला फारसा त्रासाचा वाटला नाही, कारण एकतर परदेशी बरोबर होता व दुसरे म्हणजे खाण्यापिण्याच्या वस्तुही बरोबर होत्या.

"राजवाड्यात गेल्याबरोबर आपल्याला काय करावे लागेल?" परदेशी माणसाने विचारले.

"या वेळेपर्यंत राजधानीत अफवा पसरलेली असणार की – मला मान्त्रिकाने पळवून नेले. आता मी माझ्या वडिलांना सांगेन की तूच मला त्याचा हातून सोडवून आणलेस. मग ते आपला विवाह करून देतील."



"पण हा तर पूर्ण अन्याय आहे. तू तर पूर्वीच पहारेकरी जय याला विवाहाचे आश्वासन देऊन चुकली आहेस." परदेशी म्हणाला.

"तुला पाहीपर्यंत माझ्या मनात तेच होते. पहारेकऱ्याने माझे प्राण वाचवले होते. उपकाराची फेड म्हणून मी तो निर्णय घेतला होता, पण माझे त्याच्यावर 'प्रेम' असे नव्हते." प्रियंवदा उत्तरली.

थोडा वेळ विचार करून परदेशी म्हणाला—"माझ्या दृष्टीने पहारेकऱ्याशी तुझा विवाह अधिक न्याय्य होईल."

हे ऐकून प्रियंवदेच्या मनाला यातना झाल्या. चिंतित होऊन तिने विचारले—

"माझ्याशी विवाह करणे तुला पसंत नाही का?"

"का बरे पसंत नसेल? तू सांगितले होतेस की तुझा विवाह एका सामान्य माणसाशी होईल—असा तुझ्या जन्मकुंडलीत योग आहे. हे कळल्यापासून एक सामान्य माणूस बनावे अशी इच्छा माझ्या मनात जागृत झाली. आणि या स्वार्थी विचारामुळेच माझ्यात असणाऱ्या अद्भुत शक्ति नाहीशा झाल्या. हिमालयात तप करणाऱ्या माझ्या गुरूंनी मला सांगितले होते की—अपकार करणाऱ्यावर ही तू उपकारच कर. कोणत्याही परिस्थितीत कधीही स्वार्थाचा विचार करू नकोस. पण मी त्यांच्या उपदेशाविरुद्ध वागलो." असे म्हणून परदेशी जरा थांबला व पुन्हा बोलू लागला—"काहीही असो. माझ्यामुळे जयवर अन्याय होता कामा नये."

प्रियंवदा यावर कांही बोलू शकली नाही. तिने मनात असे ठरवले की राजवाड्यात पोचल्यावर जयला बोलवून घ्यायचे, त्याला सर्व हकीकत सांगायची आणि त्याच्याच तोंडून 'मी परदेशीशी विवाह करावा' असे वदवून घ्यायचे. त्याने जर परवानगी दिली नाही तर आपण कोणाशीच, कधीच लग्न करायचे नाही.



काही दिवसांच्या प्रवासानंतर एका रात्री प्रियंवदा आपल्या शयनकक्षात येऊन पोचली. तिने परदेशीला सुचवले की त्याने प्रियंवदेकडून सूचना मिळेपर्यंत भुयारातच रहावे.

यानंतर प्रियंवदेने आपल्या शयनकक्षातली घंटा वाजवली. दुसऱ्याच क्षणी दहा दासी धावत तिच्याजवळ पोचल्या. राजकुमारी परत आल्याची बातमी काही क्षणातच अंतःपुरात पसरली. राजा कीर्तिसेन व राणी कांतिमतीही धावत आले.

राणी कांतिमती प्रियंवदेला मिठीत घेऊन म्हणाली—"माझी राणीबेटी ती! कुठे होतीस इतके दिवस? काय संकट आले तुझ्यावर! सांग ना ग बाळा!"

"आई, ही सगळी एक रामकहाणी आहे. मी ती सावकाशीने सांगेन. अगोदर माझ्या महालाच्या सर्व पहारेकऱ्यांना बोलावून घे." प्रियंवदा म्हणाली.

राजा कीर्तिसेनने ओळखले की राजकुमारी काही विशेष कारणानेच सर्वांना बोलवत आहे.

अंतःपुरावर पहाऱ्यासाठी एकूण वीस पहारेकरी होते. त्या सर्वांना ताबडतोब बोलावले गेले. परंतु त्यात जय नव्हता!

प्रियंवदेने आश्चर्याने विचारले—"पिताजी, यात जय नावाचा एक पहारे-



करी असायला पाहिजे, कुठे आहे तो?" पहारेकऱ्यांच्या सरदाराने सांगितले—"युवराज्ञी, जयच्या लग्नाचा साखरपुडा होणार आहे, म्हणून तो चार दिवसांच्या रजेवर आपल्या गावी गेला आहे. उद्या तो हजर होईल."

हे ऐकून प्रियंवदेला आनंद झाला. दुसऱ्याच क्षणी तिने जांभई देत म्हटले—"मला खूप झोप येत आहे. आता मी विश्रांती घेणार आहे."

यावर सर्वजण तिच्या महालाबाहेर निघून गेले. त्याबरोबर तिने भुयारात लपलेल्या परदेशीला बाहेर बोलावून ही बातमी सांगून विचारले—"आता तरी



माझ्याशी बिवाह करायला तुझी हरकत नाही ना?"

"प्रथम आपल्याला ही गोष्ट माहीत करून घ्यायला हवी की जय हे लग्न स्वतःच्या इच्छेनेच करीत आहे की दुसऱ्या कुणाच्या दडपणाने. आणि दुसरे म्हणजे त्याने स्वतः मनापासून आपणा दोघांच्या विवाहाला संमति दिली पाहिजे." परदेशीने आपली अट सांगितली.

यानंतर प्रियंवदेने त्याला परत भुयारांत पाठवले. दुसऱ्या दिवशी उद्यानात हजर रहाण्याबद्दल जयला निरोप पाठवला गेला.

उद्यानात पोचल्यावर कोणतीच हकीकत न सांगता प्रियंवदेने जयला विचारले–"तू कुशल आहेस ना? मी ऐकले की तुझा विवाह ठरला आहे. खरी गोष्ट आहे ही?"

"खरीच आहे राजकुमारी, आपण मला क्षमा करावी. त्या दिवशी काही विचार न करताच मी आपणाशी काहीतरी बोलून गेलो. या विवाहाबद्दल माझी फार दिवसांपासूनची इच्छा होती. आणि आता तर मुहूर्त ही निश्चित झाला." जयने सांगितले.

यानंतर जयला त्याच्या कामाला पाठवून प्रियंवदा भुयारातल्या परदेशीला भेटली व त्याला जयचा निर्णय तिने कळवला. विचारले–"आता तुझी अट पूर्ण झाली. माझ्याशी विवाहाला तुझी समति आहे?"

यावेळी त्याने विवाहाला मान्यता दिली. यानंतर प्रियंवदा त्याला आपल्या माता-पित्यांकडे घेऊन गेली. तिने खोटेच सांगितले की–"मी भुयाराचा शेवट कुठे आहे हे पहाण्यासाठी गेले होते." परंतु त्यापुढील हकीकत मात्र तिने खरोखरीची सांगितली.

परदेशीने प्रियंवदेला जी मदत केली ते ऐकून राजा फारच प्रसन्न झाला. तो परदेशीला म्हणाला–"तू माझ्या मुलीसाठी आपल्या अद्भुत शक्तींचा त्याग केलास व एक सामान्य माणूस बनलास. मी तुला संबंध राज्य बक्षिस दिले तरी तुझी नुकसानभरपाई मी करू शकणार नाही."

हे ऐकून मंदहास्य करीत परदेशी म्हणाला–"महाप्रभु, अपकार करणारावर उपकार करण्याबद्दल व वाईटाचे चांगले करण्याबद्दल मला जे पुण्य प्राप्त झाले त्याच्या फलस्वरूप मला राज्य व राजकुमारीही मिळत आहे. राजा बनल्यावर स्वार्थ सोडून मी जनतेच कल्याण हेच माझे प्रमुख कर्तव्य समजेन.

राजा कीर्तिसेन थोडा विचार करून म्हणाला–"प्रजेचे कल्याण हेच राजाचे प्रमुख कर्तव्य आहे असे माझेही मत आहे. तू मनसा-वाचा-कर्मणा प्रजाहितासाठी सिद्ध असशील तर त्यासाठी माझ्या अनुमतीची जरूरी आहे असे तुला का वाटले–हे मला समजत नाही. तुझ्या मनात असा संदेह का यावा?"

"आपल्या राज्यात शतनंदन नावाचे मूर्ख लोकांचे एक गाव आहे. एकाद्या राज्यातली प्रजा अशी मूर्ख असेल तर एक गोष्ट सहज लक्षात येते–त्या राज्याचा शासक आपले कर्तव्य योग्य रीतीने बजावत नाही." परदेशीने म्हटले.

"तू माझ्या मुलीशी विवाह केलास की या देशाचा राजा बनणार आहेस. शतनन्दन सारखी आणखीही गावे शोधून तिथल्या प्रजेवर योग्य संस्कार करून त्यांचा मूर्खपणा दूर कर." कीर्तिसेनने आपला विचार मांडला.

परदेशीने विवाहाला संमति का दिली हे प्रियंवदेच्या आत्ता लक्षात आले. या विशाल देशाच्या लोकांना उत्तम नागरिक बनवण्याचा त्याला उद्देश तिला कळला.

त्याबरोबर परदेशीसमोर गुडघे टेकून गद्गद् स्वरात ती बोलली–"आपण सामान्य व्यक्ति नाही आहात. आपले शासन पुढल्या पिढीसाठी 'एक आदर्श' म्हणून राहील."

यानंतर प्रियंवदा व परदेशी यांचा विवाह झाला. 'उपकारसेन' नावाने त्या विशाल देशाचा एक आदर्श शासक म्हणून तो प्रसिद्ध झाला. प्रजेसाठी अनेक कल्याणकारी योजना त्याने अंमलात आणल्या.

(समाप्त)






# दीर्घायुष्याची गुरुकिल्ली

विलासपुरी नगरांत श्वेतनंद नावाचा राजा राज्य करीत होता. एक दिवस आरशात पाहताना त्याला आपल्या चेहऱ्यावर एक-दोन सुरकुत्या दिसल्या. त्याला काळजी वाटू लागली की—आपण आता म्हातारे होत चाललो.

अनेक प्रसिद्ध वैद्यांनी सुरकुत्या घालवण्याचे आश्वासन देऊन राजाला अपार पैसा खर्च करायला लावला, तऱ्हेतऱ्हेची औषधे बनवून दिली. श्वेतनंदनेही मोठ्या विश्वासाने ती औषधे घेतली. तरीही तो जेव्हा आरशांत पाही, तेव्हा आपल्या सुरकुत्या आणखीच मोठ्या झालेल्या त्याला दिसत! यामुळे तो दुःखी व दुर्बळ होत चालला.

एक दिवस मंत्री मुकुन्दवर्माने राजाला म्हटले—"महाराज, आपल्या वयाची पन्नास वर्षेही अजून पुरी झाली नाहीत. आपण असे दुःखी रहावे हे योग्य नाही. माझ्या असे ऐकिवात आले आहे की, सुवर्णनगरमध्ये राहणारा मलयज नावाचा वैद्यराज 'कायाकल्प-चिकित्से'त फार हुशार आहे. आपल्याला 'तरूण दिसावे' असे वाटत असेल तर हाच एक आधार आहे."

श्वेतनंद आपली अनिच्छा व्यक्त करीत म्हणाला—"सुवर्णनगराचा राजा सिंहवर्मा हा आपला प्रबल शत्रु आहे. मलयजाकडून उपचार करून घेण्याला तो जरूर विरोध करील."

"आपण या उपचारासंबंधी गुप्तता राखू. राज्यात कोणालाही याबद्दल काही कळणार नाही. धनिक व्यापाऱ्यांचा वेष करून आपण स्वतःच सुवर्णनगरात जाऊ आणि मलयाजाशी चर्चा करू." मुकुन्दवर्मा म्हणाला.

प्रसाद बर्वे

हा निर्णय घेऊन राजा आणि मंत्री वेष बदलून सुवर्णनगरकडे निघाले. वाटेत गाणे गुणगुणत झाडाखाली बसलेला एक म्हातारा त्यांना दिसला.

त्याचे शरीर कृश झालेले आणि चेहरा सुरकुत्यांनी भरून गेलेला होता. तरीही तो अत्यंत आनंदी, तरतरीत दिसत होता. हे पाहून राजाला फार आश्चर्य वाटले.

त्याने मंत्र्याला विचारले—"याला इतका आनंदी पाहून मला आश्चर्य तर वाटत आहेच पण असूयाही वाटत आहे. आपण आत्ताच त्याच्या प्रसन्नतेचे कारण जाऊन घेऊ."

असा निश्चय करून दोघेही त्या वृद्धाजवळ पोचले. राजा श्वेतनंदाने त्याला विचारले—"तुम्ही तर अगदी वृद्ध दिसता. तरीही एखाद्या तरुणासारखे आनन्दी दिसत आहात, गाणे गात आहात, हे कसे काय?"

तीक्ष्ण दृष्टीने राजाकडे रोखून पहात तो विचारू लागला—"मी काय म्हातारा झालोय? तू हे निश्चितपणे कसे म्हणू शकतोस?"

श्वेतनंद हसून म्हणाला—"तुझ्या चेहऱ्यावरील सुरकुत्या व वठून गेलेले शरीर पाहून कोणीही सहजपणे तू अगदी म्हातारा आहेस हे ओळखू शकेल."



"चेहऱ्यावर सुरकुत्या! वठलेला देह! ही चिन्हे तर मी साठ वर्षाचा असतानाच म्हणजे चाळीस वर्षांपूर्वी—एक दोन वेळा आरशात पाहिली होती पण त्यानंतर मला तर त्याची आठवण सुद्धा नाही." वृद्ध उत्तरला.

हे ऐकून श्वेतनंदाने आश्चर्याने विचारले—"म्हणजे? आता तुमचे वय शंभरपेक्षा अधिक आहे?"

वृद्धाने मान हलवून स्वीकृति दर्शविली. आता राजाने आपली ओळख दिली, आणि त्याबरोबरच आपण सुवर्णनगरकडे का जात आहोत हे ही सांगितले.

वृद्धाने हसून म्हटले—"महाराज, कायाकल्प चिकित्सेसाठी इतक्या दूर जाण्याची

आवश्यकता नाही. ती चिकित्सा मला माहित आहे." असे म्हणून त्याने राजाच्या कानात काही सांगितले.

मंदमंद हसत श्वेतनंदाने आपल्या थैलीतून काही सुवर्णमुद्रा काढल्या व त्या वृद्धाला देऊ लागला.

परंतु वृद्धाने त्या मोहरा घेण्यास नकार दिला व म्हटले–"महाराज, आपले दर्शन घडेल अशी मला स्वप्नातही कल्पना नव्हती. मी धन्य झालो. हेच बक्षिस मला पुरेसे आहे. म्हणून आपण देत असलेल्या मुद्रा मी स्वीकारू शकत नाही."

यानंतर राजा व मंत्री आपल्या नगराकडे परतले. परंतु कुठलाही उपाय न करताच राजा त्या दिवसापासून अत्यंत प्रसन्न व उत्साही दिसू लागला.या परिवर्तनाचे कारण मंत्र्याच्या लक्षात आले नाही. एक दिवस त्याने विचारले–"महाराज, वृद्धाने आपल्या कानात काय गुपित सांगितले ते आपण मला सांगाल? तेव्हापासून आपली चिंता जाऊन आपण खूपच प्रसन्न दिसता!"

श्वेतनंदाने म्हटले–"वाढत्या वयामुळ शरीरात होणारे परिवर्तन पाहून व्याकुल होण्यामुळेच आयुष्य कमी होते. परिवर्तनाचा विचार न करता जो आपले मन प्रसन्न, आनंदी ठेऊ शकतो, त्याचे आयुष्य आपोआप वाढत जाते. त्या वृद्धाने माझ्यावर कायाकल्पाचा जो उपचार केला तो हाच." राजा म्हणाला.

"आपण मला जो बहुमूल्य सल्ला दिला त्याबद्दल आपले कसे आभार मानू? मी आजपर्यंत किती तरी प्रसिद्ध वैद्यांचा सल्ला घेतला, मूल्यवान औषधं घेतली, पण कशाचा ही काडीचा उपयोग झाला नाही. माझी व्यथा वाढतच गेली. आपण पूर्वीच मला भेटला असता तर किती बरे झाले असते असो.

आपल्या सेवेबद्दल फूल ना फुलाची पाकळी म्हणून या सुवर्ण-मुद्रा मी आपणास देतो. कृपया यांचा स्वीकार करा. म्हणजे मला संतोष होईल. वैद्यराज, नाही म्हणू नका." अजिजीने राजाने विनंती केली.













# चांदोबातील नवलाई

## सागरात नगर



वाढत्या लोक-संख्येमुळे पृथ्वीवर रहायला जागा नाही या अडचणीचा जपानी जीवन-पद्धतीवर काहीही परिणाम होऊ शकणार नाही. कारण टोकियोपासून १५० कि.मि. अंतरावर सागरात एक नगर बांधायला त्यांनी सुरुवात केली आहे. एका बाजूने ५ कि.मि. लांबी असणारे हे शहर मोठमोठ्या खांबांवर आधारलेले असेल. याला दोन लाख मिलियन डॉलर खर्च येईल.

## सर्वात उंच हत्ती

हत्तीची उंची सामान्यत: ९–१० फूट असते. परंतु नेपाळच्या शुक्लापांटा वन्यजीवन राखीव जंगलात ११ फूट ५ इंच उंचीचा एक हत्ती आहे. असे मानले जाते की ४५ वर्षे वयाचा हा हत्ती जगातला सर्वात उंच हत्ती आहे. नेपाळ व भारताच्या सीमेवरच्या या जंगलात जवळ जवळ ३००० सांबर आहेत. या हरणांच्या शिंगांना सहशाखा असतात.



## लेनिनने वापरलेले घड्याळ



लेनिनने १९१८ पर्यंत जे घड्याळ वापरले ते चांदीचे बनवलेले होते. म्यूनिचमध्ये त्याची किंमत १०३,००० डालर मानली गेली आहे. १९२७ मध्ये बोल्शेविक क्रान्ति झाली; त्यापूर्वी रशियन झार राजांशी संबंधित हे घड्याळ लेनिनने थोडे दिवस वापरले होते. नंतर १९१८ मध्ये जर्मन राजकीय नेता व पार्लमेंटचे सदस्य कार्तिनेकट यांना त्याने हे घड्याळ भेट दिले.

## योग चिकित्सा

हृदयरोगापासून वाचण्यासाठी किंवा हृदयरोग चिकित्सेसाठी योगाभ्यासाचा कितपत उपयोग होऊ शकेल–यावर संशोधन करण्यासाठी भारतीय व रशियन वैज्ञानिकांनी संयुक्त रूपाने एक योजना बनवली आहे. नव्या दिल्लीतील ऑल इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ मेडिकल सायन्सेसच्या सहयोगाने मॉस्कोची एक संस्था तीन वर्षे हा प्रयोग करणार आहे.



पौराणिक कथा :

# अशोकसुन्दरी

एकदा शिव आणि पार्वती नंदनवनात विहार करीत असता, मनातली इच्छा पूर्ण करणारा कल्पवृक्ष शिवाने पार्वतीला दाखवला. कल्पवृक्षाच्या या गुणाची परीक्षा घ्यावी म्हणून पार्वतीने कल्पवृक्षाला, 'मला एक सुन्दर बाळ हवंय' असे म्हटले. दुसऱ्याच क्षणी पार्वतीच्या हातात एक सुन्दर मुलगी अवतरित झाली. तिचे नाव अशोकसुन्दरी असे ठेवले गेले.

अशोकसुन्दरीचे सौंदर्य पाहून हुंडासुर नावाच्या राक्षसाने विचार केला–या मुलीला घेऊन जाऊन तिचे लालनपालन करावे व मोठी झाली की तिच्याशी विवाह करावा. परंतु राक्षसाला अशी बातमी मिळाली की–उर्वशी व पुरुरवा यांचा नातू नहुष याच्याशी अशोक-सुन्दरीचा विवाह करून देण्याचे पार्वतीने निश्चित केले आहे. आता काय?–राक्षसाने तावड-तोब नहुषला संभाळणाऱ्या दासींच्या शरीरात प्रवेश केला. ती दासी एका रात्री नहुषबाळाला जंगलात घेऊन गेली, पण पुढे काय वाढून ठेवले आहे–याची तिला कल्पना नव्हती. राक्षसाने बाळाला आपल्या बायकोच्या हाती देऊन 'त्याला मारून, मांस शिजवून वाढायची' आज्ञा तिला दिली. राक्षसाच्या बायकोने हे काम आपल्या स्वयंपाकिणीवर सोपवले. ते बालक पाहून तिचे मन वात्सल्याने भरून आले. व तिने मूल वसिष्ठांच्या आश्रमात पोचवले आणि एका जनावराचे मांस शिजवून राक्षसापुढे ठेवले.

वसिष्ठांच्या आश्रमात नहुष वाढला, मोठा झाला. त्याने एका ऋषिच्या तोंडून स्वत:ची जीवनकथा ऐकली. आणि वसिष्ठांकडून हे ही जाणून घेतले की अशोकसुन्दरीशी आपला विवाह दैवनिर्मित आहे. तत्काल धनुष्यबाण घेऊन तो अशोकसुन्दरीला भेटायला गेला. तेथे असलेल्या हुंडासूर राक्षसाचा वध करून त्याने अशोकसुन्दरीशी विवाह केला.






सिंहपुरी शहरात शिवराम व केशव नावाचे दोन मित्र रहात असत. आपले शिक्षण पूर्ण झाल्यावर दोघांनीही त्याच शहरात स्वतन्त्रपणे व्यापार करायला सुरुवात केली.

काही दिवसांनी ते एकमेकांना भेटले तेव्हा शिवराम केशवला म्हणाला–"व्यापारात आपण जे भांडवल घातले ते एका वर्षात दुप्पट करू शकलो तरच आपण खरे व्यापारी! आज आपल्या शहरात जे मोठे व्यापारी म्हणवले जातात त्या सर्वांनी–मालात भेसळ करून, वजनात लबाडी करून आणि राजाला कायदेशीरपणे देण्याचा कर चुकवूनच इतकी कमाई केली आहे. आपल्यालाही असेच लवकर श्रीमंत व्हावयाचे असेल तर या लोकांचे अनुकरण करण्यावाचून गत्यंतर नाहीं."

आपल्या मित्राचे भाषण ऐकून केशव हसून म्हणाला–"आपल्याला थोड्या दिवसात जी संपत्ती मिळवायची, ती न्यायाने व्यापार करूनही मिळवता येईल? पापाचा पैसा सुखाचा वाटला तरी कधी कधी खड्यात घालतो. न्यायाने मिळवलेला पैसा अंगी लागतो. कोणी काही म्हणो, आपल्याला अन्यायाचा पैसा नको बाबा!"

हे उत्तर ऐकून शिवराम चिडून म्हणाला–"ऐक, न्याय आणि अन्याय या शब्दांच्या व्याख्या शेवटी आपणच केलेल्या असतात. तुला भीती हीच ना, की–अन्यायाने धन-संग्रह केल्यास मृत्युनंतर नरकात जावे लागेल? नरक नावाची जागा खरोखरीच असते की नाहीं–हेही आपल्याला माहीत नसते–तेव्हा असल्या अर्थहीन गोष्टीवर विश्वास ठेवणे, यासारखा दुसरा नरक नसेल."

या गोष्टीवर जास्त वाद घालणे शहाणपणाचे नाही असे समजून केशव गप्प बसला.

या घटनेनंतर दहा-पंधरा दिवसांनी दोघेही मित्र माल खरेदीसाठी शेजारच्या शहरात गेले.

तेथे दोघेही आपआपल्या कामासाठी निरनिराळ्या बाजारात खरेदी करीत फिरत राहिले. त्या दिवशी ऊन्ह वाढत गेले व त्यामुळे शिवराम थकून गेला. त्याला घेरी येऊ लागली.

मोठ्या मुश्किलीने तो एक एक पाऊल टाकत सावलीची जागा शोधत चालत राहिला. परंतु अचानक कोलमडून खाली पडला.

हे पाहून कोदण्डराम नावाच्या लोहाराने धावत येऊन शिवरामला उचलले व त्याला आपल्या दुकानात घेऊन गेला. तेथे त्याला जमिनीवर झोपवून शुद्धीवर आणण्यासाठी म्हणून कोदण्डराम त्याच्या तोंडावर पाणी मारू लागला.

थोड्याच वेळात शिवराम हळूहळू शुद्धीवर आला व डोळे उघडून पाहू लागला. तोच त्याला आपल्या समोर पिंजारल्या मिशांचा काळा चेहरा दिसला. त्या माणसाच्या मागेच धगधगलेल्या लोहारी भट्टीत तापत असलेल्या लोखंडी सळयाही त्याने पाहिल्या !

हे दृश्य पाहून शिवरामला वाटले की आपण यमलोकात पोचलो आहोत, आणि तो एकदम भयाने ओरडला.

कोदण्डराम त्याच्या जवळ येऊन काही विचारणार इतक्यात त्याला यमदूत समजून शिवराम एकदम उठून बसला व हात जोडून त्याने विचारले–"मला इथे का आणले आहे ?"

कोदण्डरामला वाटले की शिवराम कृतज्ञता प्रकट करण्यासाठी हात जोडत आहे. तो एकदम म्हणाला–"अरे, मला नमस्कार करण्याची काही जरूर नाही. मी आपले कर्तव्य केले." असे म्हणून आपले काम पुरे करण्यासाठी तो भट्टीकडे वळला आणि सळई बाहेर काढून पाहू लागला. ती लाल सळई पाहिल्यांबरोबर शिवरामला वाटले की, आता हा यमदूत आपल्याला सळईने डाग देणार ! तो भयाने थरथर कापू लागला व किंचाळून–किंचाळून त्याने दुकान डोक्यावर घेतले ! तो म्हणू लागला–"अरे मला छळू नको रे, मी काय पाप केले ? मला का डाग देतोस ?" हे ओरडणे ऐकून दुकानासमोर रस्त्यावरील लोकांची गर्दी जमू लागली. ते पाहून गर्दीला उद्देशून कोदण्डराम म्हणू लागला–"मी या माणसाला अजिबात ओळखत नाही. चक्कर येऊन रस्त्यावर बेशुद्ध पडलेला मी याला उचलून आणले. आता शुद्धीवर आल्यावर त्याला भ्रम झाला आहे. त्याला वाटत आहे की तो यमलोकात पोचला आहे आणि मी त्याला आता सळईने डाग





देणार आहे, म्हणून तो घाबरून ओरडतो आहे."

त्याच वेळी केशवही तेथे येऊन पोचला. त्याने लोहाराला म्हटले—"हा माझा मित्र आहे. उन्हाने पित्त चढल्यामुळे तो असा ओरडत आहे."

हे ऐकून तिथे जमलेले लोकही खो खो हसू लागले व हळूहळू तेथून निघून गेले.

यानंतर कोदण्डराम जवळ कृतज्ञता प्रकट करून दोघे मित्र आपल्या गावच्या दिशेने निघाले.

रस्त्याने चालता चालता शिवराम म्हणाला—"मित्रा, स्वर्ग आणि नरक या गोष्टींवर तसा माझा विश्वास नाही. पण मला हे कळत नाही की त्या लोहाराची आकृति आणि भट्टीत तापत घातलेल्या सळया वगैरे पाहून मी यमलोकात पोचलो असे वाटून मी कसा काय घाबरलो!"

"ऐक शिवराम, तुझ्यासारखा बढाया मारणारा माणूस सुद्धा 'वाईट कर्म केल्याने पाप लागते' या कल्पनेला बळी पडला. वरून किती आव आणला तरी ही कल्पना प्रत्येकाच्या मनात कोठेतरी दडलेली असतेच. तुझ्याच मनात आले की तू मेला आहेस आणि त्या भ्रमात तुझ्या मनातली खरी गोष्ट बाहेर पडली. बरोबर आहे ना?" केशव त्याची समजूत घालत म्हणाला.

"हां मित्रा, तुझे बोलणे एकदम बरोबर आहे." डोके हलवत शिवराम म्हणाला.

"मेल्यानंतर आपण कोठे कोठे पोचतो हे कोणीही पाहिले नाही—ही गोष्ट खरीच. परंतु हे ही तितकेच खरे की नरकाच्या या भीतीमुळे का होईना—बऱ्याच लोकांना आपण केलेल्या दुष्कृत्यांच्या भीतीमुळे इथेच जिवंतपणी नरकाचा अनुभव येतो." केशव म्हणाला.

केशवच्या या म्हणण्यातले सत्य शिवरामला बऱ्याच अंशी पटले आणि यानंतर शिवराम न्याय्य मार्गाने आपला धंदा करून 'एक यशस्वी व्यापारी' म्हणून प्रसिद्ध झाला.





# गरीबाची सत्ता

शिवगिरीचा राजा श्रीदत्त ज्या ज्या दिवशी दरबार बोलवी, त्या त्या दिवशी डोकेदुखीने हैराण होऊन जाई. त्याला डोके गच्च बांधून घ्यावे लागे, लेप लावावा लागे. आणि या डोकेदुखीचे कारण—दरबारी विद्वान 'अनिरुद्ध'!

दरबारात अनिरुद्ध निरर्थक श्लोक वाचून, नसत्या गोष्टींची चर्चा करून राजाला व इतर सभासदांना चीड आणत असे. परंतु दरबारी विद्वान म्हणून मागल्या दोन पिढ्यांपासून दरबारात असल्यामुळे राजाही अनिरुद्धविरुद्ध काही बोलू शकत नसे. परंतु त्याच्यापासून आपली सुटका करून घेण्याची संधी मात्र राजा पहात होता.

एक दिवस गौरीशास्त्री नावाचा एक गरीब ब्राह्मण राजाकडे आला आणि म्हणाला—"महाराज, मी कुठेकुठे पौरोहित्य करून बायको व पोराबाळांचा उदरनिर्वाह करतो. देवाने मला इतकी मुले दिली आहेत की सर्वांना दोन वेळचं पुरेसं खाणंही खायची भ्रांत, त्यातच माझ्यासमोर आणखी एक अडचण उपस्थित झाली आहे."

राजा श्रीदत्ताने विचारले—"काय अडचण आहे तुझी?" उत्तरादाखल गौरीशास्त्री म्हणाला—"माझ्या मुलांच्यात एक सहा वर्षांचा मुलगा आहे, तो सकाळी उठल्यापासून रात्रीपर्यंत एकसारखा रडत असतो. त्यामुळे त्रासून मला कधीकधी पळून जावेसे वाटते. आपण मला यातून मुक्त करावे अशी विनंति करायला मी आपणाकडे आलो आहे."

गरीब ब्राह्मणाची ही विनंति ऐकून श्रीदत्ताने विचार केला—काहीही करून त्या पोराला अनिरुद्धच्या गळ्यात अडकवून द्यावे म्हणजे कदाचित् आपलीही अनिरुद्ध-



पासून सुटका होईल. तो ब्राह्मणाला म्हणाला– "ठीक आहे, तु आपल्या मुलाला घेऊन ये. त्याला मी आपल्या ताब्यात ठेवीन आणि तोपर्यंत मी तुला रोजी दहा मुद्रा देत जाईन."

गौरीशास्त्री हे ऐकून फार खूष झाला. आपलं रोजच दुःख दूर होईल अन् शिवाय रोज दहा मुद्रांची प्राप्ति– आंधळा मागतो एक डोळा, अन् देव देतो दोन! दुसऱ्या दिवशी मुलाला श्रीदत्ताच्या हाती सोपवून गौरीशास्त्री निघून गेला.

अनिरुद्धाला बोलवून श्रीदत्त म्हणाला– "हे पहा पंडितजी, आपण मला एक मदत करावी. या अनाथ मुलाला आपण आपल्या घरी घेऊन जा व याला आपल्या सारखा पंडित बनवून आणा."

"महाराज, यात काय मोठंसं?–हा माझ्यापेक्षाही सवाई झाला आहे–असे उद्गार आपल्या तोंडून बाहेर पडतील इतक्या लायकीचा बनवून मी याला घेऊन येईन." असे म्हणून अनिरुद्ध त्या मुलाला बरोबर घेऊन गेला.

दुसऱ्या दिवशी उठल्याबरोबर गौरी-शास्त्रीचा मुलगा आरडा–ओरडा करून रडू लागला. खूप प्रयत्न करूनही अनिरुद्ध त्याला गप्प बसवू शकला नाही. त्या दिवशी पोराच्या रडया–ओरडयाने अनिरुद्धाचे डोके फुटायची वेळ आली. त्यामुळे तो त्यादिवशी दरबारात जाऊ शकला नाही आणि दरबारही त्यादिवशी निर्विघ्नपणे चांगल्या रीतीने पार पडला!

दुसऱ्या दिवशी ही गौरीशास्त्रीच्या मुलाच्या गोंधळामुळे अनिरुद्धने डोके तापले व त्याला दरबारात जावेसे वाटले नाही.

अशा प्रकारे एक आठवडा पूर्ण होण्याच्या आत डोके फिरून अनिरुद्ध कुठे तरी निघून गेला.

या घटनेनंतर श्रीदत्तासमोर आणखी एक समस्या उपस्थित झाली. ती अशी– शिवगिरी राज्याच्या वरच्या भागातील सुंदरगिरी नावाच्या विशाल राज्यात





दरवर्षी क्षत्रीयांना उचित अशा निर-निराळ्या चढाओढी होत असत. श्रीदत्ताच्या दोन्ही पुत्रांना या चढाओढीचे निमन्त्रण मिळाले होते परंतु ते सर्व चढाओढीत हरले–त्या सर्व विद्यांत सुंदरगिरीचा युवराज पहिला आला.

श्रीदत्तच्या मुलांनी सुंदरगिरीच्या राजाची निन्दा करून त्याच्यावर असा आरोप केला की – या चढाओढीत पक्षपात केला गेला आणि राजाने सर्वांना फसवले. यावर सुंदरगिरीच्या राजाला राग आला व त्याने शिवगिरीवर हल्ला करण्याची घोषणा केली.



श्रीदत्ताला आता विचार पडला की, हा धोका कसा टाळावा? एकतर सुंदरगिरी राज्य शिवगिरीपेक्षा तिप्पट मोठे होते आणि ते राज्य वरच्या पातळीवर वसलेले असल्यामुळे शेतीसाठी लागणाऱ्या पाण्याचा पुरवठा शिवगिरीला सुंदरगिरी-कडूनच होत असे. त्यामुळे अशा संपन्न व शक्तीशाली राज्याचे शत्रुत्व पत्करणे म्हणजेच युद्धात पराजित होऊन जंगलात पळून जाण्याची पाळी येणे होय.

या गोष्टीचा परामर्श करण्यासाठी श्रीदत्ताने राज्यातल्या सर्व प्रमुख व्यक्तींना बोलावून घेतले.

ही वार्ता गौरीशास्त्रींच्या कानी आली. आणि ते राजाला भेटायला गेले.

राजा श्रीदत्त गौरीशास्त्रींना म्हणाला– "पंडितजी, आपल्या मदतीने गेल्या दोन पिढ्यांपासून आम्हाला त्रास देणाऱ्या माणसाकडून मी स्वतःला मुक्त करून घेतले. आता माझ्यापुढे युद्धाचे संकट उभे आहे, यातून पार पडायचा उपाय सांगा. या समस्येवरील निदानही कदाचित आपल्या डोक्यांतून उगवेल."

"महाराज, मला काही हे फार मोठे संकट आहे असे वाटत नाही. अनेक मुलांच्या जबाबदारीसाठी परिस्थितीशी झगडताना बहुधा रोजच माझ्यासमोर

अशा समस्या उभ्या रहात असतात, इतरांची मदत न घेता मी स्वतःच ही संकटे सोडवीत असतो." गौरीशास्त्री म्हणाले.

"ते कसे काय?" श्रीदत्तने विचारले.

"माझी मुले इतर मुलांशी खेळताना कोणा ना कोणा मुलाशी मारामारी करतात, त्यांना पिटून काढतात आणि रोज नवा झगडा, नवी भांडणे उपस्थित करतात. त्या मुलांचे आईबाप माझ्या घरापुढे येऊन आरडा–ओरड करतात. पण मी आणखी रागावून त्यांच्याशी भांडत बसत नाही. उलट मोठ्या शांतीने त्यांना समजावून ही भांडणे निवारतो. आपल्यापुढील समस्या काहीशी याच प्रकारची आहे, नाही का?" गौरीशास्त्री म्हणाले.

श्रीदत्ताला गौरीशास्त्रींच्या भाषणाचे मर्म समजले. त्याने दुसऱ्याच दिवशी सुंदरगिरी राजाला भेटून निवेदन केले– "माझी मुले अज्ञानाने व विचार न करता जे कांही बोलली व त्यांनी जे काही केले त्याबद्दल मी आपली क्षमा मागतो. मी आपल्याला माझा भाऊच मानतो. आपण माझ्या राज्यावर हल्ला करणारच असाल तरीही मी मात्र आपल्यासमोर युद्धाला उभा रहाणार नाही. मी माझे राज्य आपल्या हाती देऊन टाकीन."

श्रीदत्तचे हे भाषण ऐकून सुंदरगिरीचा राजा आनंदला आणि त्याने युद्धाचा विचार सोडून दिला.

काही वर्षे निघून गेली. आता श्रीदत्तने विचार केला की राज्य मुलांपैकी एकाच्या हाती सोपवून स्वतः निवृत्त व्हावे. परंतु त्याच्यापुढे प्रश्न पडला की राज्य कोणाला द्यावे? कारण त्याची मुले जुळी होती. दोघेही राज्यासाठी झगडू लागले. गौरी-शास्त्रींच्या सल्ल्यानुसार राजाने राज्याचे दोन तुकडे करून दोन मुलांना दिले.

अशा प्रकारे गौरीशास्त्रींनी राज्याच्या अडचणी मोठ्या कौशल्याने सोडवल्या. म्हणून प्रसन्न होऊन राजाने गौरीशास्त्रींना अनेक मूल्यवान भेटी देऊन त्यांची गरिबी हटवली.






[१८]

[उग्रदत्ताने अग्निद्वीपाहून आपल्या पालनकर्त्या पित्याला-उग्राक्षाला-ताबडतोब मदतीला येण्याविषयी निरोप पाठवला. निरोप पोचताच उग्राक्ष नावा घेऊन आपल्या राक्षससेनेसह अग्निद्वीपाकडे निघाला. एक दिवस आणि एक रात्र प्रवास केल्यावर समुद्राच्या ऐन मध्यावर असतानाच एक भयंकर पक्षी वेगाने त्यांच्यावर हल्ला करायला आला. पुढे वाचा.]

तो भयंकर पक्षी पाहताच राक्षस घाबरले.

पण उग्राक्ष ओरडून म्हणाला–"ऐका. तुम्ही आपआपल्या मशाली तेलात बुडवून पेटवा." दुसऱ्याच क्षणी सर्वांनी आपल्या मशाली पेटवल्या. पक्ष्यावर बसलेल्यांनी आकाशात उंचावर उडत नावांतील राक्षसांवर भाले व मोठमोठ्या दगडांचा वर्षाव सुरू केला. अशा प्रकारे एक तासभर युद्ध झाल्यावर पक्ष्यावर बसलेल्या व्याघ्रचर्म-धाऱ्यांनी त्या पक्ष्याला एकदम खाली अशी झेप घ्यायला लावली की जणू काही ते नावांवरच उतरणार आहेत. पण पुन्हा एकदम वर झेपावत त्यांनी विकट हास्य केले व शेवटी ते अग्निद्वीपाकडे निघून गेले.

काय कारण होते कुणास ठाऊक, पण त्या दिवशी व रात्रीही पुन्हा काही व्याघ्र-चर्मधाऱ्यांनी राक्षसांवर हल्ला केला नाही.

    



तिसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या सुमारास नावा अग्निद्वीपाजवळ पोचल्या.

"नावा अजून जरा पश्चिमेकडे जाऊ देत. तेथे दोन पेटत्या अग्निपर्वतांच्या मधे एक खिंड आहे. त्या भागात आपण किनाऱ्याला लागू आणि खिंडीतून पुढे आपण द्वीपाच्या मध्यभागात जाऊ शकू." राक्षसांना मार्गदर्शन करण्यासाठी आलेल्या अस्वलचर्मधारीने सांगितले.

त्याच्या सूचनेनुसार नावा किनाऱ्याने आणखी थोड्या पुढे गेल्या, तेव्हा त्यांना दोन अग्निपर्वतांमधील लांब खिंड दिसली. उग्राक्ष व अस्वलचर्मधारींच्या कल्पनेप्रमाणे ती खिंड निर्जन नव्हती! खिंडीच्या तोंडा-शीच त्या भागावर अधिकार जमवलेल्या व्याघ्रचर्मधाऱ्यांशी अस्वलचर्मधाऱ्यांची भीषण लढाई चालू होती. काही भयंकर पक्षीही खिंडीच्या टोकाशी पोचलेल्या अस्वलचर्मधाऱ्यांवर हल्ला करीत होते.

राक्षस नावांवरून उतरून किनाऱ्यावर पोचले. खिंडीत लढणाऱ्या अस्वलचर्म-धाऱ्यांमधून वाट काढत व्याघ्रचर्मधारी आता द्वीपाच्या आतल्या भागाकडे पळू लागले. अस्वलचर्मधारी हाती आलेल्या शत्रूंना मारत राक्षसांजवळ येऊन पोचले. त्या सर्वांच्या पुढे असलेल्या एका अस्वल-चर्मधाऱ्याकडे पाहून रुद्राक्ष चकित झाला व त्याने विचारले–"अरे उग्रदत्ता, हे काय सोंग केलं आहेस तू?" आणि असे विचारतच त्याने हाताला धरूण उग्रदत्ताला आपल्या खांद्यावर घेतले.

आपला प्रबळ शत्रु एकपाद याच्याशी लढायला राक्षस मदतीला आले हे पाहून अस्वलचर्मधाऱ्यांना फारच उत्साह आला. उग्रदत्ताने आपल्या शत्रुपक्षाच्या ताकदीबद्दल थोडक्यात रुद्राक्षाला सांगितले व अस्वलचर्म-धारींचा नेता कन्ध याचा परिचय करून देत म्हटले-"हेच या लोकांचे नेता आहेत. यांनीच व्याघ्रचर्मधाऱ्यांपासून माझे रक्षण केले."

कन्धने रुद्राक्षास नमस्कार करून म्हटले–"तुमच्या येण्यामुळे आम्हाला पहाडी गुहा अन् भुयारातल्या अंधारात जगण्यापासून मुक्ति मिळाली. एकपादासारखा क्रूर प्राणी भविष्यातही कधी उत्पन्न होणार नाही. केवल गुलामांच्या जिवावर ऐषआराम करून, देशावर अधिकार चालवून जगणाऱ्या एकपाद आणि त्याचे मित्र नागवर्मा व करवीर यांचा आपण अन्त करू शकलात तर या अग्निद्वीपाचे कल्याण होईल.

"मग आता उशीर कशाला? आपण ताबडतोब त्याच्या किल्ल्याला वेढा घालू या. तुमच्या लोकांनी फक्त आम्हाला रस्ता दाखवावा." उग्राक्ष आपल्या मानलेल्या मुलाला खांद्यावरून उतरवत म्हणाला.

"हे काम तडकाफडकी होणारे नाही. आपण यावर विचार-विनिमय करू. सध्या चन्द्रसेना नावाची एक राजकुमारी त्याच्या ताब्यात आहे. आपण हा विचार केला पाहिजे की आपल्या उद्योगामुळे तिला कोणताही धोका पोचू नये. याशिवाय त्या देशातून पळून आलेले तुमच्या देशाचे लोक सांगत आहेत की, अरुद्र नावाचा तुमच्या देशातला एक माणूस सदासर्वदा शत्रूच्या मागेमागे चालत तुमची सारी रहस्ये त्यांना सांगत असतो." कन्ध म्हणाला.

अरुद्र फितुर झाल्याची बातमी ऐकून रागाने डोळे लाल करीत व हुंकार भरत रुद्राक्षाने विचारले–"रुद्र कुठे आहे?"



रुद्र बिचारा घाबरत घाबरत रुद्राक्षा-समोर येऊन उभा राहिला.

"अरे, अरुद्र कसा फितुर झाला! तो तर तुझा जिगरी दोस्त आहे ना?" उग्राक्षाने विचारले.

"केवळ मीच नव्हे, तर उग्रदत्त सुद्धा त्याचा प्रिय मित्र आहे. बहुधा चन्द्रसेनेशी विवाह करता यावा म्हणून आपल्याला दगा देऊन तो शत्रुपक्षाला जाऊन मिळाला असावा." घाबरल्या स्वरात रुद्राने उत्तर दिले.

"चन्द्रसेनेचा विवाह माझ्या मुलाशीच होईल. तो विवाह कोणीही रोखू शकणार नाही. त्या अरुद्राची खांडोळी करून मी जमिनीत गाडून टाकीन." उग्राक्ष गरजला.



"उग्राक्ष, शांत व्हा. आतापर्यंत एक रहस्य मी आपणापासून गुप्तच ठेवले. एकपादाचा वध करणे वाटते तितके सोपे नाही. त्याच्याजवळ एक अद्भुत शक्ति आहे. ती अशी की—त्याचे रक्त कोणी पाहिले किंवा त्याने कोणाचे रक्त पाहिले तरी ती दुसरी व्यक्तीच निश्चितपणे मरून जाते." कन्धाने उदास स्वरात ही माहिती पुरवली.

कन्धाच्या गोष्टी ऐकून उग्राक्ष चांगलाच भडकला. त्याला प्रथम याचा अर्थच समजला नाही, पण जेव्हां नीट सर्व गोष्टी लक्षात आल्या तेव्हा त्याला विस्मय वाटला. तो म्हणाला—"हे कन्ध, मी अशी गोष्ट कधीच ऐकली नाही. आता एक थेंबही रक्त न येऊ देता एकपादाचा वध कसा बरे करावा!"

"आपल्यापैकी काहींना मरायला तयार व्हावे लागेल. डोंगराच्या शिखरावरील त्याचा किल्ल्यात घुसणे ही काही मोठी कठीण गोष्ट नाही. आमच्याजवळही काही भयंकर पक्षी आहेत, त्यामुळे आपला शत्रु पक्ष्यांच्या मदतीने आपल्याला रोखू शकणार नाही. तुमच्या अनुचरांपैकी कोणीही राक्षस त्यांना गुंडाळून चेंडूसारखे फेकून देऊ शकतो. परंतु आपण किल्ला जिंकून एकपादाला पकडायला जाऊ, तेव्हाच आपल्याला खरा धोका आहे. तो स्वतःच आपल्या शरीरावर तलवारीने एखादी जखम करून घेऊन आपल्या समोर आला तर आपल्यापैकी कोणीही तेथून जिवंत परत येऊ शकणार नाही." कन्ध म्हणाला.

"तो खूप शक्तिवान् सुद्धा आहे?" उग्राक्षने विचारले.

"शक्तिवान्? हूं! तो तर अगदी दुर्बल आहे. शिवाय तो लंगडाही आहे. तो हाती सापडला तर दहा वर्षांचा मुलगाही त्याला किल्ल्याच्या भिंतीवरून खाली ढकलू शकेल." कन्ध म्हणाला.

"माझ्या अनुचरांपैकी काही मरायला जरूर तयार होतील. आपण जेव्हा किल्ल्यात प्रवेश करू तेव्हा त्याला शोधत त्याच्या मागे लागू. सर्वात पुढे असणारा सैनिक त्या दुष्टाला पाहून किंचाळून मेला तरी हरकत नाही. आपण बाकी सर्वजण डोळे मिटून घेऊन त्याला घेरू आणि त्याला मारून टाकू." उग्राक्षने सुचवले.

"चांगली गोष्ट आहे. पण यानंतर जेव्हा आपण डोळे उघडू तेव्हा लगेच आपल्याला रक्त दिसेलच ना?" कन्धाने विचारले.

"ही कठीण समस्या आहे खरी. आत्ता इथे आपण त्यावर फार गंभीरपणे विचार करू शकणार नाही. त्याचा वध केल्यावर काय ते पाहून घेऊ. आता प्रथम किल्ल्याकडे निघू या." असे म्हणून उग्राक्षाने पाऊल उचलले.

अस्वलचर्मधारी रस्ता दाखवत चालू लागले. सर्वजण खिंडीत थोडे पुढे गेले, नंतर डाव्या बाजूच्या पर्वतपायथ्याच्या ओबडधोबड दगडांवरून शिखरावर असलेल्या किल्ल्याच्या रोखाने चालू लागले.

जाण्यासाठी रस्ता असा नव्हताच. सर्वत्र लहान-मोठे दगड-धोंडे नि काटेरी झुडपे. किल्ला बऱ्याच उंचावर होता. मधून मधून पाण्याचे छोटे प्रवाह वहात होते. त्या पाण्याने अनेक ठिकाणीं पाय घसरायला होत होते. एका ठिकाणी स्वच्छ पाणी



दिसले. सर्वांनी आपली तहान भागवून घेतली. दमले तरी वाटचाल चालूच होती. थांबून तरी करणार काय? आकाशात भयंकर पक्ष्यांचे कुठे नामोनिशाण ही नव्हते आणि व्याघ्रचर्मधाऱ्यांचा आवाज ही कुठे ऐकू येत नव्हता. सर्वत्र शांतता पसरली होती!

"एकपादाने काहीतरी कारस्थान केले असावे. सर्व अंगाला रक्त फासून किल्ल्याच्या भिंतीवर अचानक पुढे येऊन आपणा सर्वांना मारून टाकण्याची त्याची योजना असावी." कन्ध म्हणाला.

ऐका पुढे चालणारे सोडून बाकी कोणीही किल्ल्याच्या भिंतीकडे पाहू



"नका." उग्रदत्ताने ओरडून सर्वांना सचेत केले.

अशा प्रकारे आपसात निर्णय घेऊन ते जेव्हा किल्ल्याच्या तटाजवळ पोचले, तेव्हा त्यांना काही कोलाहल ऐकू आला. तरीही त्यांच्यापैकी कोणीही डोके उचलले नाही. थोड्यात वेळात एकपादाचा आवाज एकाद्या घंटेसारखा. निनादला—"पहा, सुदर्शनची कन्या चन्द्रसेना हिला मी किल्ल्यावरून खाली फेकत आहे."

एकपादाचा आवाज ऐकून उग्राक्षा-बरोबरच्या सर्वांना आश्चर्य वाटले. तरीही कोणी समोर पाहिले नाही. इतक्यात किल्ल्याचा द्वारातून ओरडा ऐकू आला.

"फितुरी, दगा!" पुन्हा ऐकू आले—"उग्रदत्त, चन्द्रसेनेने सोडलेल्या दोरांच्या सहाय्याने वर या. एकपादाला कातड्याच्या थैलीत बंद करून तिचे तोंड बांधून टाकले आहे. आता आपणा सर्वांना भिण्याचे काहीच कारण नाही. पण द्रोही नागवर्मा आणि करवीर इथेच कुठेतरी टपून बसले असण्याची भीती आहे." असे म्हणत अरुद्राने सर्वांना सावध केले.

दुसऱ्याच क्षणी तलवारींचा खणखणाट ऐकू आला, एका हातात तलवार उंच उचलून चन्द्रसेना ओरडली—"अरुद्र करवीराशी लढत आहे. हा पहा, हाच तो फितुर नागवर्मा." असे म्हणून चन्द्रसेनेने किल्ल्याच्या आवारांत खाली उडी मारली.

उग्रदत्त व उग्राक्षाने आपल्या अनुयायांना सावधानतेचा इशारा दिला आणि चन्द्रसेनेने तटावरून सोडलेल्या दोरांना धरून भराभर वर चढू लागले. यानंतर किल्ल्यात उतरल्यावर त्यांना दिसले की अरुद्र करवीराशी आणि चन्द्रसेना नागवर्माशी लढत आहेत. हे दृश्य पाहून उग्राक्षाचा आनन्द गगनात मावेना. तो म्हणाला—"चन्द्रसेना, पहा मी आलो. तू आपला क्षत्रीय वंश धन्य केलास. तुझ्या होणाऱ्या सासूलाही व्याघ्रचर्मधाऱ्यांशी लढताना पहाण्याची संधी मला मिळाली होती."

असे म्हणून उग्राक्ष आपली दगडी गदा नागवर्मावर फेकणार तोच चन्द्रसेनेची तलवार नागवर्माच्या छातीत घुसली. तो ओरडून मागच्या मागे कोसळला. राक्षसदल आलेले पाहून करवीराने पळायचा प्रयत्न केला, तोच अरुद्राने त्याच्या छातीत भाला मारला आणि तोही खाली पालथा पडला.

हे पाहून कन्धाच्या शरीरात उत्साह संचरला आणि ज्या थैलीत एकपादाला बंद केले होते ती थैली उचलून तो म्हणाला–"एकपाद, तुला ऐकू येत आहे का? हे बघ मी तुला आत्ताच ताबडतोब या पेटत्या अग्निपर्वताच्या तोंडात फेकत आहे. तुला आणि सर्व जगालाही छान आराम मिळेल." असे म्हणून तो जवळच्या अग्निपर्वताकडे पळत सुटला.

"मी आपल्याशी फितुरीचे सोंग केले म्हणूनच एकपादाने माझ्यावर विश्वास ठेवला. एकपादाने असे कारस्थान केले होते की तो चन्द्रसेनेच्या जिवाला धोका असल्याची सूचना देऊन स्वतःच्या शरीरावर जखम करून आपणा सर्वांना खतम करणार होता. मी पण योग्य संधीची वाट पहात होतो, व ती मिळताच मागल्या बाजूने त्याच्यावर हल्ला करून त्याला कातडी थैलीत बंद करून टाकले." अरुद्राने सांगितले.

त्याची बुद्धिमत्ता पाहून सर्वांनी एकस्वराने त्याची 'वाहवा' केली.

उग्रदत्त, उग्राक्ष व चन्द्रसेना आपल्या परिवारासह आपापल्या देशी पोचले. तेव्हा चित्रसेन ऊर्फ सामन्तराजा सुदर्शन फारच आनन्दित झाला. एका शुभ मुहूर्तावर उग्रदत्त व चन्द्रसेनेचा विवाह थाटामाटात साजरा झाला.

या विवाहासाठी कन्ध अमूल्य उपहार घेऊन कपिलपुरला आला होता.

उग्रदत्त आपले श्वशुराचे सामन्त राज्य आणि आपल्या पालनकर्त्या पित्याचे अरण्य राज्य या दोन्हींचा राजा बनला व त्याने अनेक वर्षे सुखाने राज्य केले. (समाप्त)



# राज्याचे रक्षण

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाकडे परत आला. झाडावरून प्रेत उतरवून खांद्यावर टाकून नेहमीप्रमाणे मुकाट्याने स्मशानाकडे चालू लागला. तेव्हा प्रेतात वास करणाऱ्या वेताळाने राजाला विचारले–"राजा, मला कळत नाही की तू या प्राणघातक कठीण कामाला का प्रवृत्त झाला आहेस? तुला पाहून मला काही चंचल वृत्तीच्या राजकुमारांची आठवण येत आहे. त्यांपैकी एक शिवदत्त याची गोष्ट मी तुला सांगतो. श्रमपरिहार व्हावा म्हणून तू ती गोष्ट ऐक."

वेताळ गोष्ट सांगू लागला–अत्यंत समृद्ध अशा नीलसागर राज्यावर अग्निदत्त नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला शिवदत्त व शान्तिदत्त नावाचे दोन पुत्र होते. क्षत्रियोचित सर्व विद्यांमध्ये दोघेही भाऊ पारंगत होते, परंतु शिवदत्त हा



अधिक विनयशील व दयाळू होता. यामुळे सर्वांचे त्यांच्यावर जरा अधिक प्रेम होते. राजाला वाटे की थोड्याच दिवसात शिवदत्त राज्यकारभारात आपला चांगला मदतनीस बनेल. परंतु शिवदत्त आपला सर्व वेळ वेद, श्रुति, पुराण यांच्या पठनात आणि ईश्वरचिंतनात व्यतीत करीत असे.

काही वर्षांनंतर–राज्यरक्षणाचे कार्य जास्त बळकट व जास्त पद्धतशीर करण्याचे काम सोपवायचे आणि शिवदत्ताला युव-राज्याभिषेक करायचा असा अग्निदत्ताने विचार केला. याला एक कारणही होते–त्यावेळी शेजारील सौराज्य नावाच्या राज्याचा शासक नीलसागर राज्य बळ-कावण्याचे कारस्थान करीत होता.

अग्निदत्ताच्या आज्ञेने शिवदत्ताला ही वार्ता मंत्र्यांनी सांगितली. परंतु या वार्तेने शिवदत्ताला थोडाही संतोष वाटला नाही. उलट 'अशा प्रकारच्या शासनकार्यात आपल्याला थोडी सुद्धा रुची नाही' असे स्पष्ट उत्तर त्याने मंत्र्याला दिले.

यावर आश्चर्याने मंत्री म्हणाला–"युवराज, आपणाकडून असे उत्तर येईल अशी कल्पनाच मी केली नव्हती. आपल्या सर्व प्रजेचीही आपल्याला 'युवराज' म्हणून पहायची इच्छा आहे."

"मी एकदा स्पष्टच सांगितले ना, की मला राज्याचा थोडाही मोह नाही?" शिवदत्त म्हणाला.

"आपण राजाला शासनकार्यात थोडीही मदत करणार नाही–ही बातमी आपल्या शत्रूला कळली तर तो आपल्या राज्यांत काही कारस्थान करण्याचीही शक्यता आहे." मंत्री म्हणाला.

"काहीही होवो, मला याच्याशी काही कर्तव्य नाही. माझे असे मत आहे की आपण माझ्या धाकट्या भावालाच 'युवराज' घोषित करावे. राजा होण्याची माझी मुळीच इच्छा नाही. मला राज्यकारभारांत थोडी सुद्धा रुचि नाही. अशा स्थितीत मी प्रजेचे कल्याण ते काय करणार? शिवाय धाकट्या भावाला राजा करून आपण आपल्या आत्मिक प्रगतीसाठी प्रयत्न करावा असे मला वाटते. यात कोणी आड येऊ नये."

मंत्र्याने राजाकडे येऊन हा वृत्तान्त सांगितला. राजाला फार आश्चर्य वाटले व त्याने शिवदत्ताला बोलवून म्हटले–"तू युवराज झाल्याशिवाय मला शासकीय कामात मदत करू शकणार नाहीस, माझा मोठा मुलगा म्हणून तुझी ही जबाबदारी आहे. दुसरी गोष्ट अशी की–युवराजाची निवड करण्याचा अधिकार 'राजा' म्हणून माझा आहे, आणि त्या अधिकारात या पदासाठी मी तुझी निवड केली आहे. अभिषेकाचा मुहूर्त साधण्यासाठी सर्व तयारी चालू आहे. तू आता लवकर तयार हो."

राजाचे बोलणे ऐकून शिवदत्त गप्पच बसला. त्याचे मौन हीच स्वीकृति असे सर्वांनी गृहित धरले. परंतु दुसऱ्या दिवशी सकाळी शिवदत्ताचा महालात पत्ताच नव्हता. राजाने चिंतित होऊन नोकरां-करवी सर्वत्र त्याचा शोध घेतला. नोकरांनी राजमहालामागील पर्वतशिखर, नदीतट आणि महालाचे ग्रंथालय इत्यादि सर्व ठिकाणी त्याला शोधले आणि राजाला कळवले की राजकुमाराचा कुठेच पत्ता लागत नाही.

यानंतर राजाने देशाच्या कानाकोपऱ्यात शोध करवला. परंतु काही फळ मिळाले





नाही. राजा दुःखाने व्याकुल झाला. राणीने अन्नपाणी वर्ज्य केले.

काही दिवसांनी एक भिकारी शिवदत्ता-कडून एक पत्र घेऊन आला. ते पत्र शिवदत्ताने आपल्या मातापित्यांच्या नावे लिहिले होते. पत्रात लिहिले होते–"एक राजकुमार म्हणून माझी जबाबदारी मला चांगल्या प्रकारे माहीत आहे. परंतु माझ्या अंतरात्म्याची हाक त्याही पेक्षा अधिक महत्त्वाची आहे असे मला वाटते. मी तिचे उल्लंघन करू शकत नाही. म्हणूनच माता-पिता, बंधु, सगेसंबंधी या सर्वांचा त्याग करून मी संन्यास ग्रहण केला आहे. आपली निराशा केल्याबद्दल मी आपली क्षमा मागतो."

पत्र वाचून शिवदत्ताच्या मातापित्यांना भारी दुःख वाटले. परंतु कुठे का असेना आपला पुत्र खुशाल आहे याचे त्यांनी समाधान मानून घेतले.

या घटनेनंतर पाच वर्षांनी राजा आजारी झाला. या काळात त्याचा द्वितीय पुत्र शान्तिदत्त राज्यशासनाच्या कामात अग्निदत्ताला मदत करू लागला. परंतु आणखी पाच वर्षांनी राजा अग्निदत्त मृत्यु पावला. आणि 'नीलसागर'चा राजा म्हणून शान्तिदत्ताला राज्याभिषेक करण्यात आला.

तसा शान्तिदत्त गुणी नक्कीच होता. परंतु तो एक समर्थ शासक नव्हता. परिणामतः सर्वत्र दुष्काळ पडला. शान्ति-दत्ताला दूरदृष्टी नव्हती, त्यामुळे तो आसपासच्या देशांतून धान्य मागवून संग्रहीत करू शकला नाही. परिणामतः राज्यात खळबळ माजली.

अशाच संधीची वाट पहात असलेला सौराज्यचा राजा आता नीलसागर राज्यावर हल्ला करण्याची तयारी करू लागला. या वार्तेने नीलसागरची प्रजा चिंतेत पडली. भरीत भर म्हणून की काय, राजा शान्ति-दत्त आजारी पडला.

राजमाता काळजीत पडली. अशा स्थितीत एका मंत्र्याने राजमातेला सल्ला दिला–"महाराणी, या अडचणीच्या परि-स्थितीत आपल्याला मदत करू शकेल अशी एकच व्यक्ति आहे. ती म्हणजे 'ज्ञानी अद्भुतेश्वर स्वामी.' आपण त्यांचे नाव कदाचित ऐकले असेल. त्यांच्या आशिर्वादाने सर्व काही सुरळित होईल."

राजमातेने या स्वामीजींबद्दल ऐकले होते. काही वर्षांपूर्वी काही लाकुडतोडे चंदनवृक्षांच्या शोधात जंगलात खूप दूर गेले. त्यांना तेथे एका चंदनवृक्षाच्या मुळाशी मुंग्यांचे वारूळ दिसले. तो वृक्ष मुळापासून कापावा म्हणून त्यांनी वारूळावर घाव घातला. त्यावेळी त्या वारूळातून हे ज्ञानी स्वामीजी बाहेर आले.

हे अद्भुत पाहून लाकूडतोड्यांना फार आश्चर्य वाटले व त्यांनीच या स्वामींचे नाव 'अद्भुतेश्वर स्वामी' असे ठेवले. तेव्हापासून जनता त्यांचे दर्शन घेऊन, त्यांच्या आशिर्वादाने आपल्या वेदना व व्यथांतून मुक्त होऊ लागली. कालांतराने तेथेच एक आश्रम बनला.

राजमाता मंत्र्याच्या सल्ल्याबद्दल विचार करीत होती. इतक्यात गुप्तहेरां-कडून बातमी आली की, शत्रुसैन्य नीलसागरकडे येत आहे. यावर राजमाता तत्काल राजमहालाबाहेर पडली व अद्भुतेश्वर स्वामींचे साश्रु नयनांनी दर्शन घेऊन तिने त्यांना विनंती केली, "महात्मन्, आपल्याशिवाय आता नीलसागरचा त्राता





कोणी नाही. आपण आम्हाला मदत करावी."

स्वामींनी थोडा वेळ ध्यान लावले व डोळे उघडून ते राजमातेला म्हणाले– "मातोश्री, आपण भयभीत होऊ नये, आपले व राज्याचे काहीही नुकसान होणार नाही."

यानंतर ते स्वतः राजधानीत आले व त्यांनी प्राणांची बाजी लावून राज्यरक्षण करण्यासाठी सैन्याला प्रोत्साहित केले व राज-महालात येऊन शान्तिदत्ताला ते म्हणाले– "तुला कसलीही व्याधी नाही. तू उठून उभा रहा. तुझे सर्वत्र कल्याणच होईल."

दुसऱ्याच क्षणी स्मितहास्य करीत शान्तिदत्त पलंगावरून उतरून उभा राहिला. सेनापतीला पाचारण करून राज्य-रक्षणासाठी आपली योजना समजाऊन सांगून त्याला योग्य त्या आज्ञा दिल्या.

नीलसागरच्या सैन्याने आपल्या सीमेवर आलेल्या सैन्याला धैर्याने तोंड दिले व मोठ्या पराक्रमाने युद्ध करून शत्रुसैन्याचा पराभव केला. आणि सौराज्य देश नील-सागर राज्यात सम्मिलित झाला.

नीलसागरच्या सैन्याने अवघ्या तीनच दिवसात हा विजय मिळवला. म्हणून राज्यात सर्वत्र हर्ष व उत्साह पसरला.

यानंतर ज्ञानी अद्भुतेश्वर स्वामींनी राजमातेचे एकान्तात दर्शन घेऊन प्रणाम केला व विनंति केली–"मातोश्री, आता मला इथून परतायला अनुज्ञा मिळावी."

राजमातेने आनंदाश्रु भरल्या डोळ्यांनी स्मितहास्य करीत स्वामींच्या मस्तकाचे चुंबन घेतले व ती म्हणाली–"तुझ्यासारखा पुत्र प्रसवून मी धन्य झाले. तू आपले कर्तव्य पूर्ण केलेस."

त्या रात्री स्वामी आपल्या निवासस्थानी परतले.

वेताळाने ही गोष्ट सांगून म्हटले– "राजा, या गोष्टीवरून एक गोष्ट स्पष्टच झाली की तो ज्ञानी दुसरातिसरा कोणी नसून शिवदत्तच आहे! आता माझ्या मनात एक शंका आली आहे–स्वामींनी आईच्या विनंतीने राज्याच्या रक्षणासाठी आवश्यक ती व्यवस्था केली व तेवढे करून पुन्हा परत जाण्यासाठी अनुमति मागितली. तो तर सन्यासी होता ना? काही वर्षांपूर्वी त्याने माता-पिता व राज्याचाही त्याग करून संन्यास ग्रहण केला. असा माणूस राज्याचे रक्षण करायला प्रवृत्त झाला हे आश्चर्य नाही का? शिवाय सौराज्य नीलसागर राज्याला मिळवून घेण्याची परवानगी त्याने कशी काय दिली? या शंकेचे उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोळ्याची छकले होऊन पडतील."

विक्रमादित्याने उत्तर दिले–"ही गोष्ट खरीच की एकादी व्यक्ति केवळ आपल्या अंतरात्म्याच्या आज्ञेने चालायचे असा निश्चय करून तो अमलात आणत असेल, तर सामाजिक नीतिनियम त्याला बंधन-कारक नसतात, तसे बंधन पाळणे आवश्यक नाही. परंतु जगात कोणत्याही व्यक्तिला जन्मदात्या आईच्या बाबतीत आपल्या कर्तव्याचे विस्मरण कधीच होत नाही. म्हणूनच शिवदत्ताने आईचे दुःख निवारण केले व आश्रमात परत जाण्याची अनुज्ञा मागितली. आता राज्यरक्षणाची गोष्ट–परिणाम एकच का असेना, पण सामान्य राजकुमार व ज्ञानी स्वामी यांच्यात फार फरक असतो. शिवदत्त खराच राजा असता, तर आपल्या स्वार्थासाठी व राज्य-रक्षणासाठी त्याने शत्रुशी युद्ध केलेच असते. परंतु आता आपल्या असामान्य शक्तींच्या बळाने त्याने आपला परिवार व राज्य यांचे रक्षण केले. आणि आपल्या आश्रमात रहात असतानाही संकटग्रस्त लोकांवर तो असे उपकार करीत असे. सौराज्य नील-सागर राज्यात विलीन करण्याबाबत त्याने विरोध न करण्याचे कारण असे की–सौराज्यचा राजा नीलसागरावर हक्क प्रस्थापित करू इच्छित होता."

असे उत्तर देऊन राजा मौन होताच प्रेतातील वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडावर लटकू लागला.

(कल्पित)







# भित्रेपणाचा फायदा

एकदा एका राजाने आपल्या दरबारी लोकांना उद्देशून विचारले–"या जगात सर्वात वेगाने पळणारा प्राणी कोणता ?"

सभासदांकडून आलेल्या निरनिराळ्या उत्तरांपैकी एकामुळेही राजाचे समाधान झाले नाही.

तेव्हा विदुषकाने उठून म्हटले–"महाराज, माझ्या मते माझ्याहून अधिक वेगाने पळणारा प्राणी अवघ्या दुनियेत नाही. एकदा धावण्याच्या स्पर्धेत मी एक हरीण, एक ससा आणि एका घोड्याला हरवले आहे."

राजाने विदूषकाकडे रागाने पहात म्हटले–"मी नुसत्या गप्पा ऐकायला इथे बसलो नाही. मला खरं उत्तर हवंय."

"महाप्रभु, माझं उत्तर बरोबरच आहे. परंतु त्यावेळेला इतक्या वेगाने धावण्याचे एक कारण आहे–त्यावेळी एक कुत्रा माझ्या मागे लागला होता." विदुषक उत्तरला.

यावर सर्व सभासद खो खो हसू लागले. विदुषकाने विनयाने म्हटले–"प्रत्येक प्राण्याची सहजगति निराळी असते, परंतु भीतीमुळे येणाऱ्या गतीत फरक पडतो. ही गोष्ट महाराजांच्या लक्षांत येणार नाही. कारण 'भीती' हा प्रकार कशाशी खातात हेच त्यांना माहीत नाही."

यावर सभासदांच्या तोंडून हर्षोद्गार बाहेर पडले. राजानेही हसून विदुषकाला आपल्या बोटातली मूल्यवान अंगठी बक्षीस दिली.





# महान भारतीय परंपरेसंबंधी स्पर्धा

## बंपर विभाग

### बंपर बक्षिसे

प्रथम क्रमांक बंपर : १०,००० रु. ची शिष्यवृत्ति*

द्वितीय क्रमांक बंपर : ५,००० रु. ची शिष्यवृत्ति*

तृतीय क्रमांक बंपर : २,५०० रु. ची शिष्यवृत्ति*

*पांच समान हप्त्यांत विभागून

उत्तेजनार्थ बक्षिसे: १९८८ एप्रिल अंकापासून ... वर्षभर मोफत.

Fullscreen 127 38 / 72

## बंपर विभाग

### (प्रवेश-पत्रिका)

आता. स्वत:चे १५ हून अधिक शब्द न वापरता 'कारण..............
या शब्दानंतरचे हे वाक्य पूर्ण करा.

भारताला एक उज्वल परंपरा आहे व ती समजून घेण्यासाठी 'चांदोबा' हे
एक उत्कृष्ठ साधन आहे, कारण ..............................................
..............................................................................
..............................................................................
..............................................................................

नाव ......................................... पत्ता ................................
वय ............................................................................
..............................................................................
..............................................................................

हे प्रवेश-पत्रिकेचे पान कापा व ताबडतोब या पत्त्यावर पाठवा :

**चांदोबा स्पर्धा, बंपर विभाग**
चंदामामा पब्लिकेशन्स
१८८ अर्काट रोड
मद्रास ६०००२६



# अंजिठा-एलोरा











या गुहांमधील अधिकांश लेणी, बौद्ध स्तूप तथा स्तम्भ हे ईसवी सनाच्या सहाव्या व सातव्या शतकात निर्माण झालेले आहेत.

येथील चित्रे व शिल्पातून केवळ बौद्ध धर्माच्या सिद्धान्तांचेच नव्हे, तर त्यावेळच्या सामाजिक जीवनाचेही चित्रण केलेले आढळून येते. 'परदेशी व्यापाऱ्यांना आपले घोडे विकण्या-बाबत एक भारतीय माणूस राजाशी चर्चा करीत आहे.' अशा प्रकारची वर्णने असलेली काही चित्रेही यात आहेत.





'त्या कालात स्त्रिया संगीत शिकत असत' अशा विधानाला पुष्टि देणारी चित्रे व 'एका राजासमोर स्त्रियांनी आयोजित केलेली संगीतसभा दाखव-णारे चित्र'–इ. चित्रे म्हणजे सातव्या शताब्दीतल्या राजकीय जीवनाचे सुंदर उदाहरण आहे.

औरंगाबादपासून ३० कि.मी. अंतरावर 'एलोरा कोरीव लेणी आहेत. तेथे बौद्ध, जैन व हिन्दू धर्मांशी संबंधित ३८ मंदिरे आहेत. या प्राचीन मंदिरा-तील काही मंदिरे चौथ्या शतकातील आहेत.












त्यातील 'कैलासनाथ मन्दिर' हा शिल्पकलेचा अपूर्व नमुना आहे. एकाच शिळेतून निर्माण केलेल्या या मन्दिराशी बरोबरी करील असे शिल्प दुनियेत अन्यत्र कोठेही नाही.

२७६ × २५४ फूट लांबी रुंदी असणारे सोळावे लेणे विश्वविख्यात आहे. शिव-पार्वती यांच्या लीला प्रदर्शित करणारी असंख्य अनुपम शिल्पे इथे पहायला मिळतात.





पंधराव्या लेण्यातील वामनावताराच्या दृश्यावर तर दृष्टी खिळूनच रहाते. बिसिलीने आपल्या 'एलोऱ्याची आश्चर्य' नावाच्या ग्रंथात असे नमूद केले आहे की–एलोरा लेण्यांशी तुलना करता येतील अशा प्राचीन शिल्पांचे नमुने दुनियेत अन्यत्र कोठेही पहावयास मिळणार नाहीत.



# पाटा-वरवंट्याचे महात्म्य

शेकडो वर्षांपूर्वी ब्रह्मदेशातील एका गावात एक म्हातारी रहात असे. तिला दोन नातू होते. मरते समयी आपल्या दोन्ही नातवांना जवळ बोलावून ती म्हणाली–"बाळांनो, माझ्याजवळ सोने-चांदी वगैरे काहीही नाही. स्वयंपाकघरात एक पाटा आणि वरवंटा तेवढा आहे. मोठ्याने पाटा घ्यावा व छोट्याने वरवंटा घ्यावा आणि आरामात रहावे." एवढे बोलून म्हातारीने 'राम' म्हटला.

"मला पाटा काय करायचा? मी काय स्वयंपाक करून जगू?" असे म्हणून मोठा मुलगा गावाला निघून गेला. तिथे मेहनत मजूरी करून त्याची स्थिती चांगली सुधारली. पण छोटा विचार करू लागला 'वरवंट्याचा काही उपयोग नसता, तर आजीने तो मला कशाला दिला असता?' आणि तो वरवंटा कायम आपल्याबरोबर बाळगू लागला. वरवंटा जवळ ठेवून फिरताना पाहून गावातले लोक त्याला हसत. तो रोज जंगलात जाऊन सुक्या काटक्या–छोटी लाकडे वेचून आणी व ती विकून आपले पोट भरी.

एक दिवस तो जंगलात लाकडे वेचत असतां एक मोठा लांडगा त्याच्याकडे आला. तो घाबरून जवळच्या एका झाडावर चढून बसला.

"तू घाबरू नको. मी तुला कसलाही त्रास द्यायला आलो नाही. तुझ्याजवळचा वरवंटा थोड्या वेळासाठी मला देतोस?" लांडगा म्हणाला.

"वरवंट्याशी तुला काय काम?" मुलाने विचारले.

"माझा एक मित्र थोड्या वेळापूर्वी मरून पडला आहे. त्याच्या नाकपुडीत तुझ्या वरवंट्याचा वास दिला तर तो पुन्हा



"जिवंत होऊन उठेल." लांडगा म्हणाला.

"म्हणजे माझ्या वरवंट्यांत अशी अद्भुत शक्ती आहे ?" मुलाने विचारले.

"माझ्याबरोबर चल, तुला स्वत:लाच कळून येईल." लांडगा म्हणाला.

हे ऐकून छोट्याचे कुतूहल जागृत झाले आणि झाडावरून उतरून तो लांडग्याच्या मागे चालू लागला. जंगलात एके ठिकाणी मेलेला लांडगा पडला होता. म्हातारीच्या नातवाने आपला वरवंटा त्याच्या नाकाजवळ ठेवला. आणि काय आश्चर्य !—दुसऱ्याच क्षणी तो जिवंत झाला !

लांडगा म्हणाला—"तुझ्या वरवंट्याचे रहस्य त्याच्या वासातच आहे. ही गोष्ट जोपर्यंत तुझ्याशिवाय इतरांपासून गुप्त राहील तोपर्यंतच त्याची ही शक्ती टिकेल."

यानंतर आपला वरवंटा घेऊन छोटा गावाकडे परत चालला. वाटेत त्याला एका कुत्र्याचे प्रेत दिसले. त्याने आपला वरवंटा काढून त्याच्या नाकपुडीशी धरला. कुत्रा झट्दिशी उठून उभा राहिला आणि शेपूट हलवत छोट्याच्या मागे मागे चालू लागला. लवकरच छोट्या भावाची ख्याती गावभर पसरली. लोक त्याला प्राणदान देणारा 'धनवैद्य' म्हणू लागले. परंतु अजूनही कोणाला माहीत नव्हते की प्राण-दान देण्याची शक्ती त्या वरवंट्यात आहे !

थोड्या दिवसांनी राजाच्या एकुलत्या एके कन्येचे प्राणोत्क्रमण झाले. छोट्याने तिला पुन्हा जिवन्त केले. राजाने कृतज्ञतेने तिचा विवाह छोट्याशी करून दिला व त्याला आपला वारस बनवले. राजाचा जावई बनल्यावरही प्राणदानाचे आपले कार्य त्याने चालूच ठेवले. त्यामुळे राज्यात प्राणांचे भय कोणालाही राहिले नाही.

एके दिवशी छोट्याच्या मनात विचार आला—वरवंट्याचा उपयोग करून मेलेला माणूस जिवंत होतो तर त्याचा असाच उपयोग करून वृद्धावस्था येण्याचे थांबवता येणार नाही का ? याचे प्रत्यंतर पहाण्या-साठी तो स्वत: रोज वरवंट्याचा वास



घेऊ लागला व बायकोलाही वास देऊ लागला. राजकुमारीला हे निरर्थक वाटे. परंतु आपला पती एक 'धनवैद्य' आहे—असेल काही कारण—म्हणून ती मुकाट्याने रोज वास घेत राहिली. आणि याचा परिणाम म्हणून ते दोघे कायम तरुणच राहिले.

या दोघांचे चिरतारुण्य पाहून चन्द्राला त्यांचा हेवा वाटला. त्याला वाटे—चिरतारुण्यावर फक्त आपलाच हक्क आहे. त्यामुळे छोट्याचा वरवंटा पळवायची संधी तो पाहू लागला.

एक दिवस छोट्याला आढळून आले की आपल्या वरवंट्यावर जरासे शेवाळे चढले आहे. ते शेवाळे घालवावे म्हणून त्याने वरवंटा उन्हात वाळायला ठेवला व स्वत: तिथे बसून राखण करू लागला.

हे पाहून राजकुमारीने त्याला टोकले—"हे काय ? तुम्ही तर आता लवकरच राजा बनणार आहात. वरवंट्यावर तुम्ही स्वत:च कशाला पहारा द्यायला हवा ? इतके नोकर आपल्याजवळ कशाला आहेत मग ?"

छोटा म्हणाला—"मी आपला कुत्रा सोडून दुसऱ्या कोणावरही विश्वास ठेवत नाही." असे म्हणून कुत्र्याला पहाऱ्यावर बसवून तो महालात निघून गेला.

ही संधी पाहून चन्द्र खाली उतरला व वरवंटा उचलून पळू लागला. अमावास्येचा दिवस असल्याने कुत्र्याला चन्द्र दिसेना. परंतु त्याला वरवंट्याचा वास सुपरिचित होता. म्हणून केवळ वासाच्या आधाराने तो चन्द्राचा पाठलाग करीत राहिला.

ब्रह्मदेशातल्या लोकांची आजही अशी समजूत आहे की अजूनही कुत्रा चंद्राचा पाठलाग करीतच आहे. चन्द्रग्रहणाच्या वेळी ते ओरडतात—"पहा पहा, कुत्रा चन्द्राला गिळत आहे." ग्रहण संपल्यावर म्हणतात—"कुत्र्याने त्याला सोडून दिले." त्यांची अशीही समजूत आहे की, कुत्रा हा लहान प्राणी असल्यामुळे तो चन्द्राला पूर्णत: गिळू शकत नाही.



# मंगारामची बुद्धिमानी

श्रवन्तीपुरचा राजा नायबर्मा आपल्या झुबकेदार मिशांना अत्तर वगैरे लावून पुत्रवत् प्रेमाने त्या संभाळत असे. एक दिवस राजाची दाढी करता करता गप्पांच्या नादात चुकून न्हाव्याने एका बाजूची मिशी थोडीशी कापली.

आपली चूक लक्षात आल्याबरोबर–आता राजा आपल्या फाशीच देईल–या विचाराने तो घाबरला. पण त्याच वेळी त्याच्या डोक्यात एक अफलातून कल्पना आली.

त्याने राजाला म्हटले–"महाराज, राजाच काय पण मोठे मोठे सम्राट आणि चक्रवर्ती राजेही एकदा एकाद्या सवयीला बळी पडले की ती सवय सोडणे त्यांना अशक्य!"

गंगारामचे हे बोलणे ऐकून राजा मोठ्या तावाने म्हणाला–"मी आपली कोणतीही सवय घालवून दाखवतो."

"महाराज, ही गोष्ट इतकी सोपी नाही. आपल्याला मिशा सावरायची सवय आहे. समजा एकाद्या वेळी या मिशा नाहीशा झाल्या तरीही मिशांना ताव द्यायची व त्या सावरायची सवय आपण विसरणार नाही." आव्हान देत गंगाराम म्हणाला.

राजाचाही अहंकार आता जागा झाला. त्यानेही जोरात म्हटले–"मी हे मुळीच कबूल करणार नाही. वाटले तर आत्ताच माझ्या मिश्या उतरव."

गंगारामने सफलतेचा एक खोलवर श्वास घेतला आणि झट्कन राजाच्या मिश्या कापून टाकल्या.

एक दोन मिनिटे गेली न गेली तोच राजाचा हात मिशीकडे गेला. आता तो खळखळून हसू लागला.

गंगारामचे म्हणणे खरे मानून राजाने आपल्या गळ्यातला हार गंगारामला बक्षिस दिला.






मेरुपर्वतावर सर्व देवांची सभा भरली. सभेत विचारार्थ विषय होता–कंसाचा नाश कसा करायचा? कंसाच्या त्रासाने सर्व देव कंटाळून गेले होते. प्रत्येकाने आपापली कल्पना सांगितली. बराच वेळ या विषयावर साधक-बाधक चर्चा झाली. शेवटी सर्व देवांनी मिळून कंसाच्या पारिपत्यासाठी एक सुरेख योजना आखली व सभेचे काम संपले. त्या समारंभात भाग घेतल्यानंतर नारद सरळ मथुरेला पोचले. कंसाच्या महालाशी पोचताच त्यांना महाद्वारावरील प्रतिहारी सन्मानपूर्वक महालात घेऊन गेला.

कंसाने पुढे होऊन नारदाचे स्वागत केले. व अर्घ्य देऊन त्यांची पाद्यपूजा केली. अशा प्रकारे त्याने नारदाला संतुष्ट केले. नारद कंसाकडे दृष्टी वळवून म्हणाला–"वत्सा, तीर्थाटन करीत करीत मी मेरू पर्वतावर पोचलो. तेथे ब्रह्मदेवादि सर्व देवांची सभा भरली होती. कांही गंभीर चर्चा ऐकायला मिळेल अशा आशेने मी थोडा वेळ तेथे थांबलो, आणि काय सांगू! ते सर्व मिळून तुझा संहार करण्याची योजना आखत होते! तुझ्या काकाची मुलगी देवकी हिच्या गर्भातून जन्म घेणाऱ्या आठव्या बाळाकडून तुझ्या जिवाला धोका आहे! देवांचा रक्षक त्या रूपात जन्म घेणार आहे. म्हणून तू आपल्या प्राणरक्षणासाठी आतापासूनच काही व्यवस्था कर. धर्ममार्गाचे अवलंबन करून सुखाने







कालक्रमण कर. मी तुला हितचिन्तक आहे म्हणून ही खबर देण्यासाठी मुद्दाम इथे आलो." असे समजावून नारद आपल्या वाटेने निघून गेला.

यानंतर आपल्या सेवकांकडे हसून पहात कंस म्हणाला–"मी नारदाशी एवढयाच-साठी मैत्री ठेवतो की तो अतिशय बुद्धिमान आहे. पण तो काय माझ्यासारख्या सत्यशील माणसाला भीती दाखवतो होय? आणि मी काय ब्रह्मदेव व इतर देवांना भितो की काय? मी तर त्यांना मुळी मानतच नाही. माझा क्रोध उसळला तर मी माझ्या वज्रमुष्टीच्या एकाच प्रहाराने सर्व दिशा व दिक्पालांनाही चीत करू शकतो. सर्व पहाडांचे चूर्ण झाले किंवा सर्व सागरांचे पाणी पार सुकून गेले तरी मी विचलित होणारा माणूस नाही. आणि शिवाय असे पहा, या नारदाचे पाय व तोंड कधी चुप बसत नाही. कोणी न बोलवताच सगळयांकडे जातो, तोंडाला येईल ते बडबडत रहातो. एकाजवळ दुसऱ्याबद्दल कागाळी करून भांडण लावून देऊन आपण गंमत पहात रहातो. आता सांगतो आहे की यदुकुलाकडून माझ्या प्राणांना धोका आहे! एवढयासाठी आपले अरिष्ट, केशी, प्रलंब, धेनुक, पूतना, कालिया इत्यादि सर्वांनी जागरुक राहून माझ्या शत्रूंचा संहार करायला हवा. कोणीही बालक-मातेच्या गर्भातले का असेना-त्यालाही सोडून चालणार नाही. मी जिवंत असताना माझ्यावर अवलंबून असणारांना भयभीत होण्याचे कारण नाही. त्यांचे रक्षण करायला मी आहेच की! तेव्हां सर्वांनी स्वेच्छापूर्वक संचार करावा."

यानंतर कंसाने सभा समाप्त केली आणि तो आपल्या महालात गेला. तावडतोब आपल्या आप्त-मित्रांची गुप्त सभा बोलावून त्यांना तो म्हणाला– "आजपासून अनेक परिचारिका नेमून देवकीवर पहारा करण्याची व्यवस्था करू या. या परिचारिकांनी वसुदेवावरही



नजर ठेवली पाहिजे. देवकीला गर्भधारणा केव्हा झाली, कितवा महिना चालू आहे, प्रसूति केव्हा होणार वगैरे खडान्‌खडा माहिती त्यांनी देत राहिले पाहिजे. न दमता, न आराम करता रात्रं-दिवस पहारा चालू रहावा. पण लक्षात ठेवा—हे सर्व कशासाठी—याचा मात्र कुणालाही पत्ता लागता कामा नये.'' अशा प्रकारे कंसाने सर्वांना सावध केले.

या अवधीत नारद मथुरेहून सरळ विष्णुजवळ गेले व आपण कशा प्रकारचे बी पेरून ठेवले आहे आणि परिणामतः कंस कशी नीचकृत्ये सुरु करणार आहे याची माहिती त्यांना नारदाने दिली.

नारद निघून गेल्यानंतर भगवान विष्णु—कंसाच्या सर्व योजना असफल करून कसा जन्म घ्यावा याचा विचार करू लागले. या संदर्भात त्यांना एक जुनी हकीकत आठवली, ती अशी—पाताळ लोकात कालनेमीचे सहा पुत्र रहात असत. आपल्याला कधीही मृत्यु येऊ नये असा वर मागण्यासाठी त्यांनी ब्रह्मदेवाची आराधना सुरु केली. त्यावेळी तिन्ही लोकांवर राज्य करणाऱ्या हिरण्यकश्यपुला ही वार्ता समजली व त्याने क्रोधाने त्यांना शाप दिला की 'आपल्या कुलांतील श्रेष्ठ असा मी जिवंत असताना तुम्ही इतरांकडून वर मिळवण्याची कामना केलीत म्हणून तुमच्या पित्याच्या हातूनच तुमचा मृत्यु होईल.'

या गोष्टीचे स्मरण होताच विष्णुने योगमायेला बोलावून आदेश दिला—"तुझ्याकडून एक कार्य पूर्ण होणार आहे. कालनेमीचे षडगर्भु नावाचे सहा पुत्र आहेत. त्यांच्यापैकी एकेकाला क्रमाक्रमाने घेऊन जाऊन त्यांचा देवकीच्या गर्भात प्रवेश करव. त्यांचा जन्म झाल्याबरोबर त्या त्या वेळी कंस त्यांचा संहार करील. पण देवकीच्या सातव्या गर्भाला मात्र रोहिणीच्या गर्भात परिवर्तित कर. लोकांना वाटेल की कंसाच्या भयाने सातव्या वेळी देवकीचा गर्भपात झाला आहे. ते बालक माझा भाऊ म्हणून रोहिणीच्या पोटी जन्म घेईल. यानंतर जेव्हा मी देवकीचा आठवा पुत्र म्हणून देवकीच्या गर्भात प्रवेश करीन त्याचवेळी तू स्वतः कंसाच्या गाईचा पालक नंद याची पत्नी यशोदा हिच्या गर्भात प्रवेश कर. मध्यरात्रीच्या वेळी जन्म घेऊन आपण दोघेही स्थानपरिवर्तन करू. यानंतर कंस जेव्हा तुला दगडावर आपटून मारण्याचा प्रयत्न करील तेव्हा तू आकाशात उडून जा. इन्द्र तुझ्या स्वागताला येऊन तुला आपल्याबरोबर घेऊन जाईल. आणि आदिशक्ति म्हणून तुला अभिषेक करील. नंतर तू मेघाप्रमाणे नीलवर्णाची व चन्द्रासारख्या चेहऱ्याची, अष्टभुजांमधे शंख, चक्र, गदा, खड्ग, पद्म, मधुकलश, मुसळ व शूळ धारण करणारी, नीलवर्णाच्या रेशमी वस्त्राने आवृत अशी देवी म्हणून इतर देवदेवता तुझे श्रद्धा व भक्तीने पूजन करतील.

योगमायेने विष्णूचे आज्ञापालन केले. यांच्या कृपेमुळे देवकीने एका मागोमाग एका षड्गर्भूला आपल्या गर्भात धारण केले. ज्या ज्या वेळी तिचा प्रसूतिकाळ जवळ येई त्या त्या वेळी सेवक ताबडतोब कंसाला ही वार्ता कळवत. कंस येऊन बालकाला घेऊन जाई व त्याचे पाय पकडून शिळेवर आपटून त्या बाळाची दारुण हत्या करी.

देवकी ज्यावेळी सातव्यांदा गर्भवती झाली, त्यावेळी योगमाया तो गर्भ घेऊन





गेली व गोकुळात रहाणाऱ्या देवकीच्या उदरात त्याचा प्रवेश घडवला. रोहिणीने ठरल्यावेळी चन्द्रासारख्या सुंदर मुलाला जन्म दिला. संरक्षण द्वारा हा गर्भ उत्पन्न झाला म्हणून त्याचे नाव 'संकर्षण' पडले. हाच बलराम होय.

बलरामाच्या जन्मानन्तर देवकीला आठव्यांदा गर्भधारणा झाली. त्याच दिवशी गोकुळात नन्दपत्नी यशोदेलाही गर्भधारणा झाली. नऊ महिने भरल्यानंतर श्रावण महिन्यातील कृष्णपक्षातील अष्टमीला मध्यरात्री आकाशात ज्यावेळी पाच ग्रह उच्चस्थानी होते अशा मुहूर्तावर विष्णुचा अंश कृष्ण याचा देवकीच्या पोटी जन्म झाला. त्यावेळी वसुदेव व देवकी यांच्याशिवाय कोणीही जागे नव्हते. पहारेकरी गाढ निद्रेत प्रेतासारखे निष्चेष्ट पडले होते.

कसे कुणास ठाऊक, वसुदेवाच्या मनात आले की त्याला मुलगा झाला आहे. म्हणून तो देवकी जवळ आला. तेथे पोचल्यावर जणू काही चन्द्रोदयच झाला आहे असे त्याला वाटले. नुकतेच जन्मलेले बालक दाट केसांचे व मेघवर्णाचे होते. त्याच्या शरीरावर कुठेही एवढासा डाग किंवा मळ नव्हता. तो आपले विशाल डोळे उघडून चोहीकडे पहात होता!

बाळाला पाहून वसुदेवाच्या मनात आले—"याही बाळाला कंसाने मारले तर माझ्याने ते दु:ख सहन करवणार नाही. त्यापेक्षा याला इथून नेऊन कुठेतरी लपवावे."

देवकीला यावेळी प्रसववेदना न होताच हे बाळ जन्मले होते. परंतु आता काय करावे हे तिलाही समजेना! वसुदेवाने आपला विचार देवकीला सांगितला व तिच्या मांडीवरील बाळ उचलून घेतले. झटकन तो अंत:पुर पार करून सरळ नन्दाघरी गेला. तेथे यशोदेने नुकताच एका कन्येला जन्म दिला होता व ती स्वत: गाढ झोपली होती. वसुदेवाने हळूच मागल्या बाजूने आपल्या मुलाला तेथे ठेवले व तिच्या मुलीला देवकीजवळ आणून ठेवले, व स्वत: ताबडतोब कंसाकडे जाऊन देवकीला कन्यारत्न झाल्याची वार्ता त्याला दिली.

ही वार्ता ऐकून कंस घाबरून उठून बसला, भरकन कपडे ठीक करून प्रसुतिकक्षाच्या दाराशी आला, आणि ओरडूनच त्याने बाळाची मागणी केली.

देवकीने बाळाला आपल्या छातीशी धरले आणि म्हटले—"दादा, रागावू नकोस. यावेळी मला मुलगी झाली आहे. तुझ्यासारख्या विख्यात वीराला एक मुलगी काय करू शकेल? कृपा कर, हिला तरी वाचव. यापूर्वी जी मुले झाली, ते सर्व मुलगे होते, म्हणूनच त्यांचा वध करताना मी तुला रोखले नाही, कि न जाणो, त्यांच्यामुळे तुला भविष्यात काही त्रास होऊ शकेल! पण दादा, यावेळी तरी माझ्यावर दया कर रे!"

पण कंसाने तिच्या आक्रोशाकडे लक्षच दिले नाही आणि तो प्रसूतिगृहात शिरू लागला. हे पाहून पहाऱ्यावर असलेल्या स्त्रियाही हाहा:कार करू लागल्या. परंतु त्याने त्या मुलीला देवकीच्या हातून हिसकावून घेतले व पहिल्याप्रमाणेच दगडावर आपटण्यासाठी हात उचलला. परंतु ते बाळ कंसाच्या हातातून निसटून आदि-



शक्तिच्या रूपात आकाशात उभे राहिले, कलशातला मध पिऊन, विकट हास्य करीत, कंसाकडे पहात आदिशक्ति म्हणाली—"अरे दुष्टा! तू मला दगडावर आपटून मारायचा प्रयत्न केलास. तुझा प्रबळ शत्रु तुला मारायला येईल तेव्हा याचा सूड म्हणून मी त्यावेळी मृत्युदेवीच्या रूपात येऊन तुझे रक्त व प्राण हरण करीन. तू गर्व कसला करतोस, तुझा संहारक जन्माला येऊन चुकला आहे."

त्याच वेळी कंस देवकीकडे गेला, हात जोडून तिला म्हणाला—"देवकी, मी प्राणभयाने महान् पाप केले. तुझी सर्व मुले मारून मी तुला अपार दु:ख दिले, पण

इतके करून मी असफलच झालो. ब्रह्मदेवाने ललाटी लिहिलेले पुसणें तुच्छ मानवाला अशक्य आहे. प्राणांचे पोषण किंवा संहार ही तर कालपुरुषाच्या हातची गोष्ट, आपण मानव केवल निमित्तमात्र! म्हणूनच मी तुझे पाय धरून तुला विनवतो की, तू आपले दुःख विसरायचा प्रयत्न कर."

देवकी कंसाचे सांत्वन करीत म्हणाली–"दादा, माझ्या नशिबी दुःख भोगण्याचेच लिहिले होते, त्याला तू तरी काय करणार?" देवकीने त्याला अशाप्रकारे समजावून पाठवून दिले.

सकाळ होण्यापूर्वीच वसुदेव नन्दाच्या घरी गेला. नन्द पुत्र-जन्माच्या आनन्दात होता. वसुदेव त्याचे अभिनन्दन करीत म्हणाला–"वा, तुझा मुलगा काय सुन्दर आहे! तू मोठा भाग्यवान आहेस. पण आता असे कर–या मुलाला घेऊन ताबडतोब आपल्या गावी–गोकुळात जा. तेथे माझ्या पत्नीला–रोहिणीलाही एक मुलगा झालेला आहे. त्या मुलाला आपला मोठा मुलगा मानून आणि या बाळाला धाकटा मुलगा म्हणून तू दोघांचेही छान लालन–पालन कर. त्या जंगली भागात सावधगिरीने मुलांचा सांभाळ कर. क्रूर कंसाने देवकीच्या सर्व मुलांना मारून टाकले, रोहिणीला झालेला पुत्रच फक्त वाचला. त्याच्या लालनपालनाची जबाबदारी तुझी. सर्व मुलांचा संहार करण्याचे कार्य पूतनेवर सोपवलेले आहे, ती मुलांचा शोध घेत आहे. उजाडण्यापूर्वीच इथून निघून तू आपल्या गायींच्या कळपाकडे जा. तू इथे नगरात शुल्क वसूल करायलाच आला होताच ना? ते तुझे कार्य पूर्ण झालेले आहे, तेव्हां आता थोडाही वेळ न घालवता निघून जा."

वसुदेवाच्या तोंडची वार्ता ऐकून नंदवा बाळाला पाळण्यात ठेवून, वसुदेवाचे आभार मानून, आपल्या पत्नी व मुलासह बुटके बैल जोडलेल्या गाडीतून शीघ्र गतीनें आपल्या गायींच्या कळपाकडे निघून गेला.





# अपात्रदान

श्रावन्तीचा राजा सुकेतु एकदा शिकारीसाठी एका जंगलात गेला. शिकारीमागे धावताना नदी, नाले, डोंगर पार करीत करीत तो आपल्या सहकाऱ्यांपासून दूर गेला. एकटा हिंडताना त्याला एक दृश्य दिसले–एक तरुण धनगर एका झाडाखाली दगडावर गाढ झोपी गेला होता व एक चित्रकार थोडा दूर उभा राहून त्याचे चित्र काढीत होता.

राजा हळूच त्या चित्रकाराजवळ गेला. अत्यंत भोळ्या दिसणाऱ्या धनगराचे इतके सजीव चित्र काढणाऱ्या त्या चित्रकाराचे राजाने अभिनन्दन केले.

राजाला ओळखून चित्रकार म्हणाला–"महाराज, माझे नाव अनन्त. आपण पहा तर खरे-चित्ते, अस्वले यांसारखे क्रूर प्राणी जिथे स्वच्छन्दपणे फिरतात अशा या ठिकाणी हा धनगर मेंढ्या चारायला आला. मेंढ्यांचा पहारा व आपले रक्षण हे दोन्ही विचार सोडून हा कसा शांत झोपला आहे!"

राजाने त्या तरुणाकडे व त्याच्या चित्राकडे एकदा नीट बारकाईने पाहिले आणि आपल्या गळ्यातला मूल्यवान हार काढून चित्रकाराच्या हाती देत तो म्हणाला–"हे चित्र मी घेऊन जातो. त्याचे मूल्य म्हणून हा हार तू ठेवून घे."

यानंतर चित्रकाराने धनगराला झोपेतून उठवले व राजाने दिलेला हार त्याला देत चित्रकार म्हणाला–"महाराज, मी थोडाफार चांगला चित्रकार असेनही. परंतु आपल्या पसंतीला उतरेल असे चित्र मी काढले असेल तर त्याचे श्रेय या धनगराला आहे. एकादे सुंदर निसर्गदृश्य चितारावे म्हणून मी या भागात आलो होतो. परंतु दिवसाढवळ्या या जंगलात इतक्या निश्चिन्त

सुमन देसाई

पणें झोपू शकणारा हा माणूस फारच चांगला माणूस असला पाहिजे, म्हणून मी याचेच चित्र काढले. तेव्हा आपणाकडून मिळालेले हे बक्षिस यालाच देणें उचित होईल."

यावर राजा सुकेतुने आपल्या बोटातली हिऱ्याची अंगठी काढून चित्रकाराला दिली व म्हणाला—"तू आणखी एकादे सुंदर चित्र काढून मला आणून दे. तोपर्यंत ही अंगठी तुला या गोष्टीची आठवण देत राहील."

या अवधीत राजाचे सहकारी त्याला शोधत तेथे पोचले व राजा त्यांच्याबरोबर नगराकडे निघून गेला

राजाला चित्रकाराचे फार कौतुक वाटले. चित्रकाराची दृष्टि बरोबर योग्य चित्र विषयाकडे गेली. घोर अरण्यात सुखाने झोपणारा धनगर खरोखरीच चितारण्यासाठी योग्य विषय होता. साध्या विषयात ज्याला मोठा आशय सापडतो तोच खरा कलाकार! सामान्य चित्रकारांना विषय ही सामान्यच भेटतात. सुरेख चित्र विषय शोधण्याचे कसब त्यांच्यात नसते.

या घटनेला पंचवीस वर्षं लोटली व एक दिवस अनंत सुकेतुच्या दरबारात आला. त्यावेळी साखळदंडांनी जखडलेल्या एका लुटारूला मृत्युदंडाची शिक्षा सांगून 'ही शिक्षा उद्याच अमलात आणली जावी' अशी आज्ञा राजा आपल्या शिपायांना देत होता.

अनंत त्या लुटारूच्या चेहऱ्यावरचे भाव पहात होता, तेवढ्यांत त्याला ओळखून राजा म्हणाला—"चित्रकाराचे स्वागत असो. एकादे सजीव चित्र काढून आणले आहेस काय?"

शिपाई घेऊन जात असलेल्या लुटारूकडे अंगुलीनिर्देश करीत अनन्त म्हणाला—"महाराज, या लुटारूच्या चेहऱ्यावरची क्रूरता म्हणजे माणसांतली कठोरता व पशुता कोणत्या थरापर्यंत जाऊ शकते याचे प्रबळ उदाहरण आहे. मी याचेच सजीव चित्रण करू इच्छितो. मला परवानगी मिळावी."

राजाकडून परवानगी मिळवून अनंत कारागृहात गेला. त्याला पाहिल्याबरोबर त्या लुटारूने आपली मान दुसरीकडे फिरवली.

अनन्तने त्याला आपल्या येण्याचे कारण सांगितल्यावर तो थोडा वेळ स्वस्थ बसला. अनन्तला आपले चित्र पुरे करीपर्यंत त्याने पूर्ण महकार्य दिले. चित्र खूपच लवकर पूर्ण झाले.

प्रसन्न होऊन पंचवीस वर्षांपूर्वी राजाकडून मिळालेली अंगठी अनंत त्या लुटारूला देऊ लागला. परंतु ती नाकारत त्याने विचारले—"महाराज, आपण मला ओळखले नाही?"

हा प्रश्न ऐकून अनन्तला आश्चर्य वाटले व त्याने नकारार्थी मान हलवली.

विकट हास्य करीत लुटारू म्हणाला—"आपण मला ओळखले नाही, राजानेही नाही ओळखले. दुर्भाग्य माझे, दुसरे काय?"







त्याच्या बोलण्याचा अर्थ न कळून अनन्त म्हणाला–"राजा तुला मृत्युदण्ड फर्मावत असताना मी तेथेच होतो. तू त्याच वेळी राजाला आपला परिचय का दिला नाहीस?"

"मी विचार केला की आता वेळ निघून गेली आहे. पण आता आपणही इथे आहात, आपण माझी व राजाची भेट घडवाल?" लुटारूने विचारले.

लुटारूच्या बोलण्यात नक्कीच काही महत्वपूर्ण रहस्य असावे असे वाटून अनन्त तावडतोब राजाकडे गेला व त्याने राजाला सर्व हकीकत सांगितली. राजाच्या मनातही कुतूहल जागृत झाले आणि त्याने तावडतोब लुटारूला हजर करण्याची आज्ञा दिली.

शिपायांनी लुटारूला राजासमोर आणल्या बरोबर अनन्तकडे बोट दाखवत तो राजाला म्हणाला–"महाराज, माझ्या या दुरवस्थेचे कारण हा चित्रकारच आहे. एवढ्याने समाधान न होऊन हा पुन्हा एकदा माझ्यात लोभ आणि धनलालसा निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहे. आपण याला जी हिऱ्याची अंगठी दिली ती तो मला देऊ इच्छित होता."

राजाला आश्चर्य वाटले, त्याने विचारले–"ही अंगठी मीच चित्रकाराला दिली हे तुला कसे ठाऊक?"

हसून लुटारू क्षणभर चुप बसला आणि म्हणाला–"महाराज, पंचवीस वर्षांपूर्वी मी एक भोळासा निष्पाप धनगर होतो. एक दिवस कडक उन्हाच्या वेळी दुपारी मी जंगलात झाडाखाली सुखाने गाढ झोपलो होतो. त्यावेळी या चित्रकाराने हुबेहूब चित्र काढले प्रसन्न होऊन आपण त्याला आपला कंठहार दिलात. तोच हार माझ्या गळ्यात फाशीचा गळफास होऊ पहात आहे."

ही हकीकत ऐकल्याबरोबर राजा व चित्रकार दोघेही समजून चुकले की पंचवीस वर्षापूर्वीचा निष्पाप धनगर व आजचा हा क्रूर लुटारू दोघे एकच. आता प्रश्न एवढाच की हा लुटारू का बनला?

राजाच्या प्रश्नावरून लुटारू आपली कहाणी सांगू लागला–"महाराज, आपण चित्रकाराला जो हार बक्षिस दिला होता तो त्याने मला दिला. तो हार जवळच्या जयनगर नावाच्या लहानशा शहरात मी विकायला घेऊन गेलो. माझी वेषभूषा पाहून जव्हेरी मला चोर समजला व त्याने मला कोतवालाच्या हाती दिले. मी सांगितलेली हकीकत कोतवालाला कपोल-कल्पित वाटली व त्याने मला कैदेत टाकले. त्या कारागृहात इतर डाकूलुटारूंशी माझा परिचय झाला. त्या परिचयाचे मैत्रीत रूपान्तर झाले. आणि काय? त्यांच्या प्रभावामुळे मी कायमचा डाकू-हत्यारा बनलो."

त्या लुटारूची हकीकत लक्षपूर्वक ऐकून राजाला मोठे आश्चर्य वाटले–जंगलात निश्चिन्तपणे शेळ्यामेंढ्या चरायला नेऊन आपला वेळ घालवणाऱ्या निष्पाप धनगराचे या लुटारूत रूपान्तर झाले!

असा विचार करून सुकेतुने त्याला विचारले–"तू जे जघन्य अपराध केलेस त्याबद्दल तुला आता पश्चाताप वाटतो की नाही?"

हा प्रश्न ऐकून मान खाली घालत लुटारू म्हणाला–"महाराज, माझ्या पश्चात्तापाला काही सीमाच नाही. पण उद्या तर मी फाशी जाणार. या पश्चात्तापाचा आता काय उपयोग?"

राजा तावडतोब म्हणाला–"माझ्या 'जनावरांच्या पशुपालांचा मुकादम' म्हणून मी तुझी नेमणूक करीत आहे. ते पद तू संभाळ, जा." आणि चित्रकाराला आपला अत्यंत मूल्यवान हार बक्षीस देत राजाने सल्ला दिला–"विद्वान लोकांनी म्हटलेच आहे–'अपात्रदान हे हानिकारक होते.' मी हा जो हार तुला देत आहे तो कोणत्याही अपात्र, अयोग्य माणसाला दान करून पुन्हा असें त्याला संकटात पाडू नकोस."





# दोन ब्रह्मराक्षस

एका गावात एक शेतकरी कुटुम्ब होते. दोघेही नवराबायको शेतीवाडीत खूप मेहनत करून पोटापुरते मिळवत असत. पुष्कळ वर्षांनी त्यांना एक मुलगा झाला. त्याचे नाव 'सुलोचन' ठेवले. लहान-पणापासून शेतीवाडी सोडून विद्या शिकायची त्याला आवड उत्पन्न झाली. 'मला शिकवा' असा हट्ट तो करू लागला. मुलाची आवड पाहून शेतकऱ्याने गावातल्या पंडिताकडे त्याला शिकायला ठेवले.

पाच वर्षांच्या आतच पंडिताला अवगत असलेली सर्व विद्या सुलोचनने शिकून घेतली. आणि तो कविताही रचू लागला.

एक दिवस पंडित सुलोचनच्या आई-वडिलांकडे येऊन म्हणू लागला—"तुमचा मुलगा भविष्यात एक महान् कवि बनू शकेल. पण आपल्या गावात काव्याबद्दल कोणाला आदर नाही. आपल्या देशाच्या राजालाही काव्यात खास अभिरुची नाही. तेव्हा आता तुम्ही आपल्या मुलाला शेतीच्याच कामाला लावा.

आई-वडिलांनी मुलाला खूप समजावून पाहिले, पण त्याचे मन शेतीवाडीच्या कामात रमेना. शेतकरी आपल्या एकुलत्या एक मुलाचे मन दुखवू इच्छित नव्हता. तो बायकोला म्हणाला—"आपण आणखी जास्त मेहनत करून पैसा जोडून ठेवू. त्या पैशातून आपल्या मुलाला कोणतीही चिन्ता करावी न लागता आरामाने जगता येईल."

तिनेही नवऱ्याची गोष्ट मानली. दोघेही खूप मेहनत करू लागले. परंतु दुर्भाग्याने एक दिवस शेतकरी अचानक साप चावून मेला. त्या धक्क्याने एकाएकी हृदयक्रिया बंद पडून सुलोचनच्या आईनेही इहलोकीची यात्रा संपवली.

मिलिन्द डिके

नातेवाईकांनी सुलोचनला कांही दिवस आश्रय दिला, खोटे-नाटे हिशोब सांगून त्याची जमीन वगैरे सर्व गिळंकृत केले. आणि एके दिवशी त्यांनी सुलोचनला सांगितले—"हे पहा, तू आमच्या बरोबरीने शेतात कष्ट करशील तरच तुझ्या पालन-पोषणाचा भार आम्ही आमच्यावर घेऊ. नाहीतर तुला आमच्या घरात थारा मिळणार नाही."

कोणत्याही तऱ्हेचा प्रतिवाद न करता सुलोचन तावडतोब घराबाहेर पडला. एका जंगलातून जाताना थकून तो एका झाडाच्या सावलीत बसला. चोहोकडे भरलेले निसर्ग सौंदर्य पाहून त्याचा तोंडून काव्य झरू लागले.

त्या झाडावर बरेच दिवसांपासून एक ब्रह्मराक्षस रहात होता, तो कवितेचा भोक्ता होता. सुलोचनची कविता ऐकून तो त्याच्यासमोर प्रकट होऊन आपला परिचय देत म्हणाला—"कविता ऐकून फार काळ लोटला. तू रोज मला कविता ऐकवलीस तर तू मागशील ते मी तुला देत जाईन."

सुलोचनने ब्रह्मराक्षसाचा प्रस्ताव मानला. ब्रह्मराक्षसाने स्वादिष्ट भोजनाची थाळी सुलोचनसमोर ठेवली, तो मोठ्या तृप्तीने जेवला. एके दिवशी ब्रह्मराक्षस त्याला म्हणाला—"आजपर्यंत मी तुझ्या कविता ऐकल्या, तुझी खूपशी सेवाही मी केली. त्याच्या बदल्यात तू आता माझ्यावर एक काव्य रचून दाखव."





"निसर्गाने कधी 'माझ्यावर काव्य कर' असे मला सांगितले? निसर्गाच्या मागणीवरून मी कधी निसर्गकाव्य केले नाही. मी आपल्या मनानेच आपल्या आवडीच्या विषयावर काव्य रचतो." सुलोचन उत्तरला.

"तुला माझ्यावर काव्य करावेच लागेल. तोपर्यंत मी तुला या जंगलाबाहेर जाऊ देणार नाही, खायला प्यायला देणार नाही. शिवाय मी तुला खूप त्रास देईन, सतावीन."—राक्षस क्रोधाने म्हणाला.

"तुझ्या धमक्यांनी माझ्यावर काहीही परिणाम होणार नाही, त्यामुळे काही मला काव्य स्फुरणार नाही." सुलोचन स्पष्टच बोलला.

त्या दिवसापासून ब्रह्मराक्षसाने सुलोचनला जेवण देणे बंद केले तो दुबळा, अशक्त होऊ लागला पण त्याने राक्षसावर काव्य केले नाही काही दिवस राक्षस सुलोचनला हवेत उडवून चेंडूसारखा खेळू लागला, तरीही तो विचलित झाला नाही. शेवटी चिडून ब्रह्मराक्षसाने त्याचे पाय पकडून गरगर फिरवून त्याला हवेत झोकून दिले.

सुलोचन अन्यत्र कुठे जमिनीवर वगैरे पडला असता तर मेलाच असता, परंतु सुदैवाने तो राक्षसाच्या हातून उडला तो थेट राजाच्या बिछान्यावर जाऊन पडला!

राजा दचकून उठला आणि सुलोचनला पाहून म्हणाला—"तू कोण आहेस? एकदम इथे कसा आलास?"

सुलोचनने आपला सर्व वृत्तान्त राजाला सांगितला. राजाला ती कहाणी फार विचित्र वाटली तरीही त्याने त्यावर विश्वास ठेवला. राजाला गाण्यात फारशी रुचि नव्हती तरीही त्याला त्याचा कविता आवडल्या. तो म्हणाला—"तू थोडे दिवस माझ्या दरबारात रहा ना!"

सुलोचनने स्वीकृति दिली. त्याच्या कविता ऐकून सर्व दरबारी त्याची प्रशंसा करू लागले. त्याने राजमहाल, राजोद्यान, राजधानीची शोभा, तिथल्या नद्या-पर्वत, वनसौंदर्य यांवर ज्या कविता केल्या त्या सर्व नगरामधे गीतांच्या रूपात गायल्या जाऊन लोकप्रिय झाल्या.

एक दिवस राणी राजाला म्हणाली—"महराज, सर्व शोभा-सौंदर्यस्थळे कवींच्या काव्यांमुळे लोकप्रिय होतात. तेव्हा आपणा दोघांना नायक-नायिका कल्पून आपल्यावर काव्य रचायला कविमहाशयांना सांगा ना."

राजाला राणीचा हा प्रस्ताव आवडला. त्याने असा विचार केला की सुलोचनने काव्यांतून राजाचे चरित्रचित्रण केले तर जनता त्याची जीवनगाथा गीतरूपात गात राहील, आपलेही नाव राहील.

सुलोचनला बोलावून राजाने त्याला महाराणीची इच्छा सांगितली. सुलोचन यावर नम्रतापूर्वक म्हणाला—"प्रभु, कोणतेही सौंदर्य जेव्हा माझ्या मनाला आकर्षित करते, माझ्या मनावर प्रभाव पाडते तेव्हां मला आपोआप काव्यस्फूर्ति येऊन मी कविता करतो. परंतु जे सौंदर्य मला आकर्षित करीत नाही त्यावर मी कोणाच्या आज्ञेने काव्यरचना करू शकत नाही. माफी असावी."

राजाने सुलोचनला एका आठवड्याची मुदत दिली, परंतु त्याच्या निर्णयात काहीही बदल झाला नाही. परिणामतः राजाने रागावून त्याची बंदीशाळेत रवानगी केली.

एक वर्ष निघून गेल्यावर राजा सुलोचनला भेटायला गेला—"तुला कारागारातले हे जीवन कसे वाटते?" राजाने विचारले.

"प्रभु, या एकाकीपणामुळे माझे मन देवाकडे आकर्षित होऊन त्यावर काव्यरचना



करून अत्यंत आनंदात मी जीवन व्यतीत करीत आहे. इथले जीवन खरोखरीच मला फार आवडले." सुलोचन म्हणाला.

"तू कुठल्या अदृश्य देवाची प्रार्थना कशाला करतोस. मी इथे जीताजागता परमेश्वर तुझ्यापुढे उभा आहे. तू मागशील ते मी तुला देईन. मग माझ्यावर आणि महाराणीवर कविता का रचीत नाहीस ?" राजाने विचारले.

यावर सुलोचनने एक शीघ्रकाव्य त्याला ऐकवले–मी विचार केला होता की भाग्य-देवीने मला ब्रह्मराक्षसाच्या मगर मिठीतून मुक्त केले. परंतु वस्तुतः देवीने मला तियून आणून दुसऱ्या एका ब्रह्मराक्षसाच्या ताब्यात दिले हे सत्य मला उशीरा कळून आले. ब्रह्मराक्षस कवीना त्रास देऊ शकतील, दुःख देऊ शकतील, परंतु त्यांच्या तोंडून कविता रचवू शकणार नाहीत–असा त्या काव्याचा अर्थ होता.

ही कविता ऐकून राजाला कळून चुकले की जंगलातला तो ब्रह्मराक्षस व आपण-यांच्या वर्तणुकीत काहीही फरक नाही. त्याला आपली चूक समजून आली. त्याने सुलोचनची कारावासातून मुक्तता केली व तो म्हणाला–"सुलोचन, तू आजपासून पूर्णतः स्वतन्त्र आहेस. तुला आवडेल तसे काव्य करीत तू पुन्हा माझ्याच दरबारात रहा."

यानंतर राजाराणीने मनापासून काव्यात रस घ्यायला सुरुवात केली. यावर प्रसन्न होऊन सुलोचनने त्या दोघांना प्रमुख पात्रे बनवून त्यांच्यावर काव्य रचले. हे काव्य राज्यभर विशेष आदरणीय बनले.

त्या काव्यात सुलोचनने एका ठिकाणी असा उल्लेख केला–जो राजा कोणतीही याचना किंवा आज्ञा न करता एका उत्तम प्रतिभाशाली कविला स्वतःबद्दल काव्य रचायला प्रेरित करतो, तो राजा खरोखरच मोठा रसज्ञ होय–अशा प्रकारे एका महान् कवीचा आश्रयदाता म्हणून त्या राजाचे नाव सर्वतोमुखी झाले.





# न्यायदान

एक गावात जंबुनाथ आणि गौरी नावाचे एक जोडपे रहात होते. जंबुनाथ एक नंबरचा आळशी होता. त्याला कुठलाही कामधंदा येत नव्हता, वेळेवर येऊन जेवायचा आणि बाकी दिवसभर गाव भटकायचा. भांडखोर बायकोच्या शिव्या खाऊन मुकाट्याने झोपायचा.

एक दिवस घरातले तांदूळ संपले होते आणि गौरी स्वयंपाक न करताच नुसती बसून राहिली होती. जंबुनाथ नेहमीच्या वेळी आला व बायकोला जेवण वाढायला सांगितले. गौरीने त्याला शिव्या देऊन अगोदर आपल्या जिभेची खाज थमवली, आणि म्हणाली–"तुम्हाला काही कामधाम करता येत नाहीच. मी तरी हा संसाराचा गाडा कुठवर ढकलत राहू? आजपासून काहीही करून तुम्ही भात-भाकरीपुरते धान्य मिळवून आणा, तरच मी स्वयंपाक करून वाढीन. तुम्हाला काही पैसा मिळवता आला नाही तर चोरी करून का होईना, पण धान्य घेऊन या."

जंबुनाथ आश्चर्यचकित होऊन म्हणू लागला,–"तू मला चोरी करायचा सल्ला देतेस? अग, चोरी करणे हा अपराध आहे, पाप आहे ते! आणि शिवाय मला चोरी करायची विद्याही अवगत नाही.

"ते मला काही माहिती नाही. मी सांगितल्या प्रमाणे करा, नाहीतर हा झाडू पाहिलात?" असे म्हणून गौरीने नवऱ्याला झाडू उगारून दाखवला.

जंबुनाथने भयभीत होऊन विचारले–"तूच सांग ना, कुठे चोरी करायची? कशी करायची?"

"दुपारच्या वेळी सर्वजण शेतावर कामाला जातात. त्यावेळी तुम्ही एकाद्या घरात घुसा आणि धान्य उचलून आणा."

गौरीने सुचवले. जंबुनाथ असेच करू लागला. त्याला परतायला उशीर होऊ लागला की गौरी गल्लीच्या टोकाशी येऊन ओरडे–"सावधान"! आवाज ऐकल्याबरोबर जंबुनाथ झटक्यात धान्य चोरून पटकन हजर होई.

जंबुनाथ रोज निरनिराळ्या घरी चोरी करत असे. कोणत्याही घरात घुसले तरी तो आपल्या परिवाराला एक दिवस पुरेल इतकेच धान्य उचलून आणत असे. दुसऱ्या कोणत्याही किमती वस्तुंना तो हातही लावत नसे.

काही दिवसांनी गावकऱ्यांच्या लक्षात आले की गावात धान्याच्या चोऱ्या होत आहेत. चोराला पकडायचा निश्चय करून, नीट योजना करून ते टपून बसले.

एक दिवस जंबुनाथ गावाच्या प्रमुखाच्या घरांतच चोरी करायला घुसला. टपून बसलेल्या गावकऱ्यांनी त्याला एकदम पकडले आणि घरासमोरच्या खुंटाला बांधून ठेवले.

बराच वेळ वाट पाहून नवरा घरी आला नाही म्हणून गौरी गल्लीत येऊन ओरडली– "सावधान!"

तो आवाज ऐकून उत्तरादाखल जंबुनाथ ओरडला,–"खुंटाला बांधलोय!"

गावप्रमुखाने विचार केला, त्याला काही कळेना! त्याने विचारले, "हे तू काय ओरडत आहेस?"

जंबुनाथने सर्व हकीकत त्याला सांगितली व तो रडू लागला. तिथे जमलेले गावाले ते ऐकून खो खो हसू लागले.

त्यानंतर प्रमुखाने गौरीला बोलवले व तिला रागावून म्हटले–"नवऱ्याला काम करायला प्रेरणा द्यायला हवी होतीस, चोरी करायला नव्हे." शिवाय जंबुनाथला ही चांगल्या कानपिचक्या दिल्या आणि मेहनत करून कमाई करायचा उपदेश देऊन त्याला सोडून दिले.

त्या दिवसापासून जंबुनाथने इमानाने मेहनत करायचा निश्चय केला व मजुरी करून जगू लागला.



नैसर्गिक आश्चर्ये :

## गोगलगायीची चाल



साध्या गोगल गायीची सर्वोच्च गति ताशी ०.०३१२ मैल (०.०५ कि. मि.) किंवा १६५ फूट (५०.३ मीटर) इतकी असते.

## गेंड्याचे शिंग



गेंड्याचे शिंग हरिण किंवा सांबर यांच्याप्रमाणे हाडापासून किंवा आतील पदार्थापासून बनलेले नसते तर ते एकत्र दाबलेल्या केसांपासून बनलेले असते.

## म्होरक्याचे अनुसरण करा



इंग्रजी 'व्ही' आकारात उडणारे सारस पक्षी आळीपाळीने टोकावरची म्होरक्याची जागा घेतात. 'व्ही' आकारात उडण्यामुळे ते आपल्या कळपापासून चुकून इकडेतिकडे जात नाहीत.

## नक्कल करणारा पक्षी



चाफित नावाच्या पक्षाला स्वतःचा असा स्वर किंवा किलबिल नसते. तो दुसऱ्या पक्ष्यांच्या आवाजाचीच नक्कल करून ओरडतो.

# चांदोबा

**मनोरंजनाबरोबर ज्ञानवृद्धी करणारे खास असे एकमेव मासिक**

* चांदोबा आपल्याला पुराणातील व साहित्यातील उत्कृष्ट असे पैलू दाखवून देतो.
* योग्य तो दृष्टीकोन ठेऊन उभ्या जगतातील अद्‌भुत् व काव्य कथा सरळ शुद्ध शैलीत प्रस्तुत करतो.
* हलकेफुलके हास्य निर्माण करणाऱ्या व ज्ञानात भर पाडणाऱ्या व मनोरंजन करणाऱ्या अशा सुंदर गोष्टींचा संग्रह आपल्याला सादर करतो.
* आपल्याला पुराणातील गोष्टींचे वेचक ज्ञान प्राप्त करून देतो.
* हास्यपूर्ण प्रसंग व ज्ञानबोध करणारी शिर्षके याने आपल्या वाचकांचा उत्साह द्विगुणीत करतो.
* चांदोबा ह्या मासिकाने केवळ आपल्याच जीवनात नाही. तर आपल्या अनेक बंधु-भगिनी व मित्र-मैत्रिणी ह्यांच्याही जीवनात आपले स्थान पक्के केले आहे. त्यामुळे आपण आपल्या अत्यंत जवळच्या मित्रांना चांदोबा भेट द्या.

**लहानाचे हे मासिक मोठ्यांच्या आनंदात सुद्धा भर घालते.**

**इंग्रजी, हिंदी, मराठी, तेलुगु, कानडी, तामिळ, गुजराथी, मल्याळम्, बंगाली, उडिया पंजाबी, असामी व संस्कृत**

ह्या तेरा भाषांमध्ये चांदोबा छापला जातो. जो चांदोबा आपणास पाहिजे असेल त्याचे आजच वर्गणीदार व्हा.

**वार्षिक वर्गणी : ३०-०० रु.**

आपल्याला कोणत्या भाषेतील चांदोबा पाहिजे आहे ह्याचा उल्लेख करून खालील पत्त्यावर आपली वर्गणी पाठवा.

# फोटो जोडनावे चढाओढ :: पारितोषिक रु. ५०

**या फोटोंची जोडनावे फेब्रुवारी १९८८ अंकात जाहीर केली जातील.**



Ananta Desai



M. Natarajan

★ या फोटोंची युक्त जोडनावे एकेकाच शब्दात किंवा छोट्या वाक्यांत असली पाहिजेत. ★ जोडनावे डिसेंबर महिन्याच्या २० तारखेच्या आंत आमच्या पत्त्यावर पोंचली झाली पाहिजेत. ★ आमच्याकडे आलेल्या जोडनावांत सर्वोत्तम ठरतील (दोन्ही जोडनावे धरून) त्यांना रु. ५० चे पारितोषिक दिले जाईल. ★ जोडनावे पोस्टकार्डावर लिहून **चांदोबा फोटो चढाओढ, वडपळणी, मद्रास-२६** या पत्त्यावर पाठवावीत.

---

**ऑक्टोबर महिन्याच्या चढाओढीचा निकाल**

पहिला फोटो : **छान पाऊस पाऊस, आला आनंदा उरूस !**

दुसरा फोटो : **भिजायाची भारी हौस, पण न पडे पाऊस !!**

नांव : **मेखला सुधीर नाईक,** ४ ए, हिल टॉप अपार्टमेंट्स, सेनापति बापट मार्ग, पुणे-१६